# प्रस्तावना.



श्रीव्यासकृतभविष्यत्पुराणांत प्रभुलिंगलीलेचे पंचवीस अध्याय मिळाले, ते सर्व एकत्र करून छापल्यास पुस्तक फार मोठें होऊन ग्राहकांस घेण्यास जड जाईल, ह्मणून त्याचे तीन भाग करून छापले; त्यांतील हा तिसरा भाग आहे. पहिल्या दोन भागांत जी प्रस्तावना दिली आहे त्यांत ह्या भागांतही काय काय वर्णन आहे ह्याची संक्षिप्त माहिती दिलीच आहे, तरी पुन्हा ही प्रस्तावना ह्या भागास जोडली आहे. ह्या भागांत १८ व्या अध्यायापासून २५ अध्याय अखेरपर्यंत ग्रंथ आहे. अठराव्या अध्यायांत अल्लमप्रभूनें कल्याण नगरांत बसवेश्वरास प्राणलिंगानुसंधानाचा उपदेश केला. एकोणिसाव्या अध्यायांत श्रीशैलपर्वतावर गोरक्षनाथास अल्लमानें दर्शन देऊन कृतार्थ केलें. विसाव्या अध्यायांत पातालगंगेच्या कांठीं राहणाऱ्या मुनीश्वरांस अल्लमानें तत्वोपदेश केला व अरण्यांतील दुष्ट स्वभावाच्या पारध्यास पशुवधापासून पराङ्मुख करून कृतार्थ केलें. एकविसाव्या अध्यायांत कल्याण नगरांत बसवेश्वरानें अल्लमप्रभूकरितां शून्यसिंहासन तयार केलें. बाविसाव्या अध्यायांत बसवेश्वरास समाधीचे वेळीं अल्लमानें प्रत्यक्ष दर्शन देऊन विभूति दिली, बसवेश्वर मोठ्या समारंभानें अल्लमास सामोरा जाऊन अल्लमप्रभूस घेऊन आला व अल्लमप्रभु शून्यसिंहासनावर चढला. तेविसाव्या अध्यायांत आपला अपमान झाला ह्मणून सर्व जंगम निघून गेल्यामुळें चिंतातुर झालेल्या बसवेश्वराकरितां विराड्रूप घेऊन लक्षावधि जंगमांस लागणारें अन्न अल्लमानें एकट्यानें खाऊन टाकून तें अन्न सर्व जंगमांच्या पोटांत गेल्याचें अनुभवास आणून आपली सर्वान्तर्यामिता प्रकट केली. चोविसाव्या अध्यायांत अल्लमानें बसवेश्वर वगैरे सर्व प्रमथगणांस तत्वोपदेश केला व प्रत्येकानें

आपापले संशय अल्लमास विचारून त्याकडून समाधान करून घेतलें. पंचविसाव्या अध्यायांत सर्वांस तत्वोपदेश करून अल्लमप्रभु स्वच्छंद-पणानें पृथ्वीपर्यटन करण्यास निघून गेल्याचें व पार्वतीच्या प्रश्नावरून शिवांनीं वीरशैवांचें लक्षण व वर्तनक्रम सांगितला आहे. आणि शौनकादिक ऋषींच्या प्रश्नावरून सूतांनीं शिवाचे आज्ञेनें ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न केली, शिवच ब्राह्मणांचें उपास्य दैवत आहे, त्या शिवाच्या मस्तकापासून निराभार वीरशैव उत्पन्न झाले, जंगमलिंगवंश लोकांच्या कल्याणाकरितांच शिवांनीं उत्पन्न केला. कुलीन वीरशैव व अकुलीन वीरशैव कोणांस ह्मणावें, तसेंच चार्वाक, बौद्ध, जैन वगैरे मताचा पराभव करून कलियुगांत पूर्वीप्रमाणेंच चन्नबसवेश्वर, मणिवालमाचय वगैरे प्रमथगण अवतार घेऊन वीरशैव मताचें संरक्षण करितील वगैरे फारच सुरस वर्णन आहे.

पंचविसाव्या अध्यायांत एका श्लोकांत अक्षरें मूळ प्रतींत फाटून गेलीं असल्यामुळें कळण्यास मार्ग नव्हता सबब तेथें फुल्या घातल्या आहेत तेथें कसें असावें हे कोणाजवळ पोथी असल्यास त्यावरून त्यांनीं आह्मांस कृपा करून कळवावें ह्मणजे दुसऱ्या आवृत्तींत घालूं.

ह्या ग्रंथाची मराठी टीका रा. रा. **कृष्णशास्त्री जोशी** यांनीं लिहिली आहे. ह्या ग्रंथाचा ह्मणजे प्रभुलिंगलीला भाग एक दोन तीन ह्यांचा सर्वांनीं उपयोग करून घेतला ह्मणजे आह्मी आपल्या श्रमाचें सार्थक्य झालें असें समजूं.

सोलापूर १८।३।४ शुक्रवार. प्रसिद्धिकर्ता.

# विषयानुक्रमणिका.

## अध्याय २२



## अध्याय २३

| विषय. | पान. |
|---|---|


## अध्याय २४

समाप्त.



# विनंति.

खालीं लिहिलेल्या वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रा. सा. मल्लप्पा बसप्पा वारद यांचेकडे पाठवून देण्याची मेहेरबानी करावी, ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व धर्मोन्नतीच्या कामीं त्यांनीं यथाशक्ति हात-भार लावल्याचें त्यांस श्रेयही मिळेल, त्या ग्रंथाचें काम संपतांच त्यांची मूळप्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं. आपली मूळप्रत परत मिळेल किंवा नाहीं ह्याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मूळप्रत परत मिळण्याविषयीं आपल्या इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग आमचे-कडे ग्रंथ पाठवावे.

# अठ्ठावीस शैवागम.

| ग्रंथाचें नांव. | | श्लोकसंख्या. | ग्रंथाचें नांव. | | श्लोकसंख्या. |
|---|---|---|---|---|---|
| १ | कामिकागम. .... | १ परार्ध | १५ | वीरागम. .... .... | १ लक्ष. |
| २ | योगजागम. .... | १ लक्ष. | १६ | रौरवागम. .... | १० कोटी. |
| ३ | चिंत्यागम. .... | १ लक्ष. | १७ | मुकुटागम. .... | १ लक्ष. |
| ४ | कारणागम. .... | १ कोटी. | १८ | विमलागम. .... | ३ लक्ष. |
| ५ | अजितागम. .... | १ लक्ष. | १९ | चंद्रज्ञानागम. .... | ३ कोटी. |
| ६ | दीप्तागम. .... | १ लक्ष. | २० | बिंबागम. .... | १ लक्ष. |
| ७ | सूक्ष्मागम. .... | १ पद्म. | २१ | प्रोद्गीतागम. .... | ३ लक्ष. |
| ८ | सहस्रागम. .... | १ शंख. | २२ | ललितागम. .... | ८ लक्ष. |
| ९ | अंशुमानागम. .... | १० लक्ष. | २३ | सिद्धागम. .... | ५० लक्ष. |
| १० | सुप्रबोधागम. .... | ३ कोटी. | २४ | संतानागम. .... | ६ लक्ष. |
| ११ | विजयागम. .... | ३ कोटी. | २५ | सर्वोक्तागम. .... | २ लक्ष. |
| १२ | निश्वासागम. .... | १ कोटी. | २६ | पारमेश्वरागम. .... | १२ लक्ष. |
| १३ | स्वायंभुवागम. | ३ कोटी ५० लक्ष. | २७ | किरणागम. .... | ५ कोटी. |
| १४ | अनिलागम. .... | ३ लक्ष. | २८ | वातुलागम. .... | १ लक्ष. |

यांपैकीं प्रत्येक आगमांतील श्लोकसंख्या वातुलागमांतून घेतली आहे.

# आगमांशिवाय इतर ग्रंथ.

१ श्रीरेणुकभाष्य.
२ श्रुतिसारभाष्य.
३ सोमनाथभाष्य.
४ सर्वेश्वरभाष्य.
५ चोळरेणुकभाष्य.
६ रेणुकचरित्र.
७ वीरमाहेश्वराचारसंग्रह.
८ वीरमाहेश्वराधिक्य.
९ वीरशैवाचारकौस्तुभ.
१० वीरशैवरत्नाकर.
११ वीरशैवप्रकाशिका.
१२ वीरशैवोत्कर्षप्रकाशिका.
१३ वीरशैवानंदचंद्रिका.
१४ वीरशैवप्रदीपिका (शिवज्ञानशेखर.)
१५ शिवाद्वैतमंजरी.
१६ पंडिताचार्यचारित्र.
१७ मरुलसिद्धचारित्र.
१८ रेवणसिद्धचारित्र.
१९ क्रियासार.
२० कैवल्यसार.
२१ वसवराजीय.
२२ माचिदेवमनोविलास.
२३ वीरशैवचिंतामणि.
२४ शिवतत्वचिंतामणि.
२५ वीरशैवसंजीविनी.
२६ निराभारसंग्रह.
२७ षट्स्थलतिलक.
२८ प्रसंगरत्नाकर.
२९ षट्स्थलचंद्रिका.
३० शिवज्ञानप्रदीपिका.
३१ शांभवसार.
३२ शिवतत्वतर्कचंद्रिका.
३३ लिंगधारणचंद्रिका.
३४ शिवाद्वैतप्रदीपिका.
३५ सिद्धांतशेखर.
३६ विशेपार्थप्रकाशिका.
३७ अनादिवीरशैवसारसंग्रह.
३८ धर्मसंग्रह.
३९ शिवधर्मोत्तर.
४० वीरशैवमहोदधि.
४१ कथाडंबर.
४२ नंदीरहस्य.

ह्यांपैकीं कोणास ग्रंथ आमचेकडे पाठविणें झाल्यास खालील पत्त्यावर पाठवावे.

पत्ता—सोलापूर येथें वारदांचे घरीं वेदमूर्ति **मल्लिकार्जुनशास्त्री मणूर** मठाध्यक्ष.

# शुद्धिपत्रिका.

| पृ. | पं. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | २५ | कृष्णागुरु | कृष्णागरु |
| ३ | २० | पावतें. | पावलें |
| ४ | २ | वाग्गारैवे | वाग्गौरवे |
| ९ | ६ | भक्तिमांन् | भक्तिमान् |
| १६ | १५ | विधि | निधि |
| १७ | १ | प्रश्नंच | प्रश्नश्च |
| २१ | २३ | नाहीं- | नाहीं |
| २२ | २७ | कार्यसिद्धीचा | कायसिद्धीचा |
| २४ | ८ | करस्थ | करस्य |
| ३२ | २९ | रीतीनं | रीतीनें |
| ३८ | २२ | राहो | राहा |
| ,, | २४ | पाडो | पाड |
| ,, | २५ | करो | कर |
| ३९ | १६ | त्याविषयीं | त्या विषयीं |
| ४० | १३ | ऋषीचा | ऋषींचा |
| ४३ | ६ | यज्ञादि कर्म बहुलं पटतां | यज्ञादिकर्मबहुलंपटतां |
| ४६ | ३१ | बेदकर्में | वेदकर्में |
| ४८ | १३ | इत्यार्षे श्री | इत्यार्षश्री |
| ५५ | २९ | वांचृन | वांचून |
| ५७ | २३ | कृपनें | कृपेनें |
| ५९ | ४ | बेश्वराज्ञा | वेश्वराज्ञा |
| ६४ | २ | पृष्टै | पृष्ठे |
| ७५ | १ | कथानक | कथा |
| ,, | २ | शास्त्रासारं | शास्त्रसारं |
| ७६ | ३ | सिद्धिवीर | सिद्धवीर |
| ,, | ६ | द्रुसवो | द्रुसवो |
| ७७ | ११ | विनयतोऽ | विनयतो |
| ७८ | १० | प्रयत्नेय तान् | प्रयते यतान् |
| ७९ | १९ | श्वरानं | श्वरानें |

| पृ. | पं. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८६ | २ | मवाप— | मवाप |
| ८७ | १ | कथनम् | प्रशंसनम् |
| ,, | ११ | स्यथ वैव | स्यथवैव |
| ८९ | ६ | महं क्रियया | महंक्रियया |
| ,, | ,, | क्रिया घटित | क्रियाघटित |
| ९० | १२ | क्नुचित्तय | क नु चित्तय |
| ९२ | ३० | करण्यांच्या | करण्याच्या |
| ९३ | २० | कोठें— | कोठें. |
| १०२ | ३० | जिंकत् | जिंकतां |
| १०३ | १६ | सांग | सांग, |
| १०५ | १२ | स्त्यवस्था | स्त्ववस्था |
| १०६ | १३ | घटादिव देव | घटादिवदेव |
| १०७ | १८ | भक्तांनों | भक्तांनो |
| १०८ | २१ | मुनीश्वरानों | मुनीश्वरांनो |
| ११० | ११ | अक्केव | अक्केव |
| १११ | २१ | आगमापेक्षां | आगमांपेक्षां |
| ११२ | १६ | जसं | जसें |
| ११६ | ४ | अक्का | अक्का |
| ,, | ७ | ,, | ,, |
| ,, | १८ | ,, | ,, |
| ,, | २३ | ,, | ,, |

# ॥ भविष्यत्पुराणे प्रभुलिंगलीलायां ॥

## तृतीयभागप्रारंभः ।

॥ श्रीनंदिकेश्वराय नमः ॥

## अष्टादशोऽध्यायः ॥

**सूत उवाच**–श्रीसिद्धवीरेशपदाम्बुजेह्या भक्त्या महेशस्य विनष्टमोह्याः । त्यक्ताशयाः श्रीगुरुसत्कृपायाः शृण्वन्तु धीराः प्रभुलिंगलीलां ॥ १ ॥ अक्कामहादेव्यमलान्तरंगं देवः समाधाय शिवात्मबोधात् । भक्तिस्थलं ज्ञानपथोपदेशात्कर्तुं स्थिरं ह्यद्बसवस्य मेने ॥ २ ॥ अथाल्लमस्तं बसवं विलोक्य प्रसादद्दष्ट्या परतत्वनिष्ठां । उपादिदिक्षुः स्वयमेव साक्षाद्गुरुः परात्मा वचनं बभाषे ॥ ३ ॥ सदेष्टलिंगं भजतः सुनिष्ठया दृढा हि भक्तिर्गुरुलिंगजंगमे । त्रिलिंगभक्तेर्दृढभावतः स्थिरा मनोगतिः प्राणसुलिंगसंगता ॥ ४ ॥ चित्प्राणलिंगार्पितचित्तवृत्तिं शक्नोति न स्प्रष्टुमियं हि माया । अत्येति मायां तु यदा तदैव निर्वा-

---

(अध्याय १८) सूत ह्मणतात—॥ १ ॥ श्रीसिद्धेश्वराचे पदकमळांच्या भक्तीमुळें व महेश्वराच्या भक्तीमुळें ज्यांचें सर्व मूर्खपण नाहींसें झालें आहे व श्रीगुरूच्या कृपेमुळें ज्यांनीं सर्व आशांचा त्याग केला आहे असे धैर्यवान् लोक हो, प्रभुलिंगाच्या लीलेस ऐका. ॥ २ ॥ अल्लमप्रभूनें शिवरहस्याच्या उपदेशानें महादेवी अक्काचें मन निर्दोष केल्यावर ज्ञानमार्गाचा उपदेश करून बसवेश्वराचा भक्तिमार्ग स्थिर करण्याचा विचार मनांत अणिला; ॥ ३ ॥ मग अल्लमप्रभु बसवेश्वराकडे प्रसन्नमुद्रेनें पाहून स्वतःच श्रेष्ठ शिवतत्वाचा उपदेश करण्याच्या इच्छेनें तो प्रत्यक्ष परमेश्वर गुरुवर्य त्यास बोलूं लागला. ॥ ४ ॥ नेहमीं चांगल्या भक्तिभावानें इष्टलिंगाची सेवा करणाऱ्या मनुष्याची जंगमाविषयीं आणि गुरूविषयीं भक्ति दृढ होते; इष्टलिंग, प्राणलिंग, व भावलिंग ह्यांची दृढ भक्ति केली ह्मणजे प्राणलिंगास अनुसरून असणारी मनोवृत्ति स्थिर होते. ॥ ५ ॥ बसवेश्वरा, ज्याचें मन चित्स्वरूपरूप प्राणलिंगांत गढून गेलें आहे त्याला माया (अज्ञान) स्पर्श देखील करूं शकत नाहीं. तो भक्त ह्या दुर्धर मायेला जेव्हां जिंकतो तेव्हांच त्यास

णमार्गो बसवार्य भाति ॥ ५ ॥ श्रुत्वा गुरूक्तं बसवस्तमूचे प्रभो महात्मन् परिहाप्य मायां ॥ चित्प्राणलिंगांगविवेकतो मे कैवल्यमोक्षक्रममादिशेति ॥ ६ ॥ दीक्षागुरुस्तं प्रभुराह भूयो लीक्षा वसन्तूधसि दीर्घकालं । ताः क्षीरलेशं न पिबन्ति तद्वद्दाक्षायणीशं बहिरर्चयन्तः ॥ ७ ॥ अन्तः परं ज्योतिरमेयलिंगं सन्तः शिवं संततमर्चयन्ति । लिंगावधानाय सदान्तरंगे भक्तिर्मृषा सैव न या क्षमेत ॥ ८ ॥ द्रुमेषु पुष्पाणि सरस्सु वारि शैलेषु पत्राण्यटवीषु गन्धाः । धान्यानि नैवेद्यकृते वसन्ति सस्येषु बाह्यार्चनतत्पराणां ॥ ९ ॥ एतानि संपादितुमर्चनायै यद्यापयेत्केवलमेव कालं । तत्सर्वथा भेदधियोऽस्य जन्तोरैक्याय जायेत न भक्तिदार्ढ्यात् ॥ १० ॥ स्वायत्तमेतत्खलु सर्वजन्तोर्यत्केवलं साधनसंविधानं । गुरोः कृपायत्तमथान्तरंगे लिंगार्चनं

---

मोक्षमार्ग दिसूं लागतो. ॥ ६ ॥ असें अल्लमप्रभूचें बोलणें ऐकून बसवेश्वर त्यास ह्मणाला, प्रभो, तूं महासमर्थ आहेस; मायेचा नाश करून व चित्स्वरूप प्राणलिंगांगसंबंधाचा उपदेश करून, तूं कैवल्यरूप मोक्षमार्ग मला दाखव. ॥ ७ ॥ दीक्षा देणारा गुरु तो अल्लमप्रभु त्या बसवेश्वरास ह्मणाला, अरे, हे गोचीड गाईच्या कांसेस सदोदित चिकटलेले असतात तरी पण त्यास दुधाचा थेंब ह्मणून कधीं पिण्यास मिळत नाहीं, त्याचप्रमाणें बाह्यरीतीनें पार्वतीपतीची पूजा करणारे लोक चित्स्वरूपपदास जाऊन पोंचत नाहींत. ॥ ८ ॥ अभ्यंतर (मनांत) श्रेष्ठ, ज्याची बरोबरी कोणी करूं शकत नाहीं अशा तेजोमय शिवलिंगाला सज्जन लोक नेहमीं भजतात. लिंगाकडे नेहमीं लक्ष्य लागण्याकरितां मनामध्यें नेहमीं शिवभक्ति असली पाहिजे, अशा रीतीची जी भक्ति असेल तीच उत्तम भक्ति होय, नाहींपेक्षां त्या भक्तीचा कांहीं उपयोग नाहीं. ॥ ९ ॥ बाह्यरीतीची शिवपूजा करणाऱ्या लोकांस शिवपूजेकरितां झाडांला फुलें आहेत, सरोवरांत स्वच्छ पाणी आहे, पर्वतांवर बेलपत्री वगैरे आहेत, रानामध्यें कृष्णागुरुचंदनाचीं झाडें आहेत, व नैवेद्याकरितां, उगवलेल्या रोपांवर धान्यें तयार आहेत. ॥ १० ॥ इतक्या सर्व वस्तु शिवपूजनासाठीं मिळविण्याकरितां जर कोणी फुकट काळ घालवील तर सर्व प्रकारानें निराळेपणाची बुद्धि असल्यामुळें त्या प्राण्याला त्याची दृढ भक्ति असली तरी शिवैक्याची प्राप्ति होत नाहीं. ॥ ११ ॥ सर्व प्राणिमात्रांस शिवपूजन करणें झालें तर सर्व प्रकारचें साधन (सामग्री) अगदीं त्याच्या स्वाधीन आहे, मनामध्यें लिंगपूजन (मानसपूजा) गुरुकृपा असली ह्मणजे होते, दांभिकपणाची

**तन्नहि दंभभक्त्या ॥ ११ ॥ न दांभिकानां बहु मानयेऽहं भक्तिं प्रवातस्थितदीपकल्पां । पारं न यात्येव तदीयभक्तिर्वैराग्यहीनस्य यतेः कथेव ॥ १२ ॥ रुध्वा केवलकुंभकेन मरुतः कायं वशीकृत्य यः क्षुत्तृष्णादिरिपूनिहत्य सहसा जित्वेंद्रियाणां गणं । चित्तं वृत्तिविवर्जितं पय इव क्षीरे समारोपयेल्लिंगे स्वात्मनि सिद्धरामवदसौ ज्ञानं लभेच्छांभवं ॥ १३ ॥ श्रुत्वा तद्वचनं प्रभोर्विनयतस्तं सिद्धरामोऽब्रवीद्देव श्रीगुरुसार्वभौम कथमित्याज्ञापयेस्त्वद्धटं । उर्व्यां त्वत्पदकिंकरेषु समतां नो शक्नुयां केन वा प्राप्तुं मेरुतृणे तृणामरगिरी त्वन्निग्रहानुग्रहात् ॥ १४ ॥ स्वामिन्मे बसवार्य एव परमाचार्यो गुरुः स्यान्मम चन्नाख्यो मणिवालमाचयघनो मज्जंगमोऽहं शिशुः । भक्तानां परमेश्वरस्य विमलज्ञानैकसंधायिनां तस्मादत्र कियानहं भगवतो देवस्य**

भक्ति केली तर होत नाहीं. ॥ १२ ॥ मी दांभिक लोकांच्या भक्तीस महत्व देत नाहीं, ती भक्ति मोठ्या वाऱ्यांत ठेवलेल्या दिव्याच्या ज्योतीप्रमाणें समजतों. ( वाऱ्यांत दिवा असला तर जसा तो फार वेळ राहात नाहीं, तसाच दांभिक लोकांच्या भक्तीचा उपयोग होत नाहीं. ) ती भक्ति वैराग्य अंगीं नसणाऱ्या संन्याशाचे वर्तनाप्रमाणें चांगल्या रीतीनें शेवटास जात नाहीं. ॥ १३ ॥ जो शिवयोगी फक्त कुंभकवायूनें पांचही प्राणवायूंचा रोध करून, शरीरास स्वाधीन ठेवून, तहान भूक वगैरे शत्रूंस जिंकून इंद्रियांच्या समुदायांस जिंकून व मनांतील सर्व विकल्प काढून टाकून जसें दुधांत पाणी घातलें ह्मणजे तें दुधाशीं ऐक्य पावतें. तसें आपलें मन लिंगस्वरूपाकडे लावील, त्यास ह्या सिद्धरामाप्रमाणें उत्कृष्ट रीतीचें शिवज्ञान प्राप्त होईल. ॥१४॥ अल्लमप्रभूचें तें बोलणें ऐकून नम्रपणानें सिद्धराम त्यास ह्मणाला, परमेश्वरा, तूं सर्व गुरूंत सार्वभौमराजाप्रमाणें श्रेष्ठ गुरु आहेस, मला रिकामें महत्व कां देतोस? मी तुझ्या चरणकमलांचे पृथ्वीवर जितके दास आहेत त्यांपैकीं एकाचीही बरोबरी करूं शकणार नाहीं; तुझ्या कृपेनें गवताच्या काडीचा मेरु पर्वत होईल व तुझ्या रोषामुळें मेरु पर्वत देखील गवताच्या काडीसारखा निस्सत्व होईल. ॥१५॥ अल्लमप्रभो, हा श्रेष्ठ बसवेश्वर माझा परम गुरु आहे, चन्नबसवेश्वर गुरु आहे, मणिवालमाचय (मडिवाळ) हा माझा जंगम आहे; परमेश्वराच्या विमलज्ञानाची प्राप्ति करून घेणाऱ्या भक्तांचें मी अज्ञान मूल आहें, ह्यास्तव आपण मला जो एवढा मोठेपणा दिला तो सर्व आपलाच मोठेपणा आहे, माझी मुळींच योग्यता

**वाग्गारैवे ॥ १५ ॥ इत्युक्तः प्रभुरभ्यधात्प्रगुणयंस्तं साधु साध्वित्ययं बुद्धं संप्रति सिद्धराम भवतो वात्सल्यमत्यद्भुतं । भक्तेष्वित्थमुमाधवस्य महिमा शक्येत केनोदितुं वेदाद्यैश्च न वेद्य एव बसवाद्यासंख्यभक्तावलेः ॥ १६ ॥ यस्य श्रीपदपद्मवर्णनचणा वेदादयो वाग्गणा जाने स प्रमथाग्रणीर्बसव इत्याख्यां जगत्पावनीं । नंदीशः स्वयमुद्वहन्क्षितितले भक्तिं शिवे निर्मलां ख्यातां कर्तुमवातरत्कलिजनैराच्छादितां तुच्छकैः ॥ १७ ॥ इति प्रभुस्तद्बसवेंद्रसद्गुणानभिष्टुवन्राममुखान्गणान्प्रति । पुनस्तमूचे प्रणतं कृतांजलिं तदाभिमुख्याद्विकसन्मुखांबुजः ॥ १८ ॥ वदामि युक्तिं बसवावधारय प्रवृद्धसद्भक्तिपथानुभावने । मनुष्व लिंगांगमिदं स्वमंगकं तदुज्वलल्लिंगमभेदतोऽर्चय ॥ १९ ॥ लिंगोपभोगभरितः परमप्रसादी संसाधयाशु निरुपाधिकचित्समाधिं ।**

---

नाहीं. ॥ १६ ॥ असें सिद्धरामाचें बोलणें ऐकून त्याच्या बोलण्याची वारंवार प्रशंसा करून, अल्लमप्रभु त्यास ह्मणाला, सिद्धरामा, तुझा भक्तलोकांविषयीं दयाळपणा फार अवर्णनीय आहे, हें मला कळून चुकलें; जसें पार्वतीपतीचें माहात्म्य यथार्थ रीतीनें कोणाच्यानें वर्णन करवत नाहीं, कां तर वेदादिकांसही तें यथार्थ रीतीनें समजत नाहीं, तसेंच बसवेश्वरादिक भक्तमंडळींचें माहात्म्यही कोणास समजत नाहीं. ॥ १७ ॥ ज्या बसवेश्वराचे चरणकमलांचें यथार्थ वर्णन करण्यास वेदादिवाग्गण समर्थ आहेत तो, हा प्रमथपति नंदीश्वरच स्वतः बसवेश्वर अशी लोकामध्यें प्रसिद्ध असणारी संज्ञा ( नांव ) घेऊन, कलियुगांतील पातकी लोकांनीं लोपून टाकिलेल्या शिवावरील निर्मळ भक्तीस, पृथ्वीतलावर सर्व ठिकाणीं पसरविण्याकरितां, अवतरला आहे. ॥ १८ ॥ अशा रीतीनें तो अल्लमप्रभु बसवेश्वराच्या चांगल्या गुणांची सिद्धराम वगैरे इतर प्रमथगणांजवळ प्रशंसा करून, नमस्कार करून दोन्ही हात जोडून उभा राहिलेल्या बसवेश्वराकडे आपलें तोंड फिरवून हंसत हंसत त्यास पुन्हा ह्मणाला, ॥ १९ ॥ बसवेश्वरा, मी तुला युक्ति सांगतों लक्ष्य देऊन ऐक, वृद्धिंगत झालेल्या चांगल्या भक्तीच्या अनुभवामध्यें असें समज कीं आपले अंग व दैदीप्यमान इष्टलिंग हीं सारख्या योग्यतेचीं आहेत; अशी कल्पना करून अभेदबुद्धीनें पूजन कर. ॥ २० ॥ लिंगाचें यथाविधीनें पूजन कर, उत्तम अशा प्रसादान्नाचें भक्षण कर. व उपाधिरहित अशा चैतन्यसमाधीचा अनुभव घे; हें तीन प्रकारचें साधन आपल्या मनास ज्ञान

तत्साधनत्रितयमात्मनि बोधबीजं ध्यानं तदादि मननं श्रवणं तदादि ॥ २० ॥ वाक्यार्थबोध इति हि श्रवणं तदर्थयुक्तिप्रसाधनमिदं मननं वदन्ति । यत्प्राणलिंगविषयं सगुणप्रधानं तद्ध्यानमित्यभिहितं निरवद्यकीर्ते ॥ २१ ॥ एष प्रपंचविषयः खलु पूर्वयोगस्तत्ते ब्रवीमि परमुत्तरयोगतंत्रं । तत्साधनं श्रुतिमिमां बसवार्य तुर्यावस्थां वदन्ति मननं शृणु मौनमुद्रां ॥ २२ ॥ ध्यानं तु निर्गुणनिरंजननिर्विकारवृत्तिः सदैव फलितं परमात्मलिंगे ॥ संधिः स्थिरा मतिरहो जपयज्ञ इष्टस्सोऽहं तमेव भज पूर्णसमाधिमेकं ॥ २३ ॥ वाक्कायहृत्त्रयमिदं स्ववधानमत्या कृत्वैकगत्यविकलं घनलिंगमूर्तेः । ध्यानालयी भवनगोप्यमिदं विदित्वा यो भक्तिमान्विजयते स परं स्वतंत्रः ॥ २४ ॥ तस्यात्मलिंगनिरतार्चनतत्परस्य तत्वत्रयं गुरुचरेष्टपदं निजान्तः । दीव्यत्प्रसादचरणाम्बुविधानशीलान्यत्रैव संति सकलानि च साधनानि

---

होण्यास कारण आहे, त्याचेंच ध्यान करावें, त्याचेंच मनन करावें, व त्याचेंच श्रवण करावें. ॥ २१ ॥ हे निष्कलंक कीर्ति असलेल्या बसवेश्वरा, वाक्यार्थाचा बोध होणें हें श्रवण होय; त्याच्या अर्थाचें शहाणपणानें मंडन करणें हें मनन होय; जें सगुणात्मक प्राणलिंगाचें चिंतन तेंच ध्यान होय; असें ज्ञाते लोक मानतात. ॥ २२ ॥ हा प्रपंचाचा विषय सांगितला हा पूर्वयोग आहे; बसवेश्वरा, तुला आतां उत्तरयोगाचा प्रकार सांगतों. त्या तंत्रास साधन ह्मणतात, श्रुतीला तुर्यावस्था ह्मणतात व मौनमुद्रेस मनन ह्मणतात. ॥ २३ ॥ निर्गुण निरंजन निराकार वृत्ति होणें ह्या स्थितीस ध्यान ह्मणतात; नेहमीं परमात्मस्वरूपलिंगामध्यें लीन होणारी जी स्थिरबुद्धि तीस जपयज्ञ ह्मणतात; मीच ब्रह्म आहें व ब्रह्म मीच आहें अशी भावना धरून ध्यानस्थ बसणें, या स्थितीस समाधि असें ह्मणतात; बसवेश्वरा, तूं यां समाधि स्थितीचाच स्वीकार कर. ॥२४॥ वाचा शरीर आणि मन ह्या सर्वांस दृढ बुद्धीनें एक करून दुसरीकडे कोठें लक्ष्य न जाऊं देतां लिंगस्वरूपाचें एकाग्र निष्ठेनें ध्यान करणें ह्यास ध्यानालयी ह्मणतात. ह्याच ध्यानालयीला योग्यरीतीनें समजून घेऊन जो शिवयोगी त्याप्रमाणें वागतो, तो खरोखर स्वतंत्र आहे. ॥ २५ ॥ आपल्या आत्मलिंगाचें नेहमीं पूजन करण्यांत तत्पर असणाऱ्या शिवयोग्याचीं तीन तत्वें ( गुरु, जंगम, आणि इष्टलिंग ) हीं मनांतच आहेत, उत्तम तऱ्हेचा प्रसाद, पवित्र असें चरणोदक, आणि पूजा करावयाचीं

**॥ २५ ॥ चिद्रूपसाधनचयैः परमात्मलिंगं संपूज्य यः समरसस्त्रिपुटीं निरस्य । लिंगांगसंगपरमार्थशिवैक्यभावादानंदमेव भजतः किमु बाह्यतन्त्रैः ॥ २६ ॥ अन्तस्थचिन्मयपरात्परदिव्यलिंगं यो वा न वेद बसवार्य स मां न वेत्ति। तद्बाह्यकर्म परमात्मनि सन्निवेश्य निष्कामतोऽन्तरमलं मृगयेत लिंगं ॥ २७ ॥ श्रीलिंगजंगमगुरूत्तमतत्प्रसादपादोदकानि परिपूर्णतयाऽन्तरंगे । यावन्न भांति करसंगिनिजेष्टलिंगं तावद्भजेत परमार्थपदाभिलाषी ॥ २८ ॥ तत्साधुबोधितपदार्थगतिनिरस्तव्याध्यादिरात्मनि समः स्तुतिनिंदयोश्च । दुःखे सुखेऽप्यविकृतिः समतां दधानो भक्तो भजेद्बसव तद्भवबंधमोक्षं ॥ २९ ॥ पंचेंद्रियाणि विषयेषु मनो विहारद्वाराणि तान्यथ विरागबलान्निरुध्य । तेभ्यो निवर्त्य हृदयं परमात्मलिंगे संधाय निश्चलसमाधिरयं हि भक्तः ॥ ३० ॥ यावन्मनः प्रचलनं न जहाति तावन्नात्मानुभावमवगच्छति**

---

दुसरीं सर्व साधनें त्याच्या जवळच आहेत. ॥ २६ ॥ चित्स्वरूपांतील साधनांच्या पदार्थांनीं परमेश्वराच्या लिंगाचें पूजन करून शिवसामरस्य पावलेला जो पुरुष, त्रिपुटी टाकून लिंगांगसंबंधाचा व परमार्थ रीतीच्या शिवैक्यस्वरूपाच्या आनंदाचा उपभोग घेतो, त्यास दुसरीं साधनें कशास पाहिजेत? मुळींच नकोत. ॥२७॥ बसवेश्वरा, जो पुरुष (शिवयोगी) हृदयांतील चित्स्वरूपी श्रेष्ठ दिव्यलिंगास जाणत नाहीं तो मलाही जाणत नाहीं; ह्यास्तव हीं बाह्य कर्में सर्व परमेश्वरास अर्पण करून, निष्कामपणानें मनामध्यें निर्मल लिंग शोधावें. ॥ २८ ॥ जोंपर्यन्त, इष्टलिंग, जंगम, आणि गुरु, यांच्या प्रसाद व पादोदकाचें ज्ञान पूर्णपणानें मनांत बिंबलें नाहीं, तोंपर्यंत, परमार्थपदाच्या प्राप्तीची इच्छा करणाऱ्यानें हातावर इष्टलिंग घेऊन त्याची पूजा करावी. ॥ २९ ॥ बसवेश्वरा, चांगल्या रीतीनें पदार्थांची वस्तुस्थिति ज्यानें जाणिली आहे, ज्याच्या व्याधि दूर झाल्या आहेत, (जो रोगास जुमानीत नाहीं) जो निंदेचें दुःख मानीत नसून स्तुतीचें सुख मानीत नाहीं, दुःखाचे वेळीं व सुखाचे वेळीं ज्याचे मनास कांहींच विकार होत नाहीं, तो भक्त (शिवयोगी) संसारांतून सोडविणाऱ्या मोक्षपदास पोंचतो. ॥ ३० ॥ जो भक्त, विषयांत विहार करण्याचीं दारेंच अशा त्या पंचेंद्रियांचा वैराग्याच्या सामर्थ्यानें निग्रह करून, त्यांपासून आपलें मन वळवून परमात्मलिंगाकडे लावितो त्या भक्तास निश्चल समाधि लावणारा असें ह्मणावें. ॥ ३१ ॥ जोंपर्यंत मन चंचळपणा सोडीत नाहीं तोंपर्यंत चित्स्वरूपाचा अनुभव येत नाहीं, त्यामुळें भक्ति उत्पन्न होत नाहीं; भक्ति

**तेन भक्तिं। नो याति भक्तिरहितो गिरिशं न पश्येत्तद्दर्शनोत्सुकमृते न हि मुक्तिमेति ॥ ३१ ॥ वल्गानिरोधनवशात्तुरगः स्थिरत्वं वायोर्निरोधनवशान्मनसः स्थिरत्वं। तद्वायुरोधनवशेन निरुद्धचित्तो देहस्थकारणमियाद्भुवि वीरशैवः ॥ ३२ ॥ माया नाम मनो मनःपरिणतिर्वायुः स वायुः परं कायोभून्मनसः स एव सततं कायं स्वयं पीडयन्। भक्त्यंकूरसमुद्गमं न सहते कुत्रापि वा तत्क्रमाज्जेता तस्य भवेद्यदीह बसवः क्षोण्यां स भक्ताग्रणीः ॥ ३३ ॥ चेतश्चित्रपतत्रिणो निजदृशौ पादाविडापिंगलानाडीसंस्थितमारुतद्वयमिदं पक्षत्रयं प्रोच्यते। प्राणापानसमाह्वयं नयनयोर्दृष्टिद्वये स्थापिते नैश्चल्येन मरुन्न याति चलनं चित्तं स्थिरं स्यात्ततः ॥ ३४ ॥ चित्ते निश्चलतां गते निरुपमं चिद्बिंदुरत्नं स्फुरत्यस्मिन्सुस्थिरतां गते विजयते तत्कालकर्मादिकं। कार्यं तस्य च मूलकारणमियं माया समुन्मूलिता नश्येद्विश्वसनीयमार्य बसव स्थैर्यं भजात्मन्यलं ॥ ३५ ॥ उप्त्वा लिंगनिमित्त-**

---

नसल्यामुळें शिवाचें दर्शन होत नाहीं, व त्याच्या दर्शनाच्या उत्कंठेवांचून मोक्ष मिळत नाहीं. ॥ ३२ ॥ लगाम ओढून घेतला ह्मणजे घोडा जसा उभा राहतो, त्याचप्रमाणें, प्राणवायूंचा रोध केला ह्मणजे मन स्थिर होतें; ह्यास्तव पृथ्वीवर वीरशैव प्राणवायूंचा रोध केल्यामुळेंच मन स्वाधीन ठेवून, आत्मस्वरूपाच्या यथार्थ ज्ञानाचा अनुभव घेतो. ॥ ३३ ॥ माया ह्मणजे मन होय, मनाचा विस्तार हा वायु होय, तोच वायु शरीर झाला, तोच नेहमीं शरीरास पीडा करून मनासही पीडा करितो, व त्यास भक्तीचा अंकुरही उगवलेला खपत नाहीं; बसवेश्वरा, त्या मनास क्रमाक्रमानें जो जिंकील, तोच सर्व भक्तांत श्रेष्ठ भक्त समजावा. ॥ ३४ ॥ मन हा एक विचित्र पक्षी आहे. आपले दोन डोळे हे त्याचे दोन पाय होत; इडा व पिंगला ह्या दोन नाडींत राहणारे प्राण व अपान नांवाचे दोन वायु हे त्याचे तीन पंख होत. मनरूप पक्ष्याला दृष्टींत निश्चलपणानें स्थापन केलें ह्मणजे, वायु चंचलपणा सोडून स्थिर होतात. वायु स्थिर झाले ह्मणजे मन आपोआप स्थिर होतें. ॥ ३५ ॥ चित्त स्थिर झाल्यावर मग ज्याची बरोबरी दुसऱ्यानें करवणार नाहीं असें चैतन्य बिंदुरत्न प्रकट होऊन शोभतें; या चैतन्यबिंदुरत्नांत मन स्थिर झाल्यावर काल आणि कर्म वगैरेंचा पराजय होतो, त्याचें कार्य आणि मूल कारण ही माया मुळापासून उपटली जाऊन नाश पावते. बसवेश्वरा, ही गोष्ट अगदीं खरी आहे, ह्यास्तव तूं आपलें मन आत्म्यामध्यें स्थिर कर. ॥ ३६ ॥ चांगल्या शरीर रूप जमि-

**मन्नविलसद्वीजं सदंगस्थले संसिच्योदकपानतः सह सदा तद्धातुभिः सप्तभिः । संवर्ध्योर्जितबीजभूरुहफलं बिंद्वात्मनावस्थितं यो दत्वांगगुणाय लिंगमनयाल्लिंगावधान्येव सः ॥ ३६ ॥ भित्त्वाऽऽधारप्रमुखविलसच्चक्रषट्कं क्रमेण ज्ञात्वा तत्र स्फुरितमनसा षट्स्थलान्यात्मयोगी । क्षित्यम्ब्वग्नीन् पवनगगने चित्तमत्र प्रयोगान्षड्विज्ञायाप्यविकृतमना भक्तिमान्यस्तटस्थः ॥ ३७ ॥ चेतःषष्ठानि भूतान्यथ बसवमुने दैवतानां च षट्कं षड्वर्णानक्षराण्यप्यमलशिवमहामंत्रगोप्यानि तेषु । षट्चक्रेषु प्रबुध्वा तदुपरि गमने यस्समर्थः कृतार्थः सोऽयं पारं गतः स्यात्परशिवविमलज्ञाननिर्वाणभक्तेः ॥ ३८ ॥ वदामि तत्वं गुरुलिंगसंगतस्थलानि विद्वन्गुदगुह्यनाभयः । तदूर्ध्वनाभिर्हृदयं गलाम्बुजं त्रयं तदेतच्चरलिंगमंदिरं ॥ ३९ ॥ भ्रुवोः सुमध्यं ह्यविमुक्तसंज्ञितं ततः परं ब्रह्मबिलं च तद्वयं । महेशलिंगस्थलमित्यवेत्य तत्प्र-**

---

नींत लिंगाकरितां चांगलें बीं असलेलें अन्न पेरून ( भोजन करून ) उदक शिंपडून ह्मणजे पाणी पिऊन, नेहमीं सात धातूंच्या योगानें वाढलेलें मोठ्या वृक्षाचें जें चिद्बिंदुरूपी फळ, तें अंगगुणाला देऊन जो लिंगप्राप्ति करितो. त्यास लिंगावधानी ह्मणावें. ॥ ३७ ॥ आधार वगैरे जीं सहा चक्रें आहेत त्यांचा क्रमाक्रमानें भेद करून त्यांची माहिती झाल्यावर, आत्मयोग्यानें षट्स्थलें ओळखावीं; पृथ्वी, अप्, तेज, वायु, आकाश आणि मन हे सहा प्रयोग आहेत असें समजल्यावर, त्याच्या मनास कांहीं एक विकार न होतां भक्तिवान् पुरुष तटस्थपणानें राहतो. ॥ ३८ ॥ पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, आणि मन हीं सहा भूतें होत, तसेंच बसवेश्वर मुनिश्रेष्ठा, देवताही सहाच आहेत, वर्ण सहा आहेत; षट्चक्रांमध्यें निर्मल शिवमहामंत्राचें रहस्य आहे, तें समजून घेऊन षट्चक्रांचे वर जाण्यास जो समर्थ असेल तो कृतार्थ झाला व तो पुरुष श्रेष्ठ शिवाचें विमल ज्ञान आणि निस्सीम भक्ति, यांना प्राप्त करून घेतो, असें समजावें. ॥ ३९ ॥ हे विद्वान् बसवेश्वरा, मी तुला रहस्य सांगतों. गुद, गुह्य आणि बेंबी हीं गुरुलिंगाचीं राहण्याचीं ठिकाणें आहेत; बेंबीच्या वरील भाग, उर, आणि गळा हीं तीन ठिकाणें चरलिंगाचीं स्थलें आहेत. ॥ ४० ॥ बसवेश्वरा, दोन्हीं भोंवयांचा मध्यभाग ह्यालाच अविमुक्त ह्मणतात त्यावरचें ब्रह्मरन्ध्र हीं दोन ठिकाणें महेशलिंगाचें स्थल आहे; ह्याची ज्याला माहिती झाली, तो भक्त गुरूच्या पूर्ण कृपें-

**सादवान्स्याद्बसवार्य भक्तिमान् ॥ ४० ॥ सुवस्तु तद्बिंदुमयं गुरूल्लसन्मुखानले पक्कमथार्य पूरयन् । तदात्मविज्जंगमलिंगसंमुखे महेशलिंगाय समर्पयेत्ततः ॥ ४१ ॥ तदीयशेषामृतमात्मसात्कृतं स्वयं समास्वाद्य बहीरसांस्त्यजन् । चिरं निजानंदनिमग्नमानसः समाधिरूढो बसवार्य भक्तिमान् ॥ ४२ ॥ भूम्यम्ब्वग्निसमन्वितो गुरुसुतो विद्युन्मरुद्व्योमगः श्रीमज्जंगमसंविधानभरितश्चित्तात्मसंधानवान् । श्रीलिंगैक्यसुभक्तिमान् स्थितिमिमां जानाति यः पुण्यवानेष श्रीबसवाग्रणीस्त्रिविधसद्भक्तो भवेत्सांप्रतं ॥ ४३ ॥ भूम्यम्बुस्थलवांस्तु कर्मभरितो भक्तोऽग्निवायुस्थलस्थायी तद्गगनस्थलान्वितमनास्सुज्ञानवानित्यलं । ज्ञात्वा भक्तमहेश्वरादिपदवीमारुह्य तीर्त्वा परं यः प्राप्नोति निरंजनं स बसव ज्ञेयो गुरूणां गुरुः ॥ ४४ ॥ शक्तिस्थानमपानगुह्ययुगलं भक्तिस्थलं नाभिहृद्द्वंद्वं मुक्तिकलास्थलं किल गलभ्रूमध्ययुग्मं ततः । ज्ञात्वेत्थं परिहृत्य शक्तिगुणमप्यालिंग्य भक्तिं दृढां भावज्ञो बसवार्य मुक्तिमतुलां**

---

तला आहे असें समजावें. ॥ ४१ ॥ बिंदुस्वरूप सद्वस्तु गुरूला अर्पण करून, तो प्रसाद, आत्मवेत्त्यानें जंगमाच्या समोर बसून शिवलिंगास अर्पण करावा. ॥ ४२ ॥ शेष राहिलेल्या अमृततुल्य प्रसादाचा आपण स्वतः उपभोग घेऊन, बाह्य रसाचा त्याग करावा. बसवेश्वरा, नेहमीं स्वानंदानुभवांत ज्याचें मन गढून जाऊन, जो समाधियोग साधतो, तो भक्तिमान् समजावा. ॥ ४३ ॥ पृथ्वी, अप् आणि अग्नि येथपर्यंत ज्याची गति आहे तो गुरुपुत्र होय; वीज, वारा, आणि आकाश येथपर्यंत ज्याची गति आहे तो जंगमाची भक्ति करणारा होय. जो मनाचें आत्म्याबरोबर संमेलन करणारा आहे तो लिंगैक्याची भक्ति करणारा आहे असें समजावें. ह्या स्थितीला जो जाणतो तो पुण्यवान् होय, व बसवेश्वरा, त्यास त्रिविध भक्त असें ह्मणावें. ॥ ४४ ॥ भूमि आणि पाणी हीं स्थलें कर्म करणाऱ्यांचीं आहेत, अग्नि आणि वायु हीं दोन स्थलें भक्तांचीं आहेत, गगन आणि मन हीं दोन स्थलें ज्ञानी मनुष्याचीं आहेत, असें समजून भक्त माहेश्वर वगैरे सहा स्थलें आहेत त्यांवर चढून, व तीं स्थलें ओलांडून, बसवेश्वरा, जो निरंजन पदास पावतो, तो गुरूचाही गुरु समजावा. ॥ ४५ ॥ गुद व गुह्य हीं शक्तिस्थानें होत, नाभि आणि हृदय हें भक्तिस्थल होय, गळा आणि दोन भोंवयांचा मधला भाग हें मुक्तिकलास्थल होय; असें समजून घेऊन शक्तीचे गुण टाकून देऊन बसवेश्वरा, जो दृढ भक्तीचा आश्रय करील, तो नंतर स्वतः

**गच्छेत्तदूर्ध्वं स्वयं ॥ ४५ ॥ आत्मानं स्वयमात्मनैव यदि वेत्त्यात्मस्थिता शक्तिरप्यात्मन्येव च भक्तिरात्मनि दृढा मुक्तिश्च तत्कारणं । ज्ञप्तिश्चात्मनि तस्य भाति तदयं यः स्वात्मनैवात्मविन्मान्यः स्याद्बसवार्य चेतसि मया भक्ताग्रणीर्लिंगवान् ॥ ४६ ॥ इत्यल्लमप्रभुगुरुर्बसवाधिपस्य तत्पूर्वपश्चिमविधानरहस्यसिद्धं । योगोपदेशमतुलासनलक्ष्यमुद्राभ्यासोचितं समनुगृह्य जगाद भूयः ॥ ४७ ॥ भक्तिं संततमात्मनैव खचितां कृत्वा वियुक्तां न कुर्वात्मज्ञैः सह युक्तिमद्भिरतुलां गोष्ठीमजस्रं भज । नाधःस्रोतसि धेहि वृत्तिकलनं चेतस्तदूर्ध्वाध्वना संगृह्याशु निरंजनस्थलमिदं स्थैर्येण संप्रापय ॥ ४८ ॥ चिन्तां संत्यज दिव्यलिंगभरितां दृष्टिं स्थिरीभावय स्वात्मन्येव परामृतैक्यलहरीसाम्राज्यलक्ष्मीं भज । अस्मद्वागुपदिष्टतत्वमधुना मा विस्मरारूढवानूर्ध्वं तस्य वदामि सारमतुलं लिंगैक्यतत्वं महत् ॥ ४९ ॥**

---

अनुपमेय अशा मुक्तीस जाईल. ॥ ४६ ॥ आपणास (आत्म्यास) आपले आपण ओळखून शक्ति आपणांतच आहे व भक्ति ही आपणांतच आहे असें जाणून आत्म्याविषयीं दृढ भक्ति असणें हें मोक्षाचें साधन आहे; व आपल्या मनांत ज्ञानशक्ति ही आहेच. ह्यास्तव हे बसवेश्वरा, जो आपले आपण आत्मस्वरूप जाणतो, तो मनुष्यश्रेष्ठ होय; मी त्याला मनांत भक्तश्रेष्ठ व लिंगधारी असें मानितों. ॥ ४७ ॥ अशा रीतीनें त्या अल्लमप्रभु गुरूनें बसवेश्वराला, पूर्व पश्चिम विधानाच्या गौप्यामुळें सिद्धि करून देणारा, व योग्य आसन, लक्ष मुद्रा, अभ्यास यांनीं युक्त असणारा असा योगोपदेश पुन्हा कृपा करून सांगितला. ॥ ४८ ॥ बसवेश्वरा, तूं आपल्या मनांत भक्ति निरंतर पूर्णपणानें राहूंदे, कधींही तिच्यांत कमीपणा पडूं देऊं नकोस. युक्तिवाद सांगणाऱ्या आत्मज्ञान्यांशीं नेहमीं योगसाधनाच्या रीतींचा ऊहापोह कर. चित्स्वरूपाच्या प्रवाहांत आपल्या मनाची वृत्ति कधींही खालीं जाऊं देऊं नकोस; तिला ऊर्ध्व मार्गानें घालवून स्थिरपणानें निरंजन स्थलास नेऊन पोंचव. ॥ ४९ ॥ काळजी करूं नकोस, दिव्य लिंगाकडे निश्चळ दृष्टि लाव. आपल्या आत्मस्वरूपांत श्रेष्ठ शिवैक्यसाम्राज्यसुखाचा उपभोग घे. आह्मी स्वतः तुला सांगितलेलें तत्व विसरूं नकोस; त्याप्रमाणें वर्तन ठेवून पायरी पायरीनें वर चढत जा. हें उत्तम रीतीचें श्रेष्ठ लिंगै-

यत्रेशांघ्रिसरोजभक्तिभरितास्तत्पारकांक्षान्वितास्तिष्ठंत्यप्रतिमानुभावकलनागोष्ठीप्रसंगात्सदा । गत्वा तत्र तदीयभक्तिसरणेर्ममोपदेशाद्भवं निर्मार्ष्टुं बसवार्य मुक्तिगतये यास्याम्यहं लीलया ॥ ५० ॥ इति सकलगणानां शृण्वतामल्लमेन्द्रस्सदसि बसवनाथं प्राह कारुण्यसांद्रः । भजत मुनिवरेण्याः प्राणलिंगांगयोगं प्रभुचरणसरोजध्याननिष्ठाश्च यूयं ॥ ५१ ॥ पठति परमभक्त्या प्राणलिंगांगयोगप्रकटनपटुसारं सच्चरित्रं प्रभोर्यः । श्रुतमपि बुधवक्त्राद्धारयेद्वा स्थिरात्मा सुलभतरममुष्य प्राणलिंगैक्यंसौख्यं ॥ ५२ ॥

इत्यार्षश्रीभविष्यत्पुराणकथाविशालायां प्रभुलिंगलीलायां प्राणलिंगानुसंधानगतिर्नामाष्टादशोऽध्यायः ॥

---

क्याचें तत्व आहे असें मी सांगतों. ॥ ५० ॥ बसवेश्वरा, मुक्तिस्थलांत परमेश्वराच्या चरणकमलाची मनापासून भक्ति करणारे जे शिवयोगी रहातात, त्यांच्या उत्तम उत्तम आत्मानुभवासंबंधीं गोष्टी चालतात; त्या ऐकून त्यांच्याच भक्तिमार्गानें जाऊन त्यांच्या तत्वोपदेशामुळें संसाराचा नाश करण्यासाठीं, मी मुक्तिमार्गास सहज जाईन, असे विचार मनांत आण. ॥ ५१ ॥ सर्व प्रमथगण ऐकत असतां त्या परम दयाळू अल्लमप्रभूनें बसवेश्वराला सभेंत अशा रीतीनें प्राणलिंगांचा योग सांगितला. मुनीश्वरांनो, तुह्मांला ही अल्लमप्रभूच्या चरणकमलांच्या भक्तीची गोडी आहेच, तुह्मी ह्याच तऱ्हेनें योगसाधन करा. ॥ ५२ ॥ प्राणलिंगांगाचें उत्तम रीतीनें वर्णन केलेलें हें अल्लमप्रभूचें चरित्र जो कोणी भक्तिपूर्वक पठन करील, किंवा विद्वानाच्या तोंडून ऐकेल, त्याचें मन स्थिर होऊन त्याला प्राणलिंगैक्याचें सुख फार लवकर प्राप्त होईल.

ह्याप्रमाणें ऋषीश्वरांनीं भविष्यत्पुराणांत कथेच्या रूपानें सविस्तर वर्णन केलेल्या प्रभुलिंगलीलेंतील, प्राणलिंगानुसंधानवर्णन नांवाचा हा अठरावा अध्याय संपला.

---

॥ श्रीनंदिकेश्वराय नमः ॥

## एकोनविंशतितमोऽध्यायः ॥

**सूत उवाच**–सिद्धश्रीगुरुवीरनाथपदपद्माराधका निस्पृहाः सिद्धा वृद्धितधातुवद्धकुतनोर्दोषैर्निषिद्धात्मनः । रुद्धानर्थरजस्तमोगुणभरा बुद्धात्मतत्वाः कृतश्रद्धा मुक्तिकथासु भक्तिरसिकाः शृण्वन्तु लीलां प्रभोः ॥ १ ॥ प्रभुरप्यथ भक्तसन्ततिं बसवेंद्रं च कृपाविलोकनैः । अनुगृह्य स गन्तुमिच्छया वचनं प्राह हितं मिताक्षरं ॥ २ ॥ बसवप्रमुखा गणाधिपा गमनेच्छा मम जायते भुवं । अथ यूयमपि स्थिरां मतिं कुरुतास्मत्कथितात्मभावने ॥ ३ ॥ गुरुलिंगचरार्चनक्रमैस्सततं साधुसमागमोत्सवैः । परमार्थपदानुभावनैर्हृदि कालं नयतात्मवित्तमाः ॥ ४ ॥ इति वाक्यसुधापयोनिधिप्रसरैस्ताननुभावयन्प्रभुः । प्रमदाम्बुविलोचनैर्गणैः प्रणतोऽभूत्पुलकांकुरां-

---

सूत ह्मणतात—॥ १ ॥ ऋषीश्वर हो, श्रीसिद्धवीरगुरुवर्यांचे चरणकमलांची तुह्मी आराधना करितां, तुह्मी निस्पृह आहां, तुह्मी सिद्धपदास पावलां आहां, वरचेवर वाढणाऱ्या सात धातूंमुळें पुष्ट होणाऱ्या वाईट शरीराच्या दोषांचा तुमचे आत्म्यास मुळींच संबंध नाहीं, अनर्थकारक सत्व रज तम हे गुण तुह्मांस नाहींत, तुह्मांस आत्मस्वरूपाचें ज्ञान आहे, तुह्मांस मोक्षमार्गाच्या कथा ऐकण्याची फार आवड आहे, तुह्मी मोठे भक्तिमान् आहां; तुह्मी आतां स्वस्थपणानें अल्लमप्रभूचें चरित्र ऐका. ॥ २ ॥ अल्लमप्रभु तेथील सर्व भक्तमंडळींस आणि बसवेश्वरास कृपादृष्टीनें कृतार्थ करून तेथून दुसरीकडे जाण्याच्या उद्देशानें, कल्याणकारक असें थोडक्यांत आपलें मनोगत सांगूं लागला. ॥ ३ ॥ बसवेश्वरादिक सर्व भक्तमंडळींनो, माझा आतां पृथ्वीवर प्रवास करण्याचा विचार आहे, आतां तुह्मीही मीं सांगितलेल्या आत्मस्वरूपाविषयीं आपली बुद्धि स्थिर करा. ॥ ४ ॥ तुह्मी नेहमीं गुरु, लिंग, व जंगम, ह्यांचें पूजन करीत जा, नेहमीं सज्जन लोकांचा समागम करा, व परमार्थपदाचा मनांत विचार करून आत्मस्वरूपाचें ज्ञान करून घेऊन सुखानें कालक्रमण करा. ॥ ५ ॥ ह्याप्रमाणें त्या भक्तमंडळींस अल्लमप्रभूनें गोडगोड शब्दानें समजाऊन सांगितल्यावर, सर्व प्रमथगणांच्या डोळ्यांस आनंदाश्रु आले, व अंगावर दाट शहारे येऊन सर्वांनीं अल्लमप्रभूस

**कितैः ॥ ५ ॥ विनयान्वितसिद्धरामसन्मुनिमादिश्य सुवर्णलापुरीं । गमनं कुरु साधकोत्तमेत्यमनस्काधिपतिर्ययौ क्षणात् ॥ ६ ॥ अनुसृत्य सहागतान्पुनर्गमनेच्छारहितान्गणान्प्रभुः । अवलोक्य पथि स्थितश्चिरं कृपया प्राह निजांघ्रिसंश्रितान् ॥ ७ ॥ भुवि भक्तगणानशेषतः समयानुग्रहणेन रक्षितुं । अवतीर्य वयं क्व च स्थले न वसामो दिवसाधिपो यथा ॥ ८ ॥ अभवस्य निरंजनस्य मे भवतामेष कृते तनूद्यमः । अनुसंधिविधौ हि चेतसो न बहिर्योगवियोगसंभ्रमः ॥ ९ ॥ अहमेव हि जंगमाकृतिर्न भिदा जंगमलिंगयोस्ततः । मम रूपमवेक्ष्य जंगमं भजताश्वेव भवेन्ममागमः ॥ १० ॥ इति भक्तमनांसि भावयन्प्रभुदेवः सुसमाहितान्यलं । भवतां भवभक्तिरूर्जिता भवतादाशिषमित्यमन्यत ॥ ११ ॥ समुपेत्य च नित्यसत्यतां सततं जंगमलिंगभू-**

---

नमस्कार केला. ॥ ६ ॥ अल्लमप्रभूनें नम्रस्वभावाच्या सिद्धरामास सांगितलें कीं, साधकश्रेष्ठा, तूं आतां सोलापुरास सुखानें गमन कर; असें सांगून सुखदुःखांचा संबंध नसणारा तो अल्लमप्रभु तेथून निघून चालता झाला. ॥ ७ ॥ त्याच्या बरोबर त्यास पोंचविण्यास सर्व भक्तमंडळी चालली, त्यांचा विचार परत घराकडे जाण्याचा होईना; अशा त्या आपल्या चरणकमलांचा आश्रय करणाऱ्या सर्व भक्तमंडळींस कृपादृष्टीनें पाहून वाटेंत उभा राहून, अल्लम दयाळुपणानें सर्वांस उद्देशून ह्मणाला. ॥ ८ ॥ पृथ्वीवरील सर्व भक्तमंडळीस धर्मोपदेश करून रक्षण करण्यासाठीं आह्मीं अवतार घेतला असल्यामुळें, सूर्य जसा एका जागीं कधींही राहत नाहीं, तसेंच आह्मांलाही पृथ्वीवर कोठेंही एका जागीं नेहमीं राहतां येत नाहीं. ॥ ९ ॥ मला जन्म मरण नाहीं, मी निरंजन आहें; असें असून मीं शरीर धारण केलें आहे; ही सर्व खटपट तुमच्याकरितांच केलेली आहे. कां तर, मनाला, निश्चितपणाचें मत ठरेपर्यंत बहिर्योग आणि त्यांची तुटातुट ह्याविषयीं भ्रांति पडते, ती दूर करण्यासाठीं मी अवतरलों आहें. ॥ १० ॥ मीच स्वतः जंगमाचें स्वरूप झालों आहें, यास्तव आतां लिंग आणि जंगम ह्यांच्यांत निराळेपणा नाहीं हें उघड आहे; मीं जंगमाचें रूप घेतलें आहे हें माझें जंगमाचें रूप पाहून माझी सेवा करा, ह्मणजे मी लवकरच येईन. ॥ ११ ॥ ह्याप्रमाणें गोडगोड बोलून भक्तमंडळींच्या मनाचें समाधान करून प्रभूनें त्यांस शांत केलें. नंतर, तुमची शिवभक्ति वारंवार वृद्धिंगत होवो, असा तुह्मांला माझा पूर्ण आशीर्वाद आहे असें समजा, ॥ १२ ॥ तुमच्या हातून

त्यतां । कृतकृत्यतमा भवन्त्विति प्रभुराशीर्वचनं जगाद सः ॥ १२ ॥ विनिवर्त्य गणाधिपान्पुरं बसवादीनसमानवैभवः । प्रययौ जयवानुदग्दिशास्थितभक्तावनतत्परो गुरुः ॥ १३ ॥ बसवादिगणाश्च सद्गुरुस्मृतिनिर्धूतरजोगुणा गृहान् । प्रतिपद्य पुनः पुराधिकं चरलिंगार्चनतत्परा बभुः ॥ १४ ॥ पुनरागमनप्रतीक्षणे प्रभुदेवस्य सदा समाहिताः । दिवसानि नयन्त ईश्वरे परमोत्कंठितया गणा स्थिताः ॥ १५ ॥ तदनु प्रभुराट् पथि व्रजन्सुदृशा यानवलोकयेद्गिरीन् । त इमे कनकाचलायितास्सुरकल्पद्रुलताद्रुवीरुधः ॥ १६ ॥ अमृतांबुधयः सरोवरप्रकराः स्पर्शसुवेधिनो धराः । खनयो मणिसूनवः स्वयं बभुरुत्कृष्टगुणाद्भुतं जगत् ॥ १७ ॥ अथ देशगतास्तमागतं प्रभुमाकर्ण्य सुभक्तिसंयुताः । सह वाद्यरवेण भस्मसत्फलतांबूलभृतः समाययुः

---

नेहमीं खरेपणाचें वर्तन घडो, जंगमाची व लिंगाची तुमच्या हातून सेवा घडो, तुमच्या जन्माचें सार्थक होईल, असा त्या अल्लमप्रभूनें सर्वांस आशीर्वाद दिला. ॥ १३ ॥ मग बसवेश्वर वगैरे सर्व प्रमथगणांस कल्याणनगरास परत पाठवून, ज्याचें अलौकिक ऐश्वर्य आहे, व ज्याचा सर्वत्र जयच व्हावयाचा असा तो अल्लमप्रभु भक्तांचें रक्षण करण्यासाठीं उत्तर दिशेकडे निघाला. ॥ १४ ॥ अल्लमप्रभूच्या स्मरणामुळें बसवेश्वरादिक सर्व प्रमथगणांच्या मनांतील रजोगुणाचे विचार मावळून, ते परत घरीं आले, आणि पहिल्यापेक्षां ज्यास्त भक्तीनें चरलिंगाचें पूजन करूं लागले. ॥ १५ ॥ सर्व प्रमथगण, अल्लमप्रभु पुन्हा आपल्या घरीं परत कधीं येईल ह्याची वाट पाहत राहिले, व अल्लमप्रभूविषयीं उत्कंठित होऊन दिवस लोटीत राहिले. ॥ १६ ॥ इकडे तो अल्लमप्रभु वाटेनें जातां जातां ज्या ज्या पर्वताकडे कृपादृष्टीनें पाही, ते ते सर्व मेरुपर्वताप्रमाणें सुवर्णाचे होऊन शोभूं लागले, व ज्या ज्या वृक्षांकडे व वेलींकडे पाही, ते ते वृक्ष व त्या त्या वेली कल्पवृक्षासारखे व कल्पवल्लीसारख्या शोभूं लागल्या. ॥ १७ ॥ सरोवरांचे समुदाय अमृतसमुद्राप्रमाणें शोभूं लागले, पृथ्वीवर जागोजाग परिस मणि सांपडूं लागले, व खाणींत रत्नें पुष्कळ सांपडूं लागलीं; असे जागोजाग अनेक प्रकारचे अद्भुत चमत्कार होऊं लागले. ॥ १८ ॥ मग त्या देशांतील लोक अल्लमप्रभु आपल्या गांवीं आला आहे असें समजतांच, भक्तिपूर्वक वाद्यें वाजवीत भस्म, चांगलीं फळें, व विडा वगैरे पदार्थ हातांत घेऊन अल्लमास शरण येत.

॥ १८ ॥ पद्योः प्रणतान्कृपानिधिर्हृदि लिंगैक्यमथानुभावयन् । अनुगृह्य च तैस्समं ययौ शिवगोष्ठीकथनैर्यथातथं ॥ १९ ॥ पथि यत्र निषेदिवान्प्रभुः शिवभक्तैः सह तत्र तत्र सः । दिवि दुंदुभिनिःस्वनैस्समं सुमवृष्ट्या भरितोऽभवद्भृशं ॥ २० ॥ अमृतोपमसारवन्त्यलं तदुपस्पृष्टसरोजलान्यभुः । दिनमेकमथोषितं परं प्रयतः क्षेत्रमभूद्धरास्थलं ॥ २१ ॥ सदुघेध्वनिरध्वनि व्रजन् प्रभुदेवः परमेश्वरालयं । स ददर्श समस्तसिद्धिदं प्रथितं श्रीगिरिराजमंजसा ॥ २२ ॥ यदमेयगुणान्प्रशंसितुं न हि शक्नोति फणाधरेश्वरः । तपसा किल पर्वतेश्वरः स्वयमैश्वर्यविजृंभितो बभौ ॥ २३ ॥ रसवादवयोनिरोधने जगदाकर्षणमंजनौषधे । यद्दर्शनवश्यतादिकं सकलं सिध्यति तत्र मंत्रिणां ॥ २४ ॥ जगदद्भुतमूलिका क्रियाऽमृतसंजीवनिकाद्यमौषधं ।

---

॥ १९ ॥ व नमस्कार करीत. त्यांस पाहून मनांत संतुष्ट झालेला तो कृपासमुद्र अल्लमप्रभु लिंगैक्याचा उपदेश करीत असे, व त्यांच्यावर कृपा करून शिवचरित्रांतील गोष्टी सांगून कालक्रमणा करीत असे. ॥ २० ॥ वाटेंत ज्या ज्या ठिकाणीं अल्लमप्रभु शिवभक्तांसहवर्तमान मुक्काम करीत असे, तेथें आकाशांतून देवांनीं दुंदुभि ( नगारे ) वाजवून पारिजातांच्या फुलांचा वर्षाव करावा. ॥ २१ ॥ अल्लमप्रभूनें ज्या सरोवरांतील पाण्यास हात लावावा, तें पाणी अमृतासारखें गोड होत असे; अल्लमप्रभूनें ज्या ठिकाणीं एक दिवस मुक्काम करावा, तें स्थल पृथ्वीवर प्रसिद्ध क्षेत्र होत असे. ॥ २२ ॥ वाटेनें अल्लमप्रभु जात असतां, लोकांनीं वेळोवेळीं उघे, उघे, असा शब्द उच्चारून त्याचा जयजयकार करावा. अशा रीतीनें जातां जातां परमेश्वराचें राहण्याचें मुख्य स्थान, सर्व प्रकारच्या सिद्धि जेथें प्राप्त होतात, अशा प्रसिद्ध श्रीगिरिपर्वतास प्रभु येऊन पोंचला. ॥ २३ ॥ या पर्वताचे अत्युत्तम गुण शेषाच्यानेंही वर्णन करवत नाहींत, या श्रीगिरिपर्वतानें अतिशय तपश्चर्या केली होती, ह्मणूनच त्यास अतिशय ऐश्वर्य येऊन तो शोभत होता. ॥ २४ ॥ रसवाद ( धातूंची माहिती ) वयाचें प्रमाण कमज्यास्त करणें, वशीकरणाचें साधन, अंजनें, औषधें, दर्शनावश्यकता ( कोणालाही भेटण्याची इच्छा झाल्यास ती परिपूर्ण होणें, ) वगैरे सर्व गोष्टींची, मांत्रिक लोकांस श्रीगिरिपर्वतावर सिद्धि होत असे. ॥ २५ ॥ लोकांत विचित्र गुण असणाऱ्या अनेक वनस्पति व त्यांच्या मुळ्या, अमृतसंजीवनी इत्यादि

**सकलार्थसुसिद्धयस्सुधारसकुण्डानि च तत्र संति हि ॥ २५ ॥ सुरधेनुनिधानकल्पकद्रुमचिंतामणिमुख्यसिद्धिदः । असमानतया शिवागमे जयति श्रीगिरिरेव भूतले ॥ २६ ॥ महिमा खलु पर्वतेशितुर्लतिका यत्र नटंति भूरुहः । प्रहसन्ति शिला वदन्त्यहो तरवः पुष्टतराः फलंत्यरं ॥ २७ ॥ गिरिशृंगगता महाह्रदाः प्रददत्यम्बुनिषेवणान्नृणां । तनुसिद्धिमथाभिषेचनाद्भुवि जातिस्मरतां विशेषतः ॥ २८ ॥ इतरेतरवैरमुत्सृजन् सततं चित्रमृगव्रजोद्धुतः । विचलत्यचलेंद्रमौलिषु प्रमदं द्रष्टृदृशां विभावयन् ॥ २९ ॥ अपि सन्ति विचित्रमद्रिराट्शिखराण्यश्वधियाऽऽरुरोह यः । गमयन्ति तमाशु यानि तन्मनसा चिन्तितमुज्ज्वलं स्थलं ॥ ३० ॥ गिरिराजि लसन्ति सर्वतः प्रविशज्जन्तुततेर्निमेषतः । अतलादिपथप्रदर्शकान्यहहा दिव्यबिलान्यसंख्यतः**

---

सर्व तऱ्हेचीं औषधें, सकलार्थांची सिद्धि प्राप्ति करून देणारे पदार्थ, आणि अमृतकुंडें वगैरे, त्या श्रीगिरिपर्वतावर पुष्कळ आहेत. ॥ २६ ॥ कामधेनु, नऊ विधि, कल्पवृक्ष, चिंतामणि वगैरे रत्नांची तेथें प्राप्ति होते, शिवागमांत त्याच्यासारखा दुसरा पर्वत नाहीं ह्मणून वर्णन आहे. असा पृथ्वीवर श्रीगिरिपर्वत श्रेष्ठ आहे. ॥ २७ ॥ त्या श्रीगिरिपर्वताची काय योग्यता सांगावी? त्याच्यावर वेली बायकांप्रमाणें नाचतात, वृक्ष पुरुषांप्रमाणें हंसतात, शिला मनुष्यांप्रमाणें बोलतात. व इतर सर्व तऱ्हेचे वृक्ष अतिशय मोठमोठाले वाढून फळांनीं लवून जातात. ॥ २८ ॥ पर्वताच्या शिखरांवर, मोठमोठे डोह आहेत, व त्या डोहांतील पाणी पिणाऱ्या लोकांचे शरीराचें सार्थक होतें; त्या डोहांतील पाण्यांत स्नान केलें तर मनुष्यांस पूर्वजन्मांतील स्मरण होण्याचा अलौकिक गुण अंगीं येतो. ॥ २९ ॥ तेथील पशुपक्ष्यांचे समुदाय परस्परांतील वैरभाव सोडून परस्पर स्नेहभावानें वागतात. हा पर्वताच्या शिखरावर चढलेला पशुपक्ष्यांचा समुदाय पाहून, मनुष्यांच्या मनांस मोठी मौज वाटते. ॥ ३० ॥ पर्वतावर मौजेमौजेचीं अनेक शिखरें आहेत त्या शिखरांवर, घोड्यावर बसल्यासारखें वर जाऊन बसावें ह्मणून जो कोणी वर जाऊन बसतो, त्या बसणाऱ्याच्या मनाप्रमाणें तीं पर्वतशिखरें त्यांस त्यानें मनांत आणलेल्या सुंदर स्थलास नेऊन पोंचवितात. ॥ ३१ ॥ त्या श्रीगिरिपर्वतावर, जागोजाग आंत उतरणाऱ्या मनुष्यांस क्षणामध्यें अतलादिक पाताळांचे मार्ग दाखविणारीं मोठमोठीं खोलखोल बिळें

॥ ३१ ॥ बहुना किमु साधकोत्तमाः किमु वा साधितुमुद्यता भुवि । गिरिराजमुपेत्य निष्ठया प्रतपंतीप्सितमाप्नुवन्ति ते ॥ ३२ ॥ अथ तत्र गिरौ समस्तसिद्धीरहमाप्तोऽखिलयोगवान्किलेति । वसति स्म समाययौ प्रभुस्तं हृदि गोरक्षमुनिं परामृशन् सन् ॥ ३३ ॥ रोगार्तसन्निधिमिवामृतमादिनाथस्संजीवनीव लतिका व्यसुसन्निधानं ॥ गोरक्षनाथनिकटं प्रभुराप शीघ्रं सुज्ञानसंपदुदयोर्जितपुण्यराशिः ॥ ३४ ॥ तं देवमागतमवेक्ष्य ससंभ्रमोऽयं गोरक्षनाथमुनिरात्महितं विचिंत्य । उत्थाय सांजलिपुटः प्रणतोर्घ्यपाद्याद्यभ्यर्चनं समतनोद्विनयोक्तिसारैः ॥ ३५ ॥ बृश्यासने समुपवेश्य सुभक्तिनम्रः पप्रच्छ देव कुत आगमनं कुतो वा । गन्तव्यमद्य भवदागमनस्य किं वा स्यात्कारणं मम कृपानिलयाभिधेहि ॥ ३६ ॥ युष्माकमागमनमद्य मदीयभाग्यादित्यौचितीपरिचितं वचनं निशम्य । मायां निरस्य तरसाऽनुजुघृक्षुरेनं प्रा-

---

अनेक आहेत. ॥ ३२ ॥ साधकश्रेष्ठांनो, फार काय सांगावें? अमुक एक आपलें काम व्हावें अशा हेतूनें श्रीगिरिपर्वतावर जाऊन जे एकनिष्ठपणानें तपश्चर्या करितात, त्यांचे हेतु परिपूर्ण होतात. ॥ ३३ ॥ असो. त्या श्रीगिरिपर्वतावर सर्व सिद्धि मला प्राप्त झाल्या आहेत, मी सर्व योगीश्वरांपेक्षां देखील श्रेष्ठ आहें, असें समजून गोरक्षनाथ राहत होता; त्या गोरक्षनाथाचा मनांत शोध करीत करीत अल्लमप्रभु चालला. ॥ ३४ ॥ रोगानें पीडिलेल्या मनुष्याजवळ जसें अमृत जावें, किंवा मरण पावलेल्या मनुष्याजवळ जशी अमृतसंजीवनी वल्लि जावी, त्याचप्रमाणें गोरक्षनाथाजवळ, उत्तम ज्ञानाच्या संपत्तीमुळें ज्याचा पुण्यसंचय उत्तम रीतीनें फलद्रूप झाला आहे, असा तो आदिनाथ अल्लमप्रभु जाऊन पोंचला. ॥ ३५ ॥ तो अल्लमप्रभु आलेला पाहतांच, गोरक्षनाथ मुनि आपल्या कल्याणाचा विचार करून दोन्ही हात जोडून उठून उभा राहिला, व नमस्कार करून नम्रतेनें गोडगोड भाषणें करून त्यानें अर्घ्य पाद्य वगैरेंनीं यथास्थित रीतीनें प्रभूची पूजा केली. ॥ ३६ ॥ अल्लमास गोरक्षनाथानें दर्भासनावर बसविलें, व तो भक्तिपूर्वक नम्रपणानें त्यास विचारूं लागला, ईश्वरा, आपण कोठून आलां? आतां येथून पुढें कोठें जावयाचें? तुमचें येथें येण्याचें काय कारण आहे? हें सर्व कृपा करून मला सांगा; आपण फार कृपाळू आहां. ॥ ३७ ॥ आपण येथें आलां तें फक्त माझें दैव चांगलें होतें ह्मणून मला दर्शन देण्यासाठीं आलां; असें आदरसत्काराचें गोरक्षनाथाचें बोलणें ऐकून, त्याचें

**चुर्यधुर्यवचसा प्रभुराह देवः ॥ ३७ ॥ गोरक्ष भो वयममी भुवि जन्ममृत्युत्रस्तान्सुसाधकतमान् घनचिन्मयांगान् । लिंगैक्यबोधकथया सुधया विधातुं वेदागमोक्तविधयाऽविरतं चरामः ॥ ३८ ॥ इत्याकलय्य वचनं प्रभुलिंगमूर्तेर्यल्लौकिकोक्तिभिरयं परमार्थमाह । मां ज्ञातवानिव पुरेत्यथवा गुरुः स्याद्गोरक्षनाथ इति चिंतितवान् हृदन्ते॥३९॥ पप्रच्छ च प्रभुमसावनघ त्वदीयं दृष्टं पुरेव न हि सम्यगवैमि रूपं । भात्यन्यवन्नहि पुरातनवेषभाषा नैसर्गिकीं तव न वेद्मि विशिष्य वृत्तिं ॥ ४० ॥ आस्तां हृदन्तरविवेककथा कथंचिद्विज्ञाय बाह्यमथ पूजयितुं हि योग्यः । लोके जनोऽल्लम इतीरितमस्य बुद्ध्वा गोरक्षमाह सहसा प्रहसन्मुखाब्जः ॥ ४१ ॥ स्वात्मानमेव न हि वेत्ति तमोभरेण योऽसौ परस्य हृदयं कथमत्र विद्यात् । क्षुद्बाधया प्रतिगृहं भुवि पर्यटेद्यः क्षु-**

---

अज्ञान दूर करून त्याच्यावर लवकर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें अतिशय चतुरपणाच्या भाषणानें प्रभु त्यास ह्मणाला. ॥ ३८ ॥ अरे गोरक्षा, आह्मी, जन्ममृत्यूनें त्रासलेल्या व ह्या दुःखांतून आपली मुक्तता व्हावी असें इच्छिणाऱ्या मुमुक्षु व साधक लोकांस, वेद आणि आगम ह्यांत जो चांगल्या रीतीनें सांगितलेला आहे, असा लिंगैक्याचा उपदेश करण्याकरितां नेहमीं पृथ्वीवर फिरतों. ॥ ३९ ॥ अशा रीतीचें प्रभुलिंगमूर्तीचें बोलणें ऐकून गोरक्ष मनांत ह्मणूं लागला, जरी ह्यानें लौकिक रीतीनें मला सांगितलें तरी तें वास्तविक सर्व खरें आहे; मला ह्यानें पूर्वी पाहिलें असावें किंवा हा माझा गुरु आहे, अशा प्रकारचे आपले मनांत गोरक्षनाथ विचार करूं लागला. ॥ ४० ॥ तो अल्लमप्रभूस नम्रतेनें विचारूं लागला, हे निर्मलस्वरूपा, आपलें रूप पूर्वी कधीं तरी मीं पाहिलें असावें असें मला वाटतें, परंतु बरोबर आठवत नाहीं, तुझें तेज, तुझी बोलण्याची प्रौढी, आणि तुझा वेष हीं सामान्य मनुष्याप्रमाणें दिसत नाहींत, (अलौकिक दिसतात; ) अशा प्रकारचा तुझा वेष वगैरे पूर्वीं कधीं पाहिल्याचें मला स्मरत नाहीं. ॥४१॥ कोणी कोणाच्या मनांतील विचार जाणत नाहीं, परंतु, बाहेरचें जें आपलें वर्तन मला दिसतें, त्यावरून मला आपण पूजा करण्यास योग्य दिसतां, लोकांमध्यें आपण अल्लम ह्या नांवानें प्रसिद्ध आहां. असें त्या गोरक्षाचें बोलणें ऐकून अल्लमप्रभु त्यास हंसत हंसत ह्मणूं लागला. ॥ ४२ ॥ जो आपल्या अज्ञानपणाच्या अतिशयतेमुळें आपले आपणास ओळखूं शकत नाहीं, तो दुसऱ्याचें मन काय ओळखणार? ज्याला स्वतःला भूक लागून जो ती दूर करण्यासाठीं दारोदार

**णाशनौषधमयं कथमेव दद्यात् ॥ ४२ ॥ अन्धस्य हस्तभरिते मुकुरेऽपि किं स्यात्साध्यं तथैव बहिरक्षियुगे स्थितेऽपि । विज्ञाननेत्ररहितस्य फलं किमस्ति साधारणं विषयवर्तनमाः पशूनां ॥ ४३ ॥ वाक्चातुरीप्रकटनैकपरा हि धूर्तास्तेषां प्रबोधगरिमा कथमभ्युदेति । देहात्मवाद इव भाति शरीरमेव संसाधनीयमिति मूढमतिः पशूनां ॥ ४४ ॥ काये स्थिरे सति हि साध्यतमा विमुक्तिः काये कदाऽपि शिथिले नहि मुक्त्युपायः । तत्कायसिद्धिरधिकेति तदर्थचिन्ता कापालिकं मतमिति प्रवदन्ति तज्ज्ञाः ॥ ४५ ॥ त्वङ्मांसमज्जरुधिरास्थिशिरालिमेदोबीभत्सदुर्भरमिदं मलमूत्रसिक्तं । देहं मदीयमिति तत्र कृताभिमानः कापालिकस्य निजभक्तिरसः कथं स्यात् ॥ ४६ ॥ श्रुत्वाऽल्लमोदीरितमत्युदारं गोरक्षनाथः पुनराह देवं । शृणुष्व सिद्धां-**

---

भिक्षा मागत फिरतो, तो दुसरा कोणी उपाशी मरत असल्यास त्यास भूक नाहींशी होण्याचें औषध कसें देऊं शकेल? ॥ ४३ ॥ आंधळ्या मनुष्यास इतर लोकांसारख्या डोळ्यांच्या आकृति मात्र आहेत, परंतु त्यास कांहींएक दिसत नाहीं; अशा आंधळ्याच्या हातांत एक मोठा थोरला आरसा दिला तर काय उपयोग आहे? तसेंच, ज्या मनुष्याला चर्मचक्षु मात्र आहेत, परंतु ज्ञानदृष्टि नाहीं, त्याला आत्मज्ञानासंबंधीं काय समजणार? अरे सामान्यतः ते लोक जनावरांप्रमाणें आहेत दुसरें काय? ॥ ४४ ॥ धूर्त लोक फक्त बोलण्याचालण्याची रीति प्रौढपणाची दाखविण्यांत मोठे हुशार असतात, त्यांना ज्ञान कसें प्राप्त होणार? शरीर कायम ठेवलें ह्मणजे आत्मज्ञान झालें, अशी मूढ मनुष्यांसारखी देहात्मवाद्यांची अडाणीपणाची समजूत आहे. ॥ ४५ ॥ शरीर फार दिवस टिकलें ह्मणजे मोक्ष मिळविला, तें जर कां कधीं नाश पावलें ह्मणजे मोक्षाचा मार्ग खुंटला, ह्यास्तव शरीराची सिद्धि ( बळकटी ) करणें श्रेष्ठ आहे, आणि काळजी करणें ती शरीरसिद्धीचीच करावी; या समजुतीस शहाणे लोक कापालिकमत असें ह्मणतात. ॥ ४६ ॥ कातडी, मांस, मज्जा, रक्त, हाडें, शिरांचा समुदाय, मेद ह्यांच्या संसर्गामुळें अतिशय दुर्गंधि व मलमूत्रानें भरलेलें शरीर माझें आहे, असें समजून त्याविषयीं व्यर्थ अभिमान बाळगणाऱ्या कापालिकाला आत्मभक्तिरसाची गोडी कशी लागणार? कधींच लागणार नाहीं. ॥ ४७ ॥ अशा रीतीचें अल्लमाचें प्रौढपणाचें बोलणें ऐकून गोरक्षनाथ पुन्हा अल्लमप्रभूस ह्मणाला; श्रेष्ठा, तूं सिद्धान्ताचा

**तद्विधिं महात्मन्यत्साधकाः सिद्धिसुखं प्रयान्ति ॥ ४७ ॥ अभ्यास-संपत्तिवशेन कायो यस्य स्थिरः स्यात्तमुदारशक्तिं । माया न संस्प्रष्टुमपि क्षमेत मृत्युः पुरःस्थातुममुष्य भीतः ॥ ४८ ॥ प्राप्नोति कायोऽक्षरतां निकामं वयं तु वाग्जालकथां न विद्मः । तत्कायसिद्धिं तव दर्शयामः पश्येति चोक्तः प्रभुराह भूयः ॥ ४९ ॥ गोरक्ष किं वक्षि तनोः स्थिरत्वे किं नित्यता स्यादवरिष्टशक्तिः । माया कथं वा विजिता भवेत्सा मोक्षः कथं वाऽस्तु मृतेरभावः ॥ ५० ॥ क्षरं समस्तं किल भूतजातं कूटस्थ एवाक्षर इत्युदीर्य । क्षराक्षरेशो हरशब्दवाच्यस्तद्भक्तिमानेष्यति मोक्षलक्ष्मीं ॥ ५१ ॥ तस्मात्तनोरक्षयतां न विद्धि भ्रांत्या तनुर्नक्ष्यति तावकीना । इत्युक्तवन्तं प्रसमीक्ष्य देवं गोरक्षनाथः सहसाऽब्रवीत्तं ॥ ५२ ॥ कथां परित्यज्य बहुप्रकारां गृहाण तूर्णं निशितं कृपाणं । निधेह्यवष्टभ्य बलं त्वदीयं मदीयकायेऽत्र त-**

---

प्रकार नीट समजून घे; त्यामुळें साधक लोक मुक्तिसुखाचा उपभोग घेतात. तो प्रकार मी तुला सांगतों, ऐक. ॥ ४८ ॥ अभ्यासरूपसंपत्तीच्या साह्यानें (योगाभ्यासानें) ज्याचें शरीर दृढ झालें आहे, त्या शक्तिमान् पुरुषाला माया (अज्ञान) मुळीं शिवत देखील नाहीं; व मृत्यु तर त्या पुरुषापुढें उभें राहण्यास देखील भितो. ॥ ४९ ॥ शरीर च खरोखर अविनाशपणास पावतें हें आह्मांस समजतें; याखेरीज इतर तोंडच्या गप्पा आह्मांस मान्य नाहींत. ती शरीरसिद्धि कशी असते ती दाखव ह्मणशील तर तुला दाखवितों; असें गोरक्षानें ह्मटल्यावर पुन्हा त्यास अल्लमप्रभु ह्मणाला, ॥ ५० ॥ गोरक्षनाथा, काय हें भलतेंच बोलतोस? शरीर स्थिर झालें ह्मणून कोठें अविनाशीपणा येतो काय? जिची शक्ति अमर्याद आहे ती माया कां कोठें जिंकली जाते? अशानें कां कोठें मोक्ष होतो? किंवा मरण तरी चुकतें? ॥ ५१ ॥ हा सर्व पंचभूतांपासून उत्पन्न झालेला वस्तुसमुदाय नाशिवंत आहे; कूटस्थास (साक्षीभूत आत्म्यास) अक्षर ह्मणजे अविनाशी ह्मणतात. विनाशी आणि अविनाशी वस्तूंचा प्रभु हर (महादेव) ह्या नांवानें प्रसिद्ध आहे; त्याची भक्ति करणारा भक्त मोक्षरूप लक्ष्मीस प्राप्त करून घेतो. ॥ ५२ ॥ ह्यासाठीं गोरक्षनाथा, मूर्खपणानें हें माझें शरीर अविनाशी आहे असें मानूं नकोस, तुझें शरीर नाशिवंत आहे. असें बोलणाऱ्या त्या अल्लमप्रभूस पाहून गोरक्षनाथ एकदम ह्मणाला, ॥ ५३ ॥ ह्या नानातऱ्हेच्या भलत्या भलत्या गोष्टी सांगूं नकोस, जलदी करून हातांत तीक्ष्ण धारेची तरवार घे, व तुझ्या अंगांत जितकें बळ

**दीयधारां ॥ ५३ ॥ मदीयकाये यदि रोममात्रं त्रुट्येत चेत्तर्हि न कायसिद्धिः । अहं च लोके न भवामि सिद्धस्सत्यं ब्रुवे प्रत्ययमाशु पश्य ॥ ५४ ॥ गोरक्षमालोक्य वदन्तमित्थं प्राह प्रभुश्छेदनभेदनाद्यैः । परीक्षणं ह्यासुरमामनन्ति मतं न चास्मद्गुरुसंमतं तत् ॥ ५५ ॥ छिद्येत चेत्तावकमंगमेतत्तदा कथं स्याद्भुवि सिद्धिमान्कः । एवंविधोक्तिः सुविवेकजा किं सद्धर्ममार्गः किमु मृत्यभावः ॥ ५६ ॥ अस्मादृशानां पुरतो न चेत्थं वक्तव्यमात्मा मरणादिधर्मैः । न स्पृश्यते संगतयेति चोक्तो गोरक्षनाथः प्रभुमाह भूयः ॥ ५७ ॥ संदेहवार्तां परिमुच्य सद्यस्संताडयैनं मम वज्रकायं । खड्गेन मे नास्ति विनाशलेशः सिद्धिं प्रकाशीकुरु मामकीनां ॥ ५८ ॥ ममाभिलाषं परिपूरयैनं न खड्गधाराहतिमंतरेण । चेतो नु तुष्येदिति मामकीनं निर्बध्यमानो हठयोगिनाऽभूत् ॥ ५९ ॥ एतस्य चित्तं विकलं न भूयात्खड्गं**

---

असेल तितकें खर्च करून ती माझ्या शरीरावर मार. ॥ ५४ ॥ माझ्या शरीरावरील जर एक केंस वांकडा झाला तर माझी शरीरसिद्धि खरी नव्हे, मी ह्या जगांत योगसाधन करणारा सिद्धच नव्हें; हें मी खरें बोलतों ह्याचा अनुभव तर पहा. ॥ ५५ ॥ असें बोलणाऱ्या गोरक्षनाथास पाहून अल्लमप्रभु ह्मणाला, तोडणें, फोडणें वगैरे तऱ्हेनें परीक्षा करणें ह्यास राक्षसी उपाय ह्मणतात; व हें मत आमच्या गुरूस पसंत नाहीं. ॥ ५६ ॥ तुझें हें अंग जर कदाचित् तुटलें तर पृथ्वीवर तुझ्या मागें योगसिद्धि पावलेला मनुष्य कोण राहिला? तेव्हां तुझें असें हें बोलणें विचार करून पाहतां योग्य आहे काय? तसेंच मरण आलें नाहीं असें गृहीत धरलें, तरी त्यापासून धर्ममार्ग काय वाढला? ॥ ५७ ॥ यास्तव आमच्यासारख्याच्या पुढें तुझें आत्म्याला मरण वगैरे विकारांचा कांहींएक संबंध नाहीं. हें असें बोलणें शोभत नाहीं; असें ह्मटल्यावर गोरक्षनाथ अल्लमप्रभूस पुन्हा ह्मणाला, ॥ ५८ ॥ तूं मनामध्यें काडीमात्र शंका न घेतां, लवकर माझ्या वज्रासारख्या बळकट असलेल्या शरीरावर खुशाल प्रहार कर. खड्गानें माझ्या शरीराचें काडीमात्र नुकसान होणार नाहीं. माझ्या अंगीं जी योगसिद्धि आहे तिचा प्रकाश कर. ॥ ५९ ॥ तूं माझी ही इच्छा परिपूर्ण कर, माझ्या अंगावर खड्गप्रहार केल्याखेरीज माझ्या मनास मुळींच संतोष वाटणार नाहीं. अशी त्या हठयोगी गोरक्षनाथानें अल्लमास मोठी भीड घातली. ॥ ६० ॥ मग अल्लमानें मनांत आणलें कीं, ह्याचें मन खट्टू न होण्यासाठीं ह्याच्या शरीरावर तर आतां प्रहार करतोंच;

शरीरे निदधामि बाढं । मृतो यदि स्यादसिना विभिन्नः स्रक्ष्यामि गोरक्षयमीन्द्रमन्यं ॥ ६० ॥ इति प्रभुस्तत्करदत्तखड्गं स्वीकृत्य दृष्ट्वा निशितं विधाय । मुष्ट्या त्सरौ तस्य दृढं गृहीत्वा धारां विधून्वन् निदधौ तदंगे ॥ ६१ ॥ तदाहतिस्फूर्जितघोरशब्दाच्चचाल भूरद्रिगणश्चकम्पे । नाच्छिद्यतांगे क्व नु लोममात्रं रराण वज्राहतशैलवत्तत् ॥ ६२ ॥ नाथो जगाद यमिनं न हि सिद्धिरेषा माया प्रपंचजटिलीकरणं तनोस्ते ॥ संपादितं खलु वृथा यदयं रराणशब्दोऽस्ति यत्र मृतिरत्र यथार्थमेतत् ॥ ६३ ॥ किं वाक्सहस्रकथनैः प्रलयं विजित्य कायस्य सिद्धिरिति या स मृषा प्रवादः । इत्यल्लमः करतलस्थितखड्गमुष्टिं त्यक्त्वा न्यपातयदमुं प्रहसन्पृथिव्यां ॥ ६४ ॥ हा सिद्धयः कथमिमाः प्रलयात्युदर्कास्तत्तत्प्रमाणविधयास्त्यखिलस्य कालः । य-

---

ह्या तरवारीच्या वारानें जर हा तुटून छिन्नभिन्न होऊन मेला, तर, मी आपल्या सामर्थ्यानें दुसरा गोरक्षनाथ योगी उत्पन्न करीन. ॥ ६१ ॥ अशा विचारानें मग अल्लमानें त्याच्या हातांतील तरवार घेतली व तिच्याकडे नीट न्याहाळून पाहून तिला धार लाऊन चांगली तयार केली, व आपल्या मुठीनें त्या तरवारीची मूठ बळकट धरून गोरक्षनाथाचे अंगावर पुष्कळ जोरानें प्रहार केले. ॥ ६२ ॥ त्याचे अंगावर जे तरवारीचे प्रहार झाले, त्या प्रहारांचे आवाजानें पृथ्वी कांपूं लागली, व पर्वतांचा समुदायही थरथर कांपूं लागला. परंतु त्या गोरक्षनाथाच्या अंगास काडीमात्र धक्का पोंचला नाहीं, पण पर्वतावर वज्रप्रहार केला असतां जसा खणखण आवाज होतो, तसा आवाज ऐकूं येऊं लागला. ॥ ६३ ॥ अल्लमप्रभु त्या गोरक्ष सिद्धास ह्मणाला, अरे ही सिद्धि नव्हे, ही माया आहे; तुझें शरीर हें तूं एक प्रपंचसमुदायाला कारण च संपादन केलेंस, ( तुझा जन्ममरणाचा फेरा चुकला नाहीं. ) हें कृत्य सर्व फुकट आहे, यांत कांहीं अर्थ नाहीं; ज्या ठिकाणीं खणखण असा आवाज होतो त्या ठिकाणीं मरण आहेच. हें अगदीं पक्कें समज. ॥ ६४ ॥ उगीच शेंकडों गप्पा झोंकण्यांत काय अर्थ आहे? प्रळयकाळ आला तरी ह्या कार्यसिद्धीचा नाश होत नाहीं हें ह्मणणें अगदीं खोटें आहे; असें ह्मणून आपल्या हातांतील तरवार जमिनीवर फेंकून देऊन, अल्लम हंसूं लागला. ॥ ६५ ॥ वाहवा रे सिद्धि! ह्या काय प्रलयकाळानंतर देखील टिकतात? ज्या ज्या प्रमाणानें कायसिद्धि होते, त्या त्या प्रमाणानें ती असुक वर्षेंपर्यंत टिकते, अशी कालमर्यादा

**त्कायसिद्धिपदशब्दितमस्ति वस्तु तत्तद्ब्रवीमि शृणु वेदशिखारहस्यं ॥ ६५ ॥ वातातपाग्न्यशनिवृष्टिहिमैरपीड्यो यो रुग्जरामरणवर्जितदिव्यदेहः । संबंधवर्जनधियात्मन ईश्वरस्य पूर्णं समाधिमधिरुह्य स एव योगी ॥ ६६ ॥ भूतानि तद्गतगुणांश्च विजित्य बाह्यस्पर्शेष्वसक्तहृदयः समहेमलोष्टः । दृष्टोऽपि दैहिकगुणैर्हृदि तैरजुष्टो यः कायसिद्धिभरितोऽस्ति स एव योगी ॥ ६७ ॥ इत्थं वदन्तमवलोक्य गुरुं गुरूणां गोरक्षनाथमुनिरस्य वचःप्रणाली । काचित्तदद्य धृतिदार्ढ्यमहं परीक्ष्य संभावयामि महनीयतयेति मेने ॥ ६८ ॥ संगृह्य तं सुनिशितं करवालमुद्यद्धाराविधूननचणः करलाघवेन । सव्यापसव्यविधयाशु बिभेद मूर्तिं सर्वत्र चित्रगतिरेष विभोर्नभोवत् ॥ ६९ ॥ तेनाहतं गगनवत्प्रभुदेहमासीदीषत्क्षतेरपि तदा विषयं सुरूपं । निः-**

आहे; प्रत्येक प्राण्यास ( वस्तूस ) नाश आहे च. जें कायसिद्धि नांवाचें उपनिषदांचें रहस्य आहे तें मी तुला सांगतों ऐक. ॥ ६६ ॥ वायु, ऊन, अग्नि, वीज, पाऊस, थंडी ह्यांपासून ज्याच्या शरीराला इजा होत नाहीं; रोग, ह्मातारपण, मरण ह्यांची पीडा ज्याच्या शरीरास नसून, ज्याचें शरीर नेहमीं तेजःपुंज असतें, व निष्कामबुद्धीनें जो आत्मस्वरूपी ईश्वराच्या पूर्ण समाधीवर चढतो, त्यास योगी ह्मणावें. ॥ ६७ ॥ पंचमहाभूतें आणि त्यांमध्यें असणारे त्यांचे गुण जिंकून बाह्यस्पर्शावर ज्याचें मन आसक्त होत नाहीं, ज्याला सोनें व मातीचें ढेंकूळ सारखें आहे, त्याला बाहेरून देहाचे गुण आहेत असें दिसेल, तरी मनामध्यें त्याला शरीरगुणाचा संबंध नसतो; यालाच कायसिद्धि झाली असें ह्मणावें, व तोच योगी होय असें समजावें. ॥ ६८ ॥ ह्याप्रमाणें बोलणाऱ्या त्या सर्व गुरूंच्या गुरूकडे ( अल्लमप्रभूकडे ) गोरक्षनाथ मुनीनें पाहिलें, व त्याच्या बोलण्याचा खरेखोटेपणा, व त्याच्या धैर्याचा दृढपणा, व त्याचा मोठेपणा, यांची आपण परीक्षा करून पहावी, असा त्यानें आपल्या मनांत विचार केला. ॥ ६९ ॥ मग त्यानें ती तीक्ष्ण धारेची जमिनीवर पडलेली तरवार उचलून घेतली, व आपल्या हस्तकौशल्यानें डाव्या उजव्या बाजूनें अल्लमप्रभूच्या अंगावर चोहोंकडून प्रहार केले; परंतु अल्लमप्रभूचे अंगाचा मुळींच ठिकाण लागेना, तें आकाशासारखें निराकार दिसूं लागलें. ॥ ७० ॥ त्यानें तरवारीचा प्रहार करितांच अल्लमाचें अंग आकाशासारखें निराकार झालें, त्यामुळें त्यावर प्रहार करतांच येईना; तरी त्याचें सौंदर्य अतिशय दिसत होतें; त्याच्यावर प्रहार केला तरी आवाज निघेना

शब्दमप्रतिमकान्तिविकारशून्यं दृष्ट्वा यमी स बहुधा विचचार भूयः ॥ ७० ॥ उत्प्लुत्य मूर्धनि निपत्य पदद्वयेऽपि पार्श्वस्थितो भुजकटीयुगलेक्षणयापि । सर्वत्र चित्रगतिरात्तविधूतखड्गो रोम्णां च संधिषु चकार करप्रसारं ॥ ७१ ॥ पक्षीव निश्चलतया गगनप्रदेशे स्थातुं पुरा बहुलकंपितपक्ष्मयुग्मः । उत्प्लुत्य खे पुनरपि प्रणिपत्य भूयश्चोत्प्लुत्य पार्श्वचलितः स्थिरतां प्रपेदे ॥ ७२ ॥ आश्चर्यमेतदिति तस्य महामहत्वं विज्ञाय संयमिवरो भयभक्तिनम्रः । नत्वाल्लमेंद्रमपसृज्य करस्थ खड्गं संताडयन्निजकपोलयुगं बभाषे ॥ ७३ ॥ गुरुस्वाम्यस्माकं भवसि न हि चेत् सिद्धिरतुला तनोरित्थंरूपा भवति भुवने कस्य यमिनः । न चैतावन्मात्रो भजति जगदाश्चर्यकृदिदं महत्वं वेदान्तप्रथितपरमाद्वैतफलितं ॥ ७४ ॥ मद्देहमेतदसिखंडितमाशु चक्रे निर्घोषणं खणिति

---

व त्याच्या सौंदर्यामध्यें काडीमात्र कमीपणा येईना. तें पाहून तो गोरक्षनाथयोगी मनांत अनेक तऱ्हेचे विचार करूं लागला. ॥ ७१ ॥ त्यानें उडी मारून अल्लमाच्या डोकीवर प्रहार केला, पायांवर प्रहार केला, बाजूस उभें राहून प्रहार केला, हातांवर, कमरेवर, दोन्ही डोळ्यांवर देखील प्रहार केला. सर्व बाजूनें आपले अंगीं होतें नव्हतें तितकें चातुर्य दाखवून त्यानें तीक्ष्ण तरवार हातांत घेऊन अल्लमाच्या रोमांरोमांचे सांध्यांवर देखील हात चालविला. ॥ ७२ ॥ पांखरांप्रमाणें निश्चलपणानें आकाशांत राहण्यासाठीं अगोदर आपल्या दोन्ही डोळ्यांच्या पापण्या हालवून वर आकाशांत उडाला, पुन्हा खालीं येऊन पुन्हा वर उडाला, व बाजूकडे वळून मग स्तब्ध राहिला. ॥ ७३ ॥ हें मोठें आश्चर्य आहे व हें अल्लमप्रभूचें अलौकिक सामर्थ्य आहे असें त्या योगिश्रेष्ठानें ( गोरक्षनाथानें ) जाणलें, व त्यास अल्लमप्रभूविषयीं मनांत आदरबुद्धि उत्पन्न होऊन, तो भीतीनें व भक्तीनें खालीं वांकला, आणि त्यानें हातांतील तरवार टाकून देऊन अल्लमास नमस्कार केला. व तो आपल्या दोन गालांवर हात मारून घेऊन ह्मणूं लागला, ॥ ७४ ॥ अल्लमप्रभो, तूं आमचा गुरु व स्वामी आहेस, नाहींपेक्षा शरीराची ही अशी अवर्णनीय सिद्धि पृथ्वीवर दुसऱ्या कोणत्या योग्याला होणार? मुळींच होणार नाहीं. आपल्यासारखा सिद्ध योगी मीं पाहिला नाहीं, तुमचें महत्व जगाला थक्क करून टाकणारें आहे; वेदान्तशास्त्रामध्यें सांगितलेलें श्रेष्ठ अद्वैत तुमच्या अंगीं पूर्णपणें भरलें आहे खरें. ॥ ७५ ॥ माझें हें शरीर तूं तरवारीनें जेव्हां तोडूं लागलास, तेव्हां खणखण असा आवाज होऊन

निर्दलिताण्डभित्ति । देव त्वदंगमिदमंबरवद्विभाति निःशब्दमेव कथमद्य ममाभिधेहि ॥ ७५ ॥ गोरक्षमाह गुरुराट् शृणु सावधानः काये घनीभवति सापि घनैव माया । एतद्वयेपि सुघने भवति प्रपंचच्छाया स्थिरा क नु तदा तनुसिद्धिरेषा ॥ ७६ ॥ तस्मान्निरस्यति यदा हृदि कायमाये च्छाया विनश्यति तदा खलु सिद्धिरेषा । कैवल्यलक्षणवती भवति प्रसिद्धेत्युक्तः प्रणम्य पुनरल्लममाह योगी ॥ ७७ ॥ भो आदिनाथ मम कारणदेशिकेंद्र दातुं ममाप्रतिमसिद्धिरहस्यमेतत् । अत्यादरादनुगृहीतविलासभाषावेषस्त्वमागत इति स्म न वेद्मि किंचित् ॥७८॥ देव क्षमस्व कृपयाऽद्य ममापराधं दासोऽस्मि तेऽहमिति तत्पदयोः पपात । उत्थाप्य तं प्रभुरनुत्थितमस्य चित्तं कृत्वा शिवानुभवपूर्णमथाब्रवीच्च ॥ ७९ ॥ लोहं यथैव पुटपाकवशाद्विभाति तद्वद्विरागपरिपाकवशात्फलाप्तिः । गोरक्षनाथमिति सत्कृप-

---

सर्व त्रैलोक्य दणाणून गेलें; अल्लमप्रभो, तुझें अंग तर आकाशासारखेंच मला निराकार भासलें, त्यापासून कांहींच आवाज निघाला नाहीं, हें कसें? हें मला कृपा करून सांग. ॥ ७६ ॥ गोरक्षास अल्लमप्रभु ह्मणाला, अरे, चित्त देऊन ऐक. शरीर बळकट झालें ह्मणजे ती मायाही बळकट होते, व हीं दोन्ही बळकट झाल्यावर प्रपंचाची सांवली दाट होते; मग त्या वेळीं शरीरसिद्धि कोठून होणार? ॥ ७७ ॥ ह्यासाठीं जेव्हां मनांतून शरीर आणि माया हीं दोन्ही नाहींशीं होतील, व त्यामुळें प्रपंचाची छाया नाहींशी होईल, त्या वेळीं ही शरीरसिद्धि होईल; तिचें मुख्य लक्षण ह्मटलें तर मोक्षप्राप्ति हें होय; व तें प्रसिद्ध आहे; असें ह्मटल्यावर अल्लमास नमस्कार करून पुन्हा गोरक्ष योगी ह्मणूं लागला. ॥ ७८ ॥ हे आदिनाथा, (मूलपुरुषा,) तूं माझा उपदेशकर्ता गुरु आहेस, मला उत्तम रीतीचें योगसाधनाच्या सिद्धीचें रहस्य शिकविण्याकरितां तूं देशिकाचा वेष घेऊन सौम्यपणाची भाषा बोलत मजकरितां येथें आलास, हें मला मुळींच समजलें नाहीं. ॥ ७९ ॥ अल्लमप्रभो, मला क्षमा कर, कृपा करून माझे अपराध पोटांत घाल. मी तुझा दास आहें, असें ह्मणून गोरक्षनाथ अल्लमप्रभूच्या चरणावर लोळूं लागला; मग अल्लमप्रभूनें त्यास आपल्या हातानें धरून उठविलें, व उठतां उठतांच त्याचें मन शिवज्ञानाच्या अनुभवानें परिपूर्ण केलें. ॥ ८० ॥ लोखंड असलें तरी त्यास सोनें करण्याच्या कृतीनें वनस्पतींचा रस लाऊन तापविलें ह्मणजे तें सोनें होतें, व शोभूं लागतें; त्याप्रमाणें वैराग्याच्या

**याल्लमेंद्रे पश्यत्यनुग्रहदृशा विचचाल रागः ॥ ८० ॥ तेनैव सार्धमभिदुद्रुवुरस्य तावन्मात्सर्यदंभमदमुख्यमहोपसर्गाः । संभाषणादपगतौ तद्वोधगर्वौ तद्धस्तमस्तकतयाऽपससार माया ॥ ८१ ॥ संप्रार्थयत्प्रभुमपारकृपाम्वुराशिं गोरक्षसंयमिवरो जगदेकबन्धो । धन्योऽस्मि तावकपदाब्जपरागलेशसंस्पर्शनादधिकमप्यहमद्य याचे ॥ ८२ ॥ आज्ञापयोत्तमगतिं मम भक्तबन्धो बन्धो हि सिद्धपदवीरितकायसिद्धिः । इत्यर्थयन्तमनुगृह्य परार्थवेषस्तोषं पुपोष वचनामृतधारयास्य ॥ ८३ ॥ गोरक्ष साधु शृणु किं बहुनोदितेन यावन्न संत्यजति मायिककायसंगं । आत्मा न तावदुदयात्तनुसिद्धिरेका बोधस्य केवलमसाधनमेव जन्तोः ॥ ८४ ॥ यद्युत्सहेत हृदयं तनुसिद्धिमोक्षं सत्सा-**

---

परिपूर्णतेमुळें सिद्धींची प्राप्ति होते; असें गोरक्षनाथाकडे कृपादृष्टीनें अल्लमप्रभु पाहून बोलत असतां, गोरक्षाचे मनांतून शरीरावरील ममता तत्काळ निघून गेली. ॥ ८१ ॥ तिच्या बरोबरच मत्सर, दंभ, अहंकार वगैरे मोठे मोठे उपसर्ग ( पीडा ) गोरक्षनाथाच्या मनांतून पळून गेले, अल्लमप्रभूबरोबर भाषण केल्यामुळें त्याच्या मनांतील अज्ञान व गर्व नाहींसा झाला; व अल्लमप्रभूनें त्याच्या मस्तकावर हात ठेविल्यामुळें त्या गोरक्षाचे मनांतून माया निघून गेली. ॥ ८२ ॥ मग तो श्रेष्ठ व मनाचें संयमन केलेला गोरक्ष कृपेचा मूर्तिमन्त महासमुद्रच अशा अल्लमप्रभूस ह्मणूं लागला, आपण सर्व जगाचे बंधु ( हितकर्ते ) आहां, आपल्या चरणकमलावरील यत्किंचित् धूलीचा मला संपर्क झाल्यामुळें मी कृतार्थ झालों; तरी पण त्यापेक्षां कांहीं ज्यास्त मागणें मी आपल्याजवळ आतां मागतों. ॥ ८३ ॥ अल्लमप्रभो, तूं भक्तांचें रक्षण करणारा आहेस, माझा हितकर्ता आहेस, जिला सिद्धपदवी नांवाची कायसिद्धि ह्मणतात, ती प्राप्त करून घेण्याची उत्तम रीतीची योगसाधनाची रीति मला शिकव; ह्याप्रमाणें प्रार्थना करणाऱ्या त्या गोरक्षनाथास, लोकांच्या कल्याणाकरितांच अवतार घेणाऱ्या त्या अल्लमप्रभूनें त्याच्याशीं अमृतासारखीं गोडगोड भाषणें बोलून, संतोष दिला. ॥ ८४ ॥ अल्लम ह्मणाला, साधो गोरक्षा, ऐक. फार सांगून काय उपयोग आहे? जोंपर्यन्त आत्मा मायामय ( अज्ञानात्मक ) शरीराचा संबंध सोडीत नाहीं, तोंपर्यन्त बोधाचा उदय होऊन ( यथार्थ रीतीचें आत्मज्ञान होऊन ) शरीरसिद्धि प्राण्यास प्राप्त होत नाहीं. ॥ ८५ ॥ जर तुझें मन शरीरसिद्धि आणि मोक्षप्राप्ति होण्याविषयीं उतावीळ झालें असेल, व त्याबरोबरच त्याचीं दोन्ही साधनेंही प्राप्त व्हावीं असें तुला

**धनद्वयमिदं सममेव लब्धुं । तर्हि द्वयोरपि गती परिहृत्य भक्त्या श्रीमद्गुहेश्वरपदाम्बुरुहे भजस्व ॥ ८५ ॥ शीतापनोदमिव पाककथा-प्रवृत्तो भक्तो गुहेशपदयोस्तु समस्तसिद्धिं । आप्नोषि तं परिचरेति गुरूपदिष्टो निष्ठामवाप्य हृदये गुरुमाह योगी ॥ ८६ ॥ स्वामिन् गुहेश इति कोऽयमपूर्व उक्तस्सोऽयं क्व वा वसति खेलति किं-प्रकारः । तं केन वात्र विधिना यमहं भजेयं ब्रूहीति तेन विनयादुदितो-ऽब्रवीत्तम् ॥ ८७ ॥ गोरक्ष संशृणु गुहेश्वरशब्दवाच्यो नान्यो मदस्ति भुवनत्रितयेऽपि नूनं । निःसंशयो भव मनस्यकलंकवर्त्मा मामेव भावय सदाऽऽत्मसमाहितोऽसि ॥ ८८ ॥ नाम्ना गुहेति परमात्मनिवा-सभूमिस्तस्यां सदा पतिरहं निवसामि नूनं । तन्नाम मामकमिदं कुहनानृमूर्त्या सर्वत्र साधु विहरामि बुधावनाय ॥ ८९ ॥ तस्मादहं सकलभूतहृदंतराले तिष्ठामि वल्लभतयेति भजन्ति ये मां । तेषां च**

---

वाटत असेल, तर त्या तुझ्या दोन्ही मार्गांस सोडून दे, आणि भक्तिपूर्वक गुहेश्वराच्या चरणकमलाची सेवा कर. ॥ ८६ ॥ स्वयंपाक करूं लागलें ह्मणजे अगोदर थंडी वाजत असते ती जाते, आणि आयतें काम होऊन जेवण्याचे पदा-र्थही तयार होतात. त्याप्रमाणें तूं महेश्वराच्या चरणकमलाची सेवा करूं लागलास, ह्मणजे तुला कायसिद्धि होईल, आणि मोक्षप्राप्ति ही होईल; ह्यास्तव तूं शिवभक्ति कर, असें अल्लमगुरूनें सांगितल्यावर त्याचे मनांत विश्वास उत्पन्न होऊन तो गोरक्षनाथ अल्लमास ह्मणाला. ॥ ८७ ॥ गुरुवर्या, गुहेश हा कोण? ह्याचें नांव आजपर्यंत पूर्वीं कधीं मीं ऐकिलें नाहीं, हा कोण? कोठें राहतो? कोणत्या प्रकारानें क्रीडा करितो? व कोणत्या रीतीनें मीं त्याची उपासना करावी? हें मला सांग; असें नम्रतेनें अल्लमास विचारल्यावर अल्लम त्यास ह्मणाला. ॥ ८८ ॥ गोरक्षनाथा, ऐक. गुहेश्वर माझ्याखेरीज दुसरा कोणी त्रैलोक्यांत नाहीं, मीच गुहेश्वर आहें, हें खरें आहे; तूं आपले मनांतील सर्व संशय सोडून दे, आणि निष्पाप रीतीनें नेहमीं मलाच भजत जा; तूं समजदार आहेस. ॥ ८९ ॥ गुहा ह्मटली तर परमेश्वराची रहावयाची जागा होय, आणि त्या जागेमध्यें मी सर्वांचा ईश्वर राहतों, हें खरें आहे, ह्मणून माझें वास्तविक नांव गुहेश्वर आहे, तरी, कृत्रिम शरीर धारण करून, मी ज्ञानी लोकांचें रक्षण करण्यासाठीं भूमीवर सर्व ठिकाणीं फिरतों. ॥ ९० ॥ ह्यासाठीं मी सर्व प्राणि-मात्रांच्या हृदयकमलामध्यें राहतों; जे लोक प्रेमभावानें मला भजतात, त्या

**निर्मलधियां मम नास्ति भेदस्सोऽहं तथैव सततं हृदि भावयस्व ॥ ९० ॥ मायाप्रपंचकलनं सकलं त्विदंता तत्संगतोपहितजीवचितिस्त्वहन्ता । सोऽहंतया द्वयमिदं प्रविलाप्य पूर्णाहंतामये शिवपदे स्थितिरित्युपास्तिः ॥ ९१ ॥ इत्थं निरंतरमुपास्तिरता हि जीवन्मुक्तिं भजन्ति भुवि केवलभक्तिनिष्ठाः । तस्माद्गुहेश्वरमुपास्व निजात्मबुद्ध्या कैवल्यमाप्नुहि बुधेत्युदितोऽब्रवीत्सः ॥ ९२ ॥ अध्यात्मशास्त्रकृतवासनयाऽलमार्य त्वं चेद्गुहेश्वर इदं किमु लिंगमंगे । चिज्ज्योतिषस्तव निरंजननिर्गुणस्य भेदोऽस्ति किं भ्रमकृतो निकृतोपयुक्तः ॥ ९३ ॥ गोरक्षमाह गुरुरस्म्यहमद्वितीयो भक्तेष्वनुग्रहदृशा धृतविग्रहः सन् । चित्प्राणलिंगमपि हस्ततले बिभर्मि श्रेष्ठैरनुष्ठितमिहान्यजनोऽनुतिष्ठेत् ॥ ९४ ॥ लोकोपकारकृतये बहिरिष्टलिंगं धृत्वा चरामि न भिदा मम**

---

निष्पाप बुद्धीच्या मनुष्यांत आणि माझ्यांत मुळींच निराळेपणा नाहीं. ते लोक तोच मी आहें, असें नेहमीं मनांत वागवीत जा. ॥९१॥ हा सर्व प्रकारचा प्रपंचाचा मायेचा पसारा दिसत आहे, व हाच इदंपणा होय, व त्यास अनुलक्षून राहाणारे प्रत्येक प्राणिमात्राचे विचार, हीच अहंता होय. सोहंपणानें (तो परमेश्वरच मी आहें अशा बुद्धीनें) इदंता दृश्यजग सत्य मानणें आणि अहंता दूर करणें, आणि पूर्णपणें सर्वत्र ईश्वर आहे अशी शिवाविषयीं दृढ बुद्धि ठेवणें, हीच उपासना होय. ॥ ९२ ॥ ह्याप्रमाणें नेहमीं शिवाच्या उपासनेमध्यें निमग्न असणारे लोक, व पृथ्वीवरील फक्त शिवभक्तीवरच पूर्णपणानें विश्वास ठेवणारे लोक हे जीवन्मुक्तिसुखाचा अनुभव घेतात; ह्यास्तव तूं आपल्या मनापासून एकाग्रनिष्ठेनें गुहेश्वराची आराधना कर, ह्मणजे हे चतुरा, गोरक्षनाथा, मोक्षपदास पावशील; असें ह्मटल्यावर गोरक्षनाथ पुन्हा अल्लमप्रभूस ह्मणाला, ॥ ९३ ॥ अध्यात्मशास्त्रांत वर्णन केल्याप्रमाणें वागलें ह्मणजे पुरे आहे; श्रेष्ठा, तूंच जर स्वतः गुहेश्वर आहेस तर आंगावर हें लिंग कशाकरितां बाळगण्यास पाहिजे? लिंग बांधण्याचें कांहीं एक कारण दिसत नाहीं, तूं स्वतः चिद्रूप आहेस, निरंजन आहेस, निर्गुण आहेस, तुला हा संशयांत पाडणारा निराळेपणा शोभतो काय? मुळींच शोभत नाहीं. ॥ ९४ ॥ गोरक्षनाथास अल्लमप्रभु ह्मणाला, मी एकच आहें, मी भक्तांवर कृपा करण्यासाठीं अवतार घेतों, तरी पण चित्स्वरूप प्राणलिंग नेहमीं हातांत बाळगितों. कां तर, श्रेष्ठ मनुष्यें जसें करितात, तसेंच इतर लोकही करितात. ॥ ९५ ॥ लोकांवर उपकार करण्याकरितां, हें मी उघड रीतीनें इष्टलिंग हातांत

तावता स्यात् । अन्तर्बहिःस्फुरितदिव्यपरप्रकाशलिंगैक्यसंगतिमुदा हरतः स्ववेषात् ॥ ९५ ॥ विज्ञानभक्तिसुविरक्तिमतां मतानि विच्छेदकान्यखिलसंशयबन्धनानां । सोऽहं पुरा रचितवान्यदसीति कोटिसंख्यायुतानि वचनानि जगद्धितार्थं ॥ ९६ ॥ तानि श्रुतिस्मृतिपुराणशुभागमार्थतात्पर्यसंग्रहतया सुविभावितानि । शृण्वंति ये त इह साधनतारतम्यान्मुक्तिं प्रयान्ति हतकिल्बिषचेतनास्ते ॥ ९७ ॥ धात्र्यां खुरल्युदितसाधनसाधकार्थी नानाविधायुधधरो हि परोपकृत्यै । तद्वन्ममापि समयोचितवेषभाषानैश्चल्यभंजनकृते न भवन्ति योगिन् ॥ ९८ ॥ येषां यथा हृदयवृत्तिरहं तथैव तेषां विमुक्तिपथमाशु समादिशामि । तद्वन्ममापि समयोचितवेषभाषास्संतीव वस्तुत इमा न निरंजनस्य ॥ ९९ ॥ धात्र्यामहं सकलभक्तविरक्तचित्तक्षेत्रेषु भक्तिशि-

---

घेऊन फिरतों; परंतु मजमध्यें आणि लिंगामध्यें मुळींच निराळेपणा नाहीं. मी आपल्या वेषावरून, आंत बाहेर प्रकाशमान व दिव्य तेज असणाऱ्या लिंगाची आणि माझी ऐक्यता आहे हें स्पष्ट करून दाखवितों. ॥ ९६ ॥ मीं पूर्वीं, ज्ञानसम्पन्न, व भक्तींमुळें वैराग्य पावलेले अशा लोकांना संमत असलेलीं; व सर्व संशय दूर करणारीं अशीं ऐंशी कोटि वचनें लोकोपयोगाकरितां रचिलीं आहेत. ॥ ९७ ॥ तीं वचनें वेद, शास्त्र, पुराण, आगम ह्यांचे अर्थ व तात्पर्य ह्यांस अनुसरून आहेत; जे लोक तीं वचनें विचारपूर्वक ऐकतात, त्यांच्या सर्व पातकांचा नाश होऊन, ते ह्याच जन्मीं ज्ञानमार्गानें वागून मोक्षपदास जातात. ॥ ९८ ॥ एखाद्यानें आपले अखाड्यांत (तालीमखान्यांत) लोकांचा प्रसंगविशेषीं उपयोग व्हावा ह्मणून अनेक प्रकारचीं शस्त्रास्त्रें जमवून ठेविलीं, ह्मणून त्यामुळें त्याचे विचार बदलून तो लोकांचे नाशास प्रवृत्त होत नाहीं; तसेंच, मलाही वेळोवेळीं निरनिराळे वेष घ्यावे लागतात, व निरनिराळ्या भाषा बोलाव्या लागतात, तरी, त्यापासून गोरक्षा, माझा निश्चलपणा मुळींच कमी होत नाहीं. ॥ ९९ ॥ ज्यांची जशी मनोवृत्ति असते, त्याचप्रमाणें मी लागलेच त्यांस मोक्षप्राप्तीचे उपाय सांगतों. त्यामुळें मी वास्तविक निर्विकार व निरंजनस्वरूप आहें. तरी, त्या वेळेला अनुसरून मला अनेक वेष घ्यावे लागतात, व अनेक भाषा बोलाव्या लागतात. हे वेष आणि ह्या भाषा माझ्या स्वाभाविक नव्हत, कृत्रिम होत. ॥ १०० ॥ पृथ्वीवर मी सर्व भक्तमंडळींच्या वैराग्य पावलेल्या चित्तरूपी शेतांत, भक्ति आणि शिवज्ञानरूपी उत्तम उत्तम बीं पेरण्यासाठीं स्वधर्म-

**वबोधसुबीजराजिं । वर्तुं दधामि शरणोचितयोगमुद्रां गोरक्ष तेन मम भेदकथा कुतः स्यात् ॥ १०० ॥ के वागताः क्व नु कथं किमिति स्वचित्ते स्याच्चेद्विकल्पकलनं कथमस्य भक्तिः । सर्वं मयीति शिवसौख्यसुधाब्धिमग्नो भक्तिं भजेत परमां गुणगंधशून्यां ॥ १०१ ॥ सोऽहं तदेतदिति तद्वदहं ममेति नोदेति यद्वदभिमानलवस्तथैवं । वर्ते जलान्तरसरोरुहपत्ररीत्या निर्लेपतामनुभवामि सदैव योगिन् ॥१०२॥ ये त्वंगलिंगयुगसंगतिबोधनिष्ठास्तेषां हि षट्स्थलविवेकितया मतोऽस्मि । संगं विसृज्य परिपूर्णशिवैक्यभावा ये चिन्मयाश्चिदहमेव भवामि तेषां ॥ १०३ ॥ ज्ञेयो मदीयमहिमैष न संशयोऽत्र स्याच्चेत्तवाद्य स परीक्ष्य समाधिमेहि । उक्त्वेति नीलजलदान्तरविद्युदुद्यल्लिंगे विलीनहृदयोऽथ समाहितोऽभूत् ॥ १०४ ॥ गोरक्षयोगिनि तदा**

---

संपन्न ( शरण ) शिवयोगी लोकांचा वेष घेतों; गोरक्षनाथा, त्यामुळें मला निराळेपणा कोठून असणार? ॥ १०१ ॥ कोण आले? कोठून आले? कसे आले? कशाकरितां आले? इत्यादि प्रश्न मनांत विकल्प आणून एकाद्या शिवयोग्यास विचारिलें, तर, त्याची भक्ति काय कामाची? मी जगद्रूपच आहें असें समजून शिवसुखरूप अमृताच्या समुद्रांत बुडालेल्या भक्तानें, गुण आणि गंध ह्यांचा जिला संपर्क देखील नाहीं अशी श्रेष्ठ रीतीची भक्ति करावी. ॥ १०२ ॥ तो, मीं, हें, तसेंच मी, माझें, अशा प्रकारचा थोडा सुद्धां अभिमान होणार नाहीं अशा-त्ऱ्हेनें मी वागतों. व पाण्यांत राहणाऱ्या कमळाचें पान जसें पाण्यापासून वेगळें असतें, तसाच मी अभिमानापासून अगदीं नेहमीं वेगळा आहें; असें गोरक्षनाथा, तूं पुरतेपणीं समज. ॥ १०३ ॥ जे शिवभक्त अंग आणि लिंग ह्या दोहोंचा संबंध झाला असतां उत्पन्न होणाऱ्या शिवज्ञानावर विश्वास ठेवितात, त्यांस मी षट्स्थलविचारांमुळें मान्य आहें; ( तें मला भजतात; ) तसेंच, सर्वसंग परित्याग करून शिवैक्यावर पूर्णपणानें निष्ठा ठेवणारे जे लोक आहेत त्यांच्या चित्स्वरूपामुळें मीच स्वतः चित्स्वरूप होतों. ॥ १०४ ॥ माझा महिमा, जाणण्यायोग्य आहे, यांत कांहीं संशय नाहीं; पण, जर तुझ्या मनांत संशय असेल तर समाधि लाव; असें बोलून निळ्या रंगांच्या ढगांत चमकणाऱ्या विजेप्रमाणें लखलखित दिसणाऱ्या लिंगामध्यें, आपण स्वतः अल्लमप्रभु लीन झाला. ॥ १०५ ॥ त्या वेळीं तो गोरक्षनाथ योगी अल्लमप्रभूच्या हातांतील इष्टलिंग बळजोरीनें आपण

**प्रभुहस्तलिंगं स्वीकर्तुमिच्छति करेण बलाद्गृहीत्वा । स्पृश्यं न दृश्यमपि तद्गगनायमानमासीत् सविस्मितमनाः प्रभुमाह भीतः ॥ १०५॥ युष्माकमीश महिमा निगमैरवेद्यः कोवाल्पधीरयमहं परिशीलनेऽस्य । साम्यं भजेत गजदन्तपरीक्षयेदं तन्नाथ मामनुग्रहाण हितोपदेशात् ॥ १०६ ॥ शिष्यो हि सद्गुरुवरेण परीक्षणीयो नो जातु शिष्यबटुकेन गुरुः परीक्ष्यः । तद्रक्ष मां प्रभुगुरो शिवदीक्षयेति गोरक्षनाथविनुतोभवदक्षरेशः ॥ १०७ ॥ दीक्षाममुष्य कृपयान्तरनुग्रहीतुं शिक्षाक्रमैस्तमथ लक्षविधैः परीक्ष्य । प्रक्षीणसिद्धिजडिमग्रथनाय तस्मै मोक्षप्रदं समदिशद्गुणशून्यतत्त्वं ॥ १०८ ॥ गोरक्षकः प्रभुगुरोरुपदेशमात्रात्सामोदहेमसदृशो विरराज विप्राः । किंचाल्लमांबुधिकृपामृतपानतृप्तः सिद्धीस्तदैव सकलाः शिथिलीचकार ॥ १०९ ॥ मायां निहत्य निज-**

---

ओढून घ्यावें ह्मणून प्रयत्न करूं लागला, तेव्हां तें लिंग दिसत असूनही घेतां येईना, तें आकाशासारखें निराकार झालें, तें पाहून गोरक्षाचे मनास अतिशय आश्चर्य वाटून तो भयभीत होऊन ह्मणाला. ॥ १०६ ॥ परमेश्वरा, तुमचें महत्व वेदादिकांसही समजण्यासारखें नाहीं, त्याची माझ्यासारखा अल्पबुद्धि मनुष्य काय परीक्षा करूं शकणार? हें काम जिवंत हत्तीच्या दांतांची परीक्षा करण्यासारखें झालें, यास्तव आपण हितकारक उपदेश करून मजवर कृपा करा. ॥ १०७ ॥ सद्गुरूनें शिष्याची परीक्षा करावी, शिष्यानें कधीं गुरूची परीक्षा करूं नये; ह्यास्तव माझें रक्षण करा, मला शिवदीक्षेचा उपदेश करा, अशी गोरक्षनाथानें अनेक प्रकारांनीं अल्लमप्रभूची स्तुति केली. ॥ १०८ ॥ मग अल्लमप्रभूच्या मनांत गोरक्षनाथाविषयीं दया येऊन, त्यानें (अल्लमानें) त्यास शिवदीक्षा दिली, व लक्ष प्रकारच्या शिक्षांच्या रीतींनीं त्याची परीक्षा केली; मग सिद्धि पावण्यास कांहीं अडचण राहिली नाहीं अशी स्थिति झाल्यावर त्यास मोक्षप्राप्ति करून देणारें, गुण (सत्व, रज, तम) नाहींसे होण्याचें रहस्य सांगितलें. ॥ १०९ ॥ ब्राह्मण हो, मग गोरक्षनाथ योगी अल्लमप्रभूचा उपदेश होण्याबरोबरच तापविलेल्या उत्तम बावनकशीसोन्याप्रमाणें शोभूं लागला. फार काय सांगावें? अल्लमप्रभूचे उपदेशरूपी अमृत प्राशन केल्यामुळें तो गोरक्षनाथ अतिशय तृप्त झाला, व त्याच वेळीं त्याला इतर सर्व सिद्धींचीं सुखें तुच्छ वाटूं लागलीं. ॥ ११० ॥ गोरक्षनाथानें मायेस मारून टाकिलें (दूर सारिलें.) आपल्या शरी-

कायगुणान् विजित्य स्थूलं च सूक्ष्ममुभयं क्रमशो ग्रसित्वा । स्थित्वाथ कारणतनौ विससर्ज वज्रकायभ्रमं चिदमलाभ्रतनुः स योगी ॥११०॥ गोरक्षको भ्रमरकीटनयेन सद्यः कारुण्यतः प्रभुगुरोरुपलब्धविद्यः । मुक्तो बभौ परशिवाद्वयबोधसिद्ध्या जीवन्नपि प्रतिनिवृत्तमृषाप्रपंचः ॥ १११ ॥ संगं विसृज्य भविभिर्भवबंधमुक्तश्चिह्नानि शैवविहितानि तनौ गृहीत्वा । अद्यापि तिष्ठति रसातलमाश्रितोऽयं गोरक्षसंयमिवरः शिवभक्तियुक्तः ॥ ११२ ॥ इति भृगुसुतमुख्याः सुव्रताः श्रीगिरींद्रे प्रभुकृतशिवदीक्षादक्षगोरक्षचर्या । श्रवणपुटनिपीता भुक्तिमुक्ती प्रसूते तदधिकरुचि यूयं धारयध्वं शृणुध्वं ॥ ११३ ॥

इत्यार्षश्रीभविष्यत्पुराणकथाविशालायां प्रभुलिंगलीलायां गोरक्षानुग्रहवर्णनगतिर्नामैकोनविंशोऽध्यायः ॥

---

राचे गुणधर्म जिंकिले, स्थूलदेहाचा व सूक्ष्मदेहाचा क्रमाक्रमानें ग्रास करून ( त्यांचा संबंध समजून ) तो कारणशरीरामध्यें राहिला, व त्यास मी वज्रदेही आहें ह्मणून जो भ्रम ( अज्ञान ) होता, तो सर्व जाऊन तो गोरक्षनाथ योगी चित्स्वरूपी निर्मल, व आकाशासारखें असें शरीर धारण करणारा दिव्यदेही झाला. ॥ १११ ॥ भुंगा (कुंभारमाशी) आपणास येऊन टोंचील हा धाक नेहमीं मनांत बाळगणारा किडा जसा कांहीं दिवसांनीं भुंगाच होतो, त्या न्यायानें गोरक्षनाथ योगी तत्काळ अल्लमप्रभूच्या कृपेमुळें मुक्त झाला, व शोभूं लागला, श्रेष्ठ अशा शिवाद्वयबोधाची सिद्धि झाल्यामुळें तो जिवंत असूनही त्याला हा प्रपंचाचा सर्व पसारा खोटा वाटूं लागला, व तो विरक्त झाला. ॥ ११२ ॥ त्यानें संसारी लोकांचा सहवास सोडून दिला, व संसारतापांतून मुक्त होण्याचीं शैवशास्त्रांत सांगितलेलीं चिन्हें ( रुद्राक्ष, भस्म वगैरे ) आपल्या शरीरावर धारण केलीं, व अद्यापि तो गोरक्षनाथ योगी शिवभक्ति करीत पाताळांत जाऊन राहिला आहे. ॥ ११३ ॥ हे शौनकादिक मुख्य मुख्य सदाचारी ऋषीश्वरांनो, श्रीगिरिपर्वतावर अल्लमप्रभूनें शिवदीक्षा दिलेल्या या चतुर गोरक्षनाथाची कथा कानांनीं ऐकिली तर, भक्तीचा व मुक्तीचा लाभ होतो. ह्यास्तव तुह्मी ज्यास्त आवडीनें गोरक्षासारखें आचरण करा, व गोरक्षनाथयोग्याचें चरित्र ऐका.

ह्याप्रमाणें ऋषीश्वरांनीं भविष्यत्पुराणांतील कथांत सविस्तर रीतीनें सांगितलेल्या प्रभुलिंगलीलेंतील, गोरक्षावर कृपा करण्याचें वर्णन असलेला हा एकोणिसावा अध्याय समाप्त झाला.

श्रीनंदिकेश्वराय नमः ॥

# अथ विंशोऽध्यायः ॥

**सूत उवाच**–श्रीसिद्धवीरशरणा लिंगजंगमदेहिनः । मुमुक्षवो मुनिगणा लीलां शृण्वन्तु सत्प्रभोः ॥ १ ॥ इत्थं गोरक्षनाथस्य सारविद्योपदेशनात् । संपाद्य कृतकृत्यत्वं सिद्धनाथपदं ददौ ॥ २ ॥ तेन श्रद्धान्वितेनाथ सत्कारैः परिपूजितः । तदाश्रमाद्विनिष्क्रम्य ययावन्यत्र भूसुराः ॥ ३ ॥ लोकैकपावनीं लोलतरंगां मंगलप्रदां । पातालगंगामुत्संगे ददर्श श्रीगिरेः प्रभुः ॥ ४ ॥ तस्यास्तटभुवि प्रोद्यत्पर्णशालाविराजितं । मुन्याश्रमं ददर्शाग्रे धन्यैर्मान्यतमं महत् ॥ ५ ॥ रसालसालपनसखर्जूरार्जुनकेसरैः । किंशुकप्रमुखैर्नानाद्रुमैरत्यन्तशोभितं ॥ ६ ॥ पुण्ये तत्राश्रमे व्याघ्राः क्रीडन्ति हरिणैः समं । चुंबन्ति बभ्रुवदनं मूषकास्तैश्च चुंबिताः ॥ ७ ॥ करिणस्तत्र पंचास्यैस्सख्यं

---

( अध्याय २० वा ) सूत ह्मणतात—॥ १ ॥ श्रीसिद्धवीरास शरण गेलेले, लिंगास व जंगमास आपल्या शरीरापेक्षां ज्यास्त मानणारे, मोक्षप्राप्ति व्हावी अशी इच्छा करणारे ऋषीश्वरांचे समुदाय अल्लमप्रभूचें चरित्र ऐकोत. ॥ २ ॥ ह्याप्रमाणें अल्लमप्रभूनें गोरक्षनाथाला चांगल्या विद्येचा उपदेश देऊन त्याच्या जन्माचें सार्थक केलें, व त्यास सिद्धनाथ असें नांव दिलें. ॥ ३ ॥ गोरक्षनाथानें भक्तिपूर्वक अल्लमाचा मोठा सत्कार करून त्याची पूजा केली, त्या पूजेचा स्वीकार करून, ब्राह्मण हो, प्रभु त्याच्या आश्रमांतून निघून दुसरीकडे चालता झाला. ॥ ४ ॥ अल्लमप्रभूनें वाटेनें जातां जातां श्रीगिरिपर्वताच्या जवळ पाताळगंगा नदी पाहिली, ती सर्व लोकांस एकटीच पवित्र करण्यास समर्थ असून तिच्यांत लाटा उसळत होत्या, व ती मंगल करणारी अशी होती. ॥ ५ ॥ त्या पाताळगंगेच्या कांठीं मोठमोठ्या अनेक झोंपड्यांमुळें शोभणारा, पवित्र झालेल्या लोकांमुळें महत्वास पावलेला, असा एक मोठा ऋषीचा आश्रम समोर अल्लमप्रभूनें पाहिला. ॥ ६ ॥ त्या आश्रमाच्या भोंवतीं आंबे, साल, फणस, खजूर, अर्जुन, नागकेसर, पळस वगैरे अनेक झाडें असून, त्यांमुळें त्या आश्रमास फार शोभा आली होती. ॥ ७ ॥ त्या पवित्र आश्रमामध्यें वाघ हरिणांबरोबर खेळत असत, व मुंगुसांचे तोंडांचा उंदीर व उंदिरांच्या तोंडांचा मुंगुस मुका घेत असत. ॥ ८ ॥ तेथें हत्ती सिंहांबरोबर

**कुर्वन्ति संततं । मार्जारैः कीरशिशवो हास्यलीलां वितन्वते ॥ ८ ॥ सहैव निवसन्त्यत्र मयूराश्च भुजंगमाः । अन्ये प्रतीपजातीयास्सजातीया इवासते ॥ ९ ॥ समागतं प्रभुं दृष्ट्वा तेन मार्गेण भूसुराः । प्रत्युद्गम्य कृतार्थाः स्म इति चित्तेषु मेनिरे ॥ १० ॥ मुनयोऽल्लममर्घ्याद्यैः पूजयित्वोन्नतासने । उपवेश्य स्तुतिशतैः स्तुत्वा स्तुत्यं तमूचिरे ॥ ११ ॥ प्रभो सर्वज्ञ भाग्येन जातं त्वद्दर्शनं हि नः । रक्षणीया वयं सर्वे त्वया सद्गतिदर्शिना ॥ १२ ॥ परीक्ष्य गोरक्षयतिं दीक्षां दत्वा सुरक्षितं । कृतवानिति विज्ञाय त्वां द्रष्टुं तावदुत्सुकाः ॥ १३ ॥ प्रतीक्षमाणास्सततं भवदागमनं वयं । तदाद्युत्कंठितस्वान्ता निवसामोऽत्र सद्गुरो ॥ १४ ॥ अनुग्रहोऽयं भवतां यदत्रागमनं शुभं। फलितं हि तपोऽस्माकमद्यैवानुगृहाण नः ॥ १५ ॥ स त्वं तत्वरहस्यार्थमुपदिश्य कृपाम्बुधे । शिष्यत्वेनानुगृह्णीष्व मुनीनस्मान्भवार्दितान्**

---

नेहमीं सख्य करीत असत, व मांजरांबरोबर राघूंचीं पोरें हंसत असत. ॥ ९ ॥ तेथें मोर आणि साप एकाच जागीं राहत असत, व दुसरेही एकमेकांशीं वैरभावानें वागणारे प्राणी मित्रांप्रमाणें वागत असत. ॥ १० ॥ अल्लमप्रभु आपल्या आश्रमाकडे येत आहे असें पाहून त्या वाटेनें सर्व ऋषि अल्लमास शरण गेले, व हे ब्राह्मणांनो, अल्लमाच्या दर्शनानें आह्मी धन्य झालों ह्मणून आपापल्या मनांत सुख मानूं लागले. ॥ ११ ॥ अल्लमप्रभूची अर्घ्य, पाद्य वगैरेंनीं यथाविधि पूजा करून त्यास एका उत्तम तऱ्हेच्या दर्भासनावर बसविलें, व स्तुति करण्यास योग्य अशा त्या अल्लमप्रभूची अनेक प्रकारांनीं स्तुति करूं लागले. ॥ १२ ॥ ईश्वरा, तूं सर्व जाणणारा आहेस, आमचें दैव चांगलें होतें ह्मणून आह्मांस तुझें दर्शन झालें, नाहींपेक्षां झालें नसतें. आह्मां सर्वांचें तूं रक्षण कर, तूं सद्गति देणारा आहेस. ॥ १३ ॥ गोरक्षनाथयतीची परीक्षा करून त्यास शैवदीक्षा देऊन त्यास कृतार्थ केलेंस, तेव्हांपासूनच आह्मी तुला पाहण्याविषयीं उतावीळ झालों होतों; ॥ १४ ॥ व तुझें इकडे येणें कधीं होईल ह्याची आह्मी वाट पहातच राहिलों होतों. तेव्हांपासून गुरुवर्या, आमचे मनास फार तळमळ लागली होती. ॥ १५ ॥ आपण येथें आलां हें फार चांगलें झालें, हा आमच्यावर मोठा अनुग्रहच झाला, आज आमची तपश्चर्या फलद्रूप झाली, आतां आमच्यावर कृपा करून आह्मांवर अनुग्रह करा. ( उपदेश करा. ) ॥ १६ ॥ हे कृपासमुद्रा, अल्लमप्रभो, तूं शिवतत्वरहस्याचा उपदेश करून, आह्मी शिष्य आहोंत असें समजून आह्मांवर

॥ १६ ॥ इति संप्रार्थितः सर्वैर्मुनिभिर्जातकौतुकः । प्रभुः प्रसन्नहृदयो बभूवानुग्रहेच्छया ॥ १७ ॥ तेषां प्रार्थयतां प्रभुर्यमवतां कायाम्बुधौ संस्थितं चेतोदिव्यमणिं तदूर्ध्वपदवीमानीय लिंगाह्वये । शाणे साधु निघृष्य तत्र जनयन् ज्ञानप्रकाशं परं सन्निष्ठाह्वयवज्रसूचिभिदया चक्रे बिलं तस्य सः ॥ १८ ॥ संधायात्र च बुद्धिसूत्रममलं तल्लोलतां वारयन्भेदं चाहमिदं त्वमित्यनुसृतं प्रोल्लंघ्य तं प्रापयन् । पश्चात्पश्चिमवाहिनीं स्थलकुलेष्वाज्ञातमास्थापयन्मौनींद्रान्प्रणवानुसंधिसुखितान्कृत्वाऽब्रवीदल्लमः ॥ १९ ॥ इमामशुक्लकृष्णाख्यामविज्ञाय क्रियां हृदि । कृपां न लभते शंभोश्चिदम्बरनटेशितुः ॥ २० ॥ विना महेश्वरकृपामन्तरंगं न शुध्यति । अन्तः शुद्धिमृते भ्रान्तिर्न नश्यति मुनीश्वराः ॥ २१ ॥ अनुत्सृज्य मनोभ्रान्तिं न शिवज्ञानमर्हति । त-

---

कृपा कर; आह्मी हे सर्व मुनि संसारतापानें पीडिलेले आहोंत, आमचें दुःख दूर कर. ॥ १७ ॥ ह्याप्रमाणें सर्व मुनीश्वरांनीं भक्तिपूर्वक प्रार्थना केल्यावर, मनांत संतुष्ट झालेला अल्लमप्रभु त्यांस उपदेश देण्यास तयार झाला. ॥ १८ ॥ अल्लमप्रभूनें त्या प्रार्थना करण्याऱ्या ऋषीश्वरांच्या शरीररूपी समुद्रांतून चित्तरूपी रत्न शोधून वर काढून, लिंग नांवाच्या निशाणावर ( धार लावण्याच्या दगडावर ) चांगल्या रीतीनें घांसून त्यांतून ज्ञानरूपी प्रकाश बाहेर पाडिला; व त्यास चांगली श्रद्धा या नांवाच्या सुईनें सन्मार्गरूपी भोंक पाडिलें. ( अल्लमानें ऋषींच्या शरीरांतील चित्तास प्राणलिंगाचा संबंध करून त्यांत श्रद्धा उत्पन्न करून, त्यांस सन्मार्ग दाखविला. ) ॥ १९ ॥ त्यामध्येंच ( त्या सन्मार्गरूप छिद्रांत ) बुद्धिरूप दोरा त्याचा चंचलपणाचा दुर्गुण काढून ओंविला, त्याचा ( चित्ताचा ) मीपणा आणि तूंपणा हा भेद होता तो ओलांडून तो दोरा तेथून पूर्ववाहिनी आणि पश्चिमवाहिनी नांवाच्या नाड्या आहेत त्यांत ओंवून बळकट गांठ मारून तो झांकून टाकिला, व त्या सर्व ऋषीश्वरांस ॐकार स्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून देऊन संतुष्ट केलें; व मग अल्लमप्रभु बोलूं लागला, ॥ २० ॥ ह्या अशुक्ल आणि कृष्ण नांवाच्या दोन क्रिया आहेत, त्यांस जो जाणत नाहीं, त्यावर चिदंबर नटेश्वर शंभूची कृपा होत नाहीं. ॥ २१ ॥ महेश्वराच्या कृपेवांचून मन शुद्ध होत नाहीं, व मुनीश्वरांनो, मनःशुद्धि झाल्यावांचून भ्रान्तीचा नाश होत नाहीं. ॥ २२ ॥ मनाची भ्रान्ति नाहींशी झाल्यावांचून शिवज्ञान होत नाहीं, व शिवज्ञानावांचून मोक्ष होत नाहीं; असें श्रुति युक्ति

**द्विना नहि मोक्षोऽस्ति श्रुतियुक्त्यनुभूतिभिः ॥ २२ ॥ तच्छ्रुत्वा मुनिवर्यैस्तैः प्रार्थितः शिवदीक्षया । कृतार्थीकृत्य तान्सर्वान्पुनर्वचनमब्रवीत् ॥ २३ ॥ कैवल्यमुक्तेर्मौनींद्राः कीलकं साधकोचितं । सदैव हृदि लिंगैक्यसावधानतया स्थितिः ॥ २४ ॥ इत्थमाज्ञाप्य तैर्भक्त्या पूजितो गुरुरल्लमः । ददर्श पुरतो गच्छन्महाविपिनमग्रतः ॥ २५ ॥ भानुमद्दीप्तिलेशस्याप्यप्रवेश्यं यदंतरं । लतापटलसंस्यूतनीरन्ध्रतरुमण्डलं ॥ २६ ॥ तत्कुंजाः कुंजरौघानां विहारावासतां गताः । चरन्ति यत्र सिंहाश्च व्याघ्रखड्गादयो मृगाः ॥ २७ ॥ तिर्यग्भिरपि तैर्देवः सेव्यमानो व्रजन्पथि । अग्रे ददर्श मृगयुं क्रूरमाकारनिष्ठुरं ॥ २८ ॥ दारुकोटरयंत्राणि वैय्याघ्रशकटानि च । ग्रंथिकीलितसूत्राणि श्येनबभ्रुशुनां गणान् ॥ २९ ॥ तथा शशकजालानि शिक्यानि यवनीपटान् ।**

---

आणि अनुभव ह्यावरून उघड होत आहे. ॥ २३ ॥ तें ऐकून आह्मांस शिवदीक्षा देऊन कृतार्थ करा, अशी त्या मुनिश्रेष्ठांनीं अल्लमप्रभूची प्रार्थना केल्यावर, त्या सर्वांस शिवदीक्षा देऊन कृतार्थ करून अल्लमप्रभु ह्मणाला, ॥ २४ ॥ मुनीश्वरांनो, नेहमीं मनांत लिंगैक्याविषयीं सावधानपणानें राहणें हेंच साधकास योग्य, असें कैवल्यमुक्तीचें कीलक ( मर्म ) आहे. ॥ २५ ॥ ह्याप्रमाणें त्यांस आज्ञा करून, त्या ऋषीश्वरांनीं भक्तिभावानें पूजा केलेला अल्लमप्रभु तेथून निघून दुसरीकडे चालता झाला; जातां जातां पुढें त्याला एक मोठें अरण्य लागलें. ॥ २६ ॥ तें रान इतक्या दाट झाडीनें भरलेलें होतें कीं, त्यांत सूर्याचा मुळींच प्रकाश पडत नव्हता. इतक्या वेलींच्या जाळ्या झाडांवर पसरून गर्द छाया तेथें झालेली होती. ॥ २७ ॥ त्या ठिकाणचीं लतागृहें हत्तींच्या समुदायांचीं क्रीडागृहें बनून राहिलीं होतीं; तसेंच तेथें सिंह, वाघ, गेंडा वगैरे अनेक हिंसक जनावरें राहत होतीं. ॥ २८ ॥ त्या भयंकर अरण्यांत जात असतां तेथील हिंसक जनावरांनीं देखील यथाशक्ति अल्लमप्रभूची सेवा केली; त्यांची सेवा घेत घेत पुढें जात असतां समोरून येणारा त्यानें एक क्रूर स्वभावाचा पारधी पाहिला. ॥ २९ ॥ त्याचे बरोबरचें सामान ह्मटलें ह्मणजे लांकडाचे पिंजरे, वाघाच्या कातड्याच्या गाड्या, दोऱ्यांस जागोजाग गांठी मारून पांखरें धरण्याकरितां तयार केलेलीं जाळीं, श्येन ( ससाणे ) मुंगूस, शिकारी कुत्रे यांचा समुदाय, ॥ ३० ॥ तशींच सशांचीं जाळीं, शिंकीं, पडदे, तसेंच, शिकारीच्या उपयोगीं पडणारे दुसरे जिन्नस,

**मृगयासाधनान्यन्यान्यानयन्तं महाबलं ॥ ३० ॥ नेत्रपात्रोरुगात्राणां मृगाणां चित्रवर्त्मनां । गणानाशु जघानैष पत्रिणैकेन लुब्धकः ॥ ३१ ॥ करिणः सिंहवत्सिंहांस्तथा शरभवच्छरैः । मारयामास बहुधा मृगानिव मृगादनः ॥ ३२ ॥ अन्यानि जन्तुसन्तानान्येकैकेन शरेण सः । जघान लीलयाऽटव्यां किरातः कालमृत्युवत् ॥ ३३ ॥ तं वीक्ष्य राक्षसाकारमल्लमो ह्यमन्यत । अनेन जन्तुविततिर्हतासावन्तकातिथिः ॥ ३४ ॥ वीक्ष्योपेक्ष्य कथं यास्यामेतत्कार्यं कथंचन । निवार्यमनुगृह्यैव क्रौर्यमस्येत्यथाब्रवीत् ॥ ३५ ॥ अहो किमिदमुत्सृज्य मृगयासौख्यमान्तरं । वृथा क्लिश्नासि बहुधा बहिर्मृगयुतां गतः ॥ ३६ ॥ प्रभोर्वाक्श्रवणेनैव तद्दर्शनहतैनसः । तस्याभून्मतिरुत्कृष्टा महत्संगो हि तादृशः ॥ ३७ ॥ उवाच स प्रभुं**

---

हें होतें. हें सर्व बरोबर घेऊन तो सामर्थ्यवान पारधी येत होता. ॥ ३१ ॥ डोळ्यांनीं पाहिलेल्या मोठ्या शरीराच्या वनपशूंस, ते पळण्याच्या कामांत कितीही पटाईत असले, तरी तो त्यांस एकाच बाणानें मारून टाकीत होता. ॥ ३२ ॥ हत्तीला जसें सिंहानें सहज मारावें, त्याचप्रमाणें हा पारधी हत्तीस मारीत होता, व सिंहास जसें शरभानें मारावें त्याप्रमाणें सिंहास बाणांनीं मारीत होता. व इतर पशूंस जसें वाघ सहज मारितो त्याप्रमाणें हाही सहज मारीत असे; इतका तो बळकट होता. ॥ ३३ ॥ दुसरे जे वनांतील पशुपक्ष्यांचे समुदाय होते, त्या सर्वांस सहज रीतीनें एकाच बाणानें मारीत होता; सारांश, तो किरात त्या वनपशूंस मूर्तिमन्त प्रलयकाळचा यमच वाटत होता. ॥ ३४ ॥ त्या राक्षसासारख्या क्रूर स्वभावाच्या पारध्यास पाहतांच, अल्लमप्रभु मनामध्यें विचार करूं लागला कीं, ह्यानें आजपर्यंत कितीतरी प्राण्यांचा जीवनाश केला असेल? हा आतां यमाच्या घरचा पाहुणाच झाला. ॥ ३५ ॥ ह्याला मीं समक्ष दृष्टीनें पाहून ह्याची हेलसांड करून पुढें कसा जाऊं? असें करणें मला योग्य वाटत नाहीं; ह्मणून ह्यावर कृपा करून ह्याचे हातून हिंसाकर्म बंद करावें, असें मनांत आणून अल्लमप्रभु त्या पारध्यास ह्मणाला. ॥ ३६ ॥ अरे, आपल्या मनांमधील क्रूर इंद्रियांची शिकार करण्याचें सोडून देऊन, ही बाहेरची शिकार करून हजारों जीवांचा नाश करून फुकट दमून गेलास. ॥ ३७ ॥ अल्लमप्रभूचें तें बोलणें ऐकतांच व त्याची मूर्ति पाहतांच, त्या पारध्याचें सर्व पाप नाहींसें झालें, व त्याची बुद्धि उत्कृष्ट झाली; कां तर महात्म्यांचा सहवास असाच गुणकारी आहे. ॥ ३८ ॥ त्यानें अल्लमप्रभूस लागलाच आनंदानें नमस्कार घातला; त्याचे मनांत भक्ति

**हर्षात्प्रणम्य पदपद्मयोः । भक्त्या परमया युक्तस्त्यक्तशस्त्रः कृतांजलिः ॥ ३८ ॥ मामन्तर्मृगयासौख्यमुपदिश्य कृपानिधे । कृतार्थयेति विज्ञप्तः प्रभुः प्राह कृतानतिं ॥ ३९ ॥ कायः काननमत्र तिष्ठति मृगोऽहंकारनामा शुनस्तद्ग्रासैकचणान्मनो निगलतो बध्वेंद्रियाण्यत्यजन् । नीत्वा वायुनिरोधजालवलयं सुज्ञानदृक् तं मृगं धृत्वा धैर्यधनुर्विवेकमृगयुस्तद्वेधदक्षो भवेत् ॥ ४० ॥ सोऽहंभावशरं शरासनगुणे संधाय तं पातयंस्तेन ज्ञानधनंजये सुरुचिरं पक्त्वा शिवस्यार्पयन् । भक्षेदित्युपदिश्य सद्गुरुवरस्तेनापि तत्कारयन्नानंदामृतसिंधुमग्नहृदयं चक्रे किरातं क्षणात् ॥ ४१ ॥ इत्थं किरातमनुगृह्य ततोऽवरुह्य श्रीपर्वतादथ तदुत्तरदेशमार्गे । गच्छन्प्रभुर्निजपदांबुजदर्शनेन संक्षीणपूर्वकलुषान् व्यतनोदशेषान् ॥ ४२ ॥ ये मानिनीस्तनभराहितदृग्विलासाः कामस्य किंकरजना रतिसौख्यलुब्धाः । ते चापि तं प्रभुम-**

---

उत्पन्न होऊन त्यानें आपल्या हातांतील तीं हत्यारें दूर फेंकून दिलीं; व हात जोडून अल्लमप्रभूस ह्मणूं लागला, ॥ ३९ ॥ कृपासमुद्रा गुरुवर्या, मला अन्तःशत्रूंची शिकार करण्याचें सुख ( इंद्रियनिग्रह करण्याचें सुख ) सांगून माझ्या जन्माचें सार्थक कर. अशी त्यानें हात जोडून अल्लमप्रभूची विनंति केल्यावर अल्लमप्रभु ह्मणाला, ॥ ४० ॥ शरीर हें अरण्य आहे, त्यांत अहंकार नांवाचा पशु राहतो, त्याचा चावा घेण्यास इंद्रियरूपी कुत्रा तयार आहे, त्यास मनरूप सांखळीनें बळकट बांधून आपले जवळ ठेवावा. वायुनिरोधरूप जाळ्यांत अहंकार पशूला नेऊन ज्ञानदृष्टि असणारा तुझा विचाररूपी पारधी हातामध्यें धैर्यरूपी धनुष्य घेऊन त्या पशूला मारण्यास तयार राहो. ॥ ४१ ॥ व सोहंभाव ( तो ईश्वरच मी आहें अशी बुद्धि असणें ) हाच बाण धनुष्याच्या दोरीस लावून त्या पशूवर सोडून त्यास गतप्राण करून जमिनीवर पाडो, व ज्ञानरूप अग्नीमध्यें फार वेळ शिजवून शिवाला अर्पण करून भक्षण करो; ह्मणजे तूं कृतार्थ होशील. असा अल्लमानें त्या पारध्यास उपदेश करून, त्याचे मनास आनंदसमुद्रांत बुडविल्याप्रमाणें सुख देऊन त्यास कृतार्थ केलें. ॥ ४२ ॥ ह्याप्रमाणें त्या किरातावर कृपा करून अल्लमप्रभु श्रीगिरिपर्वतावरून उतरून उत्तरेच्या वाटेनें जाण्यास निघाला, व आपल्या चरणकमलांच्या दर्शनानें सर्व प्राणिमात्रांचे पूर्वींचे दोष त्यानें नाहींसे करून सर्वांस कृतार्थ केलें ॥ ४३ ॥ जे कोणी विलासी पुरुष स्त्रियांच्या स्तनांकडे नेहमीं दृष्टि लावणारे असून मदनाचे चाकर होऊन राहिले होते, व वि-

वेक्ष्य विवेकनिम्नाः सन्मानतः सुगतिमेव ययाचिरेऽद्धा ॥ ४३ ॥ तानल्लमोऽप्यतनुतान्तरकुण्डलिन्याः शक्तेः प्रबोधनवशाद्युवतेः शुभांग्याः । गोष्ठ्या विरक्तिभरितान् विकसद्विहारानानन्दमग्नहृदयानवनौ विचित्रं ॥ ४४ ॥ अन्यांस्तथानुसरतो रससिद्धिकामानात्मीयबिंदुमयदिव्यरसं निरुध्य । अन्तर्दृढं भजत सिद्धिसुखं तदीयमित्यादिदेश भगवानखिलांतरात्मा ॥ ४५ ॥ संप्रार्थितो रसघुटीपटुसिद्धिमन्यैः प्राह प्रभुः स्मितमुखो रस एव बिंदुः । निष्पंदवायुरतुलौषधमात्मचित्तं मूषाऽग्निरेव मणिपूरपदं विदन्तु ॥ ४६ ॥ धृत्यैव तस्य परिपाकवशेन जाता सैवोन्मनी रसघुटी स्फुटमात्मसिद्धा । लब्ध्वैव तां हरमहेशसदाशिवोर्ध्वस्थानाप्तिरेव निजसिद्धिरियं हि नित्या ॥ ४७ ॥ इत्यल्लमः क्षितिजनानुपदिश्य सारं संरक्ष्य तानथ गतः पुरतो ददर्श । अन्यत्र वन्यफलपुष्पसमग्रमग्र्यं मुन्याश्रमं श्रमनिवारकमाश्रि-

---

षयसुखामध्यें गढून गेले होते, ते लोक देखील अल्लमप्रभूस पाहतांच विचारसंपन्न झाले, व आह्मांस आपण मोक्षप्राप्तीचा मार्ग दाखवून कृतार्थ करा ह्मणून विनंति करूं लागले. ॥ ४४ ॥ काय आश्चर्य सांगावें? त्याविषयीं लोकांस देखील अल्लमप्रभूनें अंतरकुंडलिनीशक्तीचें ज्ञान करून देऊन त्यांचीं मनें स्त्रियांच्या गोष्टींविषयीं ही विरक्त केलीं, व असें वैराग्य उत्पन्न करून त्यांस आनंदभरित केलें. ॥ ४५ ॥ तसेंच, दुसरे कितीएक लोक रससिद्धीची प्राप्ति व्हावी ह्मणून अल्लमास शरण आले; त्या लोकांस त्या सर्वांतर्यामी परमेश्वरानें उपदेश केला कीं, आत्मीयबिंदु नांवाच्या दिव्य रसाचा रोध करून मनामध्यें दृढभक्ति करा, ह्मणजे तुह्मांस त्याचे सिद्धीचें सुख मिळेल. ॥ ४६ ॥ दुसऱ्या कितीएक लोकांनीं रसघुटी आणि पुटपाकाची आपणास सिद्धि व्हावी ह्मणून अल्लमप्रभूची प्रार्थना केल्यावर अल्लमप्रभु हंसून त्यांस ह्मणाला, रस हाच बिंदु आहे, स्थिर जो वायु आहे हेंच औषध आहे, आपलें मन ही मूस आहे आणि मणिपूरक चक्र हेंच अग्नि आहे असें समजा. ॥ ४७ ॥ धीर ह्या परिपाकापासून उन्मनीरूप रसघुटी तयार होते व ती आत्मसिद्धीला कारण आहे; ती उन्मनीरूप रसघुटी मिळाली असतां हर, महेश आणि सदाशिव ह्यांच्या ऊर्ध्वस्थानाची प्राप्ति होते, व तीच आत्मसिद्धि असून ती नित्य आहे. ॥ ४८ ॥ ह्याप्रमाणें अल्लमप्रभूनें पृथ्वीवरील लोकांस उत्तम उत्तम उपदेश करून त्यांचें रक्षण केलें, व पुढें चालता झाला; पुढें जातो तों दुसऱ्या बाजूस रानांतील फळें फुलें ह्यांनीं भरलेला,

**तानां ॥ ४८ ॥ माकंदचंदनकपित्थरसालसालमालूरचंपकमुखाखिलशाखिसांद्रं । सत्यव्रतैः समयिभिः कृतनित्यकृत्यनैमित्तिकादिनियमैः परितः परीतं ॥ ४९ ॥ यत्राह्वयन्ति विरुतैरतिथीनिवासन्माकंदशाखिषु पिका मधुरैः समंतात् । आगच्छतात्त पिबताध्वमखण्डसौख्यास्सत्कंदमूलफलसाररसान्मदीयान् ॥ ५० ॥ तृष्णां निवारयत निर्मलवारिपूरैरागच्छतेति सरसीषु समाह्वयन्तः।आभान्ति हंसकलहंसरथांगरंगत्क्रौंचादिपक्षिनिवहा ललितैर्निनादैः ॥ ५१ ॥ वृद्धेषु तापसवरेषु गृहीतकीशहस्तावलंबनपरेषु नदीनदादीन् । गच्छत्सु तत्र तदुपर्यनुयान्ति कीराश्छायार्थमेव विकसन्निजपत्रसांद्राः ॥ ५२ ॥ यस्मिंस्तपःकृशमुनींद्रजटाभरैस्तैः संताडितोच्छ्वसितभोगिगणश्रमाम्भः । प्रोत्सादयन्ति मदहस्तिघटाः स्वकीयश्रोत्रछलव्यजनवीजनतः सम-**

---

सुशोभित, व आश्रय करणाऱ्या लोकांचे श्रम दूर करणारा असा एक ऋषीचा आश्रम त्यानें पाहिला. ॥ ४९ ॥ आंबे, चंदन, कवठ, कलमी आंबे, साल, मालूर, चंपक वगैरे अनेक झाडें त्या आश्रमांत होतीं; सत्यपणानें वागणारे, शम दम पाळणारे, व नित्यनैमित्तिक कर्में योग्य वेळीं करणारे पुष्कळ मुनीश्वर त्या आश्रमाच्या भोंवतीं लहान लहान झोंपड्या बांधून राहिलेले होते. ॥ ५० ॥ त्या आश्रमांतील आंब्याच्या झाडांच्या लहान लहान फांद्यांवर बसलेले कोकिलपक्षी मंजुळ मंजुळ शब्द करीत असत; ते ऐकून असें वाटे कीं, हे पक्षी आपल्या मधुर शब्दानें वाटसरूंस बोलवितात. आणि ह्मणतात कीं, अहो इकडे तुह्मी आमच्या जवळ या, गोडगोड फळें तोडून घ्या, गोडगोड रस प्या, तुह्मी वाटचालीच्या श्रमानें फार थकलां आहां, येथें सुखानें बसून विश्रान्ति घ्या, फलमूळें लागतील तितकीं घ्या. ॥ ५१ ॥ सरोवरांत क्रीडा करणारे राजहंस कलहंस रथांग क्रौंच वगैरे पक्षी तेथें मंजुळ शब्द करीत, ते ऐकून मनास असें वाटे कीं, हे पक्षी वाटसरूंस ह्मणतात, अहो, या, स्वच्छ पाणी प्या, तहान दूर करा, आणि सुखानें ह्या सरोवराच्या कांठावर सुखासमाधानाच्या गोष्टी करा. ॥ ५२ ॥ त्या आश्रमांतील ह्मातारे ह्मातारे तपस्वी लोक नदीवर किंवा नदावर जातांना, तेथील वानर त्यांना हातांत धरून नेत असत. त्या वेळीं त्यांच्या डोक्यांवर तेथील पोपट आपले पंख पसरून त्यांची स्नानसंध्या संपेपर्यंत सांवली करीत असत. ॥ ५३ ॥ त्या आश्रमांतील तपानें कृश झालेले ऋषीश्वर आपल्या जटा मोकळ्या करून जोरानें आपटीत. त्या ज़मिनीवर असलेल्या सर्पांना लागत; त्या श्रमानें त्या सुस्कार टाकणाऱ्या स-

न्तात् ॥ ५३ ॥ मासोपवासमुखघोरतरव्रतस्थान् यत्रासनस्थिरतया रहितान् विलोक्य । तिष्ठंति पृष्ठत उपेत्य बलार्थमेषां व्याघ्राः स्वपृष्ठभृततत्तनवो महान्तः ॥ ५४ ॥ पंचाग्निमध्यतपसा परितप्यमानान् दृष्ट्वा मुनीनिभगणः करपूरिताम्भः । आनीय तत्सविधदेशमहो समन्तात्संसेचयत्यनुदिनं विनयेन नम्रः ॥ ५५ ॥ वाचंयमेषु जरठेष्वथ यत्र मौंजीनिर्मित्सयोद्यतकरेषु गृहीतदर्भाः । आगत्य तांस्तदुपयुक्ततया विदार्य यच्छंति तत्करतले स्वयमच्छभल्लाः ॥ ५६ ॥ हंसाश्च यत्र बिसकाण्डचयं विभज्य चंचूभिरंचदतिसूक्ष्मतदीयतंतून् । आकृष्य ऋष्यधिपभावितयज्ञसूत्रकृत्यै ददत्युदितभक्तिरसास्तदानीं ॥५७॥ छात्रेषु यत्र समिदाहरणालसेषु नश्येद्धुताग्निरिति वृद्धकपिव्रजोऽपि । आनीय तत्र समिधः स्वयमादधाति बर्ही स्वबर्हविसरैर्ज्वलितं करोति ॥ ५८ ॥ यत्रावधाननिपुणाः शिवयोगनिद्रां संप्राप्नुवन्ति मु-

---

र्पांना घाम येत असे. परंतु मदोन्मत्त झालेले अनेक हत्ती आपले पंख्यासारखे कान हालवून वारा घातल्यासारखें त्या सर्पांस सुख देत असत. ॥ ५४ ॥ महिन्यांतून एक वेळ जेवावयाचें, अशीं कठीण कठीण व्रतें करणारे मुनीश्वर निश्चलपणानें समाधि लाऊन तपश्चर्या करीत बसत; त्या वेळीं त्यांचें आसन अशक्तपणामुळें डळमळूं लागतांच, तें स्थिर होण्याकरितां त्यांचे पाठीमागें वाघ येऊन आपली पाठ त्यांचे पाठीस टेंकून उभे राहत असत; इतकें त्या तपस्व्यांचें तपोबल अगाध होतें. ॥ ५५ ॥ पंचाग्निसाधन करणाऱ्या मुनीश्वरांचीं शरीरें उन्हानें करपून गेलेलीं पाहून, तेथील हत्तींचा समुदाय आपल्या सोंडेंत पाणी आणून नित्य नम्रपणानें त्या तपस्व्यांच्या भोंवतालीं जमिनीवर आणून शिंपडीत असे. ॥ ५६ ॥ त्या आश्रमांत मौन धारण करणारे म्हातारे म्हातारे मुनीश्वर कडदोरे वळण्यासाठीं दर्भ चिरीत असत, त्या वेळीं कडदोरे करण्याच्या उपयोगीं पडावें म्हणून अस्वलें तेथें येऊन ते दर्भ फाडून देत असत. ॥ ५७ ॥ तेथें, हंस कमलांचे देंठ फाडून, चोंचींनीं त्यांतील बारीक बारीक तंतु काढून घेत; आणि ऋषीश्वर यज्ञोपवीत करितात, त्यांस उपयोगीं पडावें म्हणून ते कमलतंतु त्यांस भक्तिपूर्वक आणून देत असत. ॥ ५८ ॥ तेथील शिष्यमंडळी दररोज समिधा आणून आणून त्रासली, म्हणजे, अग्नि विझून जाईल तो न विझावा, म्हणून म्हातारे म्हातारे वानर समिधा आणीत, व अग्नीवर टाकीत; आणि मोर आपल्या पिसाऱ्यांचा वारा घालून कुंडांतील अग्नि पेटवीत असत. ॥ ५९ ॥ त्या आश्रमांत नेहमीं सावधान-

**नयो हतकर्मपाशाः । तत्पर्णवेश्मनिकटे सततं मृगेंद्रा रक्षार्थमेव निवसन्ति हि जागरूकाः ॥ ५९ ॥ वेदत्रयं पठति यत्र तदर्थबोधमभ्यस्यति स्फुटमुपन्यसनं च वाग्भिः । तर्कादिशास्त्रसमितेर्विदुषां समूहे कुर्वत्यनूच्चरति कीरगणस्समन्तात् ॥ ६० ॥ मंत्रागमार्थरसिकोदितसामगानैः श्रौषड्वषट्प्रमुखतांत्रिकघोषणैस्तत् । आलिंपताचरत रंगलतां विधत्तेत्यर्घ्यादिशोधनमुदाररवैश्च रेजे ॥ ६१ ॥ किंचातिथीन् कुतपकालसमागतांस्तानभ्यर्च्य मृष्टमशनं प्रयता दद्ध्वं । इष्टं व्रतिभ्य इति चार्चयतेति भिक्षूनश्रूयतात्र बटुकान् प्रतिगौरवी॰ वाक् ॥ ६२ ॥ रुद्राक्षभस्मविलसद्वपुषां मुनीनामत्यद्भुतांतरतपस्सु समाहितानां । कर्षन्ति तानवयवान्हरिणा निजांगैर्हर्षेक्षणाम्बु च पिबन्ति शुकीशु-**

---

पणानें शिवयोग साधन करणारे लोक शिवयोगसमाधि लाऊन बसत असत; पुण्यकर्मामुळें त्यांचे कर्मपाश सर्व नाश पावलेले होते. त्या ऋषीश्वरांस कोणापासून उपसर्ग ( त्रास ) होऊं नये ह्मणून त्यांच्या पर्णकुटीजवळ नेहमीं सिंह सारखे जागत बसून राखण करीत असत. ॥ ६० ॥ त्या आश्रमांत विद्वान् लोकांचा समुदाय तीन वेद पठन करीत असतां, वेदांचा अर्थ पाठ करीत असतां, व तोंडानें तर्कादिक शास्त्रसमुदायांचें चिंतन करीत असतां त्यांचे शब्द ऐकून आसपास राहणारे राघु देखील तसेच शब्द बोलत असत. ॥ ६१ ॥ मंत्रांचा अर्थ आणि आगमांचा अर्थ ह्यांची आवड असणाऱ्या लोकांनीं गायलेल्या सामगायनांनीं तें तपोवन दुमदुमून जात असे. वैदिक व स्मार्त वगैरे तांत्रिकांचे वौषट् वगैरे शब्द, व सारवण घाला, रांगोळ्या घाला, अर्घ्यादिकांचें शोधन करा इत्यादि शब्दही त्या तपोवनांत घुमत असत. ॥ ६२ ॥ कडक उन्हांतून चालून थकून भागून आलेल्या पाहुण्यांचा योग्य आदरसत्कार करा, त्यांस गोडगोड अन्नें खाण्यास घाला, एखाद्या तपस्व्याची जशी बरदास्त ठेवितात तशीच आपल्या घरीं आलेल्या भिक्षुकाचीही ठेवा, अशी शिकवण तेथील गुरूजी आपल्या शिष्यलोकांस देत असत; ते शब्द तेथें चोहोंकडे ऐकूं येत असत. ॥ ६३ ॥ तेथील ऋषीश्वर अंगास भस्म लावून गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा घालून फार तेजःपुंज दिसत, आणि ते अतिशय अद्भुत रीतीच्या अन्तरतपामध्यें ( समाधिसुखामध्यें ) तल्लीन झाले असतां, त्यांच्या अवयवांस हरिणें आपल्या शिंगांनीं खाजवीत व त्यांच्या डोळ्यांस समाधिसुखामध्यें आलेले आनंदाश्रूंचे थेंब राघु व त्यांच्या

काद्याः ॥ ६३ ॥ एवंविधं मुनिवनं रुचिरं विलोक्य ह्यल्लमोऽमनुत तेषु कृतानुकम्पः। आहो प्रयासबहुलाल्पफलं हि कर्म कुर्वन्त्ययोमयविभूषणवद्वृथाऽमी ॥ ६४ ॥ ग्रामान्गृहाणि च विसृज्य महाटवीषु स्थित्वाप्यथेश्वरपदाम्बुजयोरकृत्वा। ध्यानं प्रबोधरहितास्तृणपर्णभाजो यज्ञादि कर्म बहुलं पटतां प्रयान्ति ॥ ६५ ॥ आहो न सन्ति शयनासनभोजनादौ घोराटवीषु रमणीयगृहाण्यमीषां। नाच्छादनाय कमनीयदुकूलशाट्यो वल्कानि कर्कशतराणि तु कष्टमेतत् ॥ ६६ ॥ धर्तुं न रत्नखचितोज्वलभूषणानि रुद्राक्षतामरसबीजसरान् विना स्युः। नित्याग्निहोत्रकृतभूतिमृतेन चैषां श्रीचंदनागरुमृगीमदमुख्यगन्धाः ॥ ६७ ॥ क्षुत्तृष्णयोः प्रशमनाय तरुह्रदादीनाश्रित्य घोरतपसा किमु साध्यमेषां। स्वर्लोकसौख्यमनुभूय तु भूय एव क्षोणीं गताः

---

माद्या आनंदानें पीत असत. ॥ ६४ ॥ अशा तऱ्हेचें तें मुनीश्वरांचें रमणीय तपोवन पाहून, अल्लमाचे मनांत त्या ऋषीश्वरांविषयीं दया उत्पन्न होऊन तो आपले मनाशीं बोलूं लागला, अरेरे, हे लोक कितीतरी प्रयासाचीं कामें करीत आहेत, आणि त्या मानानें फलप्राप्ति फारच थोडी आहे. लोखंडाचे नकशीदार दागिने तयार करण्यासारखेंच ह्या लोकांचें कृत्य आहे. ॥ ६५ ॥ ह्या लोकांनीं आपले गांव सोडले, घरें सोडलीं; व हे रानांत येऊन राहिले; तरी, शिवाच्या चरणकमलांचें ध्यान करण्याचें सोडून गवत, पाला वगैरे खाऊन हे यज्ञादिक कर्मांत गुंतून राहिले आहेत. ॥ ६६ ॥ अरेरे! ह्या लोकांनीं निजावें, बसावें, जेवावें ह्मणून मनांत आणिलें तर, ह्या लोकांस ह्या भयंकर रानांत घरें देखील नाहींत. पांघरण्याकरितां यांस उत्तम उत्तम वस्त्रें, शाट्या, हीं नाहींत. हे लोक निबर निबर झाडांच्या साली नेसतात, काय ह्यांचें दुःख आहे पहा! ॥ ६७ ॥ ह्यांच्या अंगावर रत्नांचे, हिऱ्यांचे व सोन्याचे दागिने मुळींच नसून, फक्त हे लोक आपल्या गळ्यांत रुद्राक्षांच्या व कमळबीजांच्या माळा घालितात; अग्निहोत्राकरितां दररोज अंगास भस्म लावितात, त्या पलीकडे चंदन, कृष्णागरु, कस्तुरी वगैरे उंची सुगंधि पदार्थांचें नांव देखील ह्यांस माहीत नाहीं. ॥ ६८ ॥ हे लोक भूक लागली ह्मणजे झाडांचीं फळें खातात, तहान लागली ह्मणजे डोहांतलें पाणी पितात; इतकें खडतर तपाचरण करून ह्यांस मिळणार तरी काय ह्मणून ह्मटलें, तर स्वर्गाचें सुख; बरें, तें पुण्य संपल्याबरोबर लागलेंच हे लोक तेथून पुन्हा पृथ्वीवर जन्मणार, मग पुन्हा मायेच्या फेऱ्यांत कशावरून पडणार नाहींत?

**किमु पुनर्न पतंति मायां ॥ ६८ ॥ मायाऽऽत्मतत्वविदुषा प्रथमं हि जेया तत्साधनौपयिकदिव्यकलामबुध्वा । एतद्धयानकजडाधिककर्मपाशैर्बंधं स्वयं द्रढयितुं प्रमदः किमेषां ॥ ६९ ॥ स्नानं यदि त्रिषवणं भुवि मुक्तिहेतुर्मीनादयो जलचराः किमु मुक्तिभाजः । नश्येद्भवः स्वयमधःकरणेन शीर्ष्णस्तर्हीदृशी हि जतुका किमु बंधमुक्ता ॥ ७० ॥ किं मौनमात्रविजिता भवतीह माया मीनग्रहाय न बकः किमु मौनमास्ते । शास्त्राण्यधीत्य सकलानि किमार्जितव्यं कीराः पठन्ति न किमप्युदितानुसारात् ॥ ७१ ॥ किं वायुभक्षणपरो भुवि मोक्षमेति व्याला ग्रसन्ति पवनं न किमास्तथा चेत् । तत्कर्मजाड्यभरितादपसर्पतीयं माया कदापि नहि तेन विना न बोधः ॥ ७२ ॥ ज्ञानं विना न खलु कर्मशतैश्च मोक्षो मायापसारणमृते नहि बोधलेशः । माया क्रिया हि तदिदं रभसादबुध्वा भ्रान्त्या क्रियामनुसरन्त्यविवेकनिघ्नाः**

---

॥ ६९ ॥ आत्मतत्व जाणणाऱ्यानें आधीं माया जिंकली पाहिजे; ती जिंकण्याचा उपाय ह्मटला, तर दिव्य चैतन्यस्वरूपाची कला ओळखावी; तें न करितां हे अडाणी लोक आपले आपणच भलतीं भलतीं कर्मे करून आपणांस बळकट बांधून घेतात; काय हा ह्यांचा वेडेपणा आहे पहा ! ॥ ७० ॥ त्रिकाल स्नान केलें ह्मणजे जर मोक्ष प्राप्त होत असता तर, मासे वगैरे पाण्यांत राहणारे प्राणी नेहमींच पाण्यांत राहतात; ते मोक्षास कां गेले नसते? डोकें खालीं करून तपश्चर्या केल्यानें जर जन्ममरण चुकून मोक्षप्राप्ति होती, तर, पाकोळी ही नेहमींच खालीं तोंड करून बसते, ती मोक्षास गेली नसती काय? ॥ ७१ ॥ मौन धारण केल्यामुळें जर मायेचा नाश झाला असता, तर, मासे धरण्यासाठीं बगळे देखील मुकाट्यानें डोळे झांकून उभे राहतात, ते मोक्षास गेले असते; बरें, सर्व तऱ्हेचीं शास्त्रें शिकून तरी काय करावयाचें आहे? राघु देखील जसें शिकवावें तसें उत्तम रीतीनें बोलतात. ॥ ७२ ॥ वायु भक्षण करून तपश्चर्या करून जर मोक्ष झाला असता, तर हे साप नेहमींच वारा पिऊन राहतात, त्यांस मोक्ष प्राप्त झाला नसता काय? सारांश, कर्माचा संचय जितका जितका ज्यास्त करावा तितकी तितकी माया ज्यास्त बळकट होते; कर्म ज्यास्त केल्यानें मायाही ज्यास्त होते, कमी होत नाहीं; व ती समूळ नाहींशी झाल्यावांचून बोध होत नाहीं. ॥ ७३ ॥ ज्ञानावांचून खरोखर शेंकडों कर्मे केलीं तरी मोक्ष होत नाहीं; व मायेचा नाश झाल्यावांचून काडीमात्र बोध होत नाहीं. क्रिया ही माया होय, हें ह्या अमिष्टांस समजत नाहीं, ह्मणून

॥ ७३ ॥ वापीतटस्थितशिशुर्हि कृपान्वितेन ग्राह्यस्तथैव मुनयोऽपि मुमुक्षवोऽमी । तत्वोपदेशविधिनैव नयान्मयानुग्राह्या इति प्रभुरवोचत तान् विलोक्य ॥ ७४ ॥ किं संकटेन भवतामृषयः क्रियाया नानंत्यमस्ति फलितस्य बहुप्रयासात् । मोक्षाप्तये सुलभमेव वदाम्युपायं श्रद्धान्विताः शृणुत भाग्यवशान्मदुक्तं ॥ ७५ ॥ श्रुत्वा प्रभोर्वचनमुत्कलिकाधिरूढैस्संप्रार्थितोऽथ मुनिभिश्शुभकांक्षिभिस्तैः । आज्ञापयात्महितमार्य वयं हि शिष्या मोक्षैकसाधनमिति प्रभुराह भूयः ॥ ७६ ॥ येनापि केन विधिना भजतामहिंसामुख्यं विमुक्तिगतिसाधनमामनंति । तत्कर्मयोगघटिता भवतां हि हिंसा त्याज्या सदैव खलु सा शिवयोगिवर्यैः ॥ ७७ ॥ हिंसंति ये जगति संप्रति जन्तुवर्गांस्तानंतकस्तदनु सत्यमिदं हिनस्ति । तत्कर्मजाड्यमिदमुत्सृजतान्तरंगे वि-

---

मूर्खपणानें हे लोक नेहमीं क्रियाच करीत असतात. ॥ ७४ ॥ विहिरीच्या कांठांवर खेळणाऱ्या लहान मुलाला, त्याची मनांत दया येणाऱ्या वडील मनुष्यानें तत्काळ तेथून उचललें पाहिजे; तसेंच, मीं देखील मुक्तीची इच्छा करणाऱ्या ह्या मुनीश्वरांस योग्य रीतीनें तत्वज्ञानाचा उपदेश करून, त्यांच्यावर कृपा केली पाहिजे. असें मनांत आणून त्या सर्व ऋषीश्वरांस अल्लमप्रभु ह्मणूं लागला, ॥ ७५ ॥ ऋषीश्वरांनो, काय ही व्यर्थ दगदग करितां? क्रियांचा कधींही अंत लागणार नाहीं, मग त्यांचें फळ मिळण्यास तर फारच श्रम आहेत. असो, मोक्षप्राप्ति तुम्हांस सहज रीतीनें व्हावी असा उपाय मी तुह्मांस सांगतों. तुमचें दैव चांगलें असल्यास माझें बोलणें तुह्मी श्रद्धापूर्वक ऐकून घ्याल. ॥ ७६ ॥ असें अल्लमप्रभूचें बोलणें ऐकतांच, कल्याण व्हावें अशी इच्छा करणाऱ्या त्या ऋषीश्वरांनीं उत्कंठितपणानें अल्लमप्रभूची विनंति केली कीं, हे श्रेष्ठा, आह्मांवर कृपा करून तो उपाय आह्मांस सांग; आह्मी तुझे शिष्य आहोंत, आह्मांस मोक्षप्राप्तीचा उपाय सांग. असें त्यांचें बोलणें ऐकून अल्लमप्रभु त्यांस पुन्हा ह्मणाला, ॥ ७७ ॥ तुह्मांस वाटेल त्या रीतीनें तुह्मी शिवाचें भजन पूजन करा, परंतु अहिंसा हें मुक्तिप्राप्तीचें मुख्य साधन आहे हें लक्ष्यांत ठेवा; ह्यास्तव तुह्मी हीं अनेक तऱ्हेचीं कर्में करितांना, तुह्मांकडून जी हिंसा घडते, ती सर्वथैव सोडून द्या. शिवयोगी लोकांनीं हिंसा मुळींच करूं नये, हें ध्यानांत ठेवा. ॥ ७८ ॥ ह्या लोकांत सध्यां जे लोक दुसऱ्याची हिंसा करितात, त्यांस मरणानंतर यम अवश्य शिक्षा करतो, हें अगदीं खरें आहे. ह्यासाठीं हा कर्मांचा अज्ञानपणा सोडून द्या. मनांमधील विज्ञा-

ज्ञानकर्मकृतिमर्म वदाम्यमोघं ॥ ७८ ॥ अन्तर्यागविधीरितः पशुरहंकारो मरुत्पूरणं रज्जुर्यूप इतीर्यते मन इदं विज्ञानमग्निः सुधा । चांद्री सोमलतारसो ग्रहगणाः सौषुम्नचक्राण्यमून्यात्मासौ यजमान ईप्सितफलं मोक्षैकसिद्धिर्भवेत् ॥ ७९ ॥ इत्यन्तर्मखतत्वबोधघटिताः कर्माणि निर्मूल्य ते भूयो निर्मलशैवयोगभरितज्ञानाख्ययज्ञं दृढं । दीक्षां प्राप्य गुरुप्रभोः करुणया निर्धूतहृत्संशया मायापाशमतीत्य नित्यपरमानंदाम्बुधौ रेमिरे ॥ ८० ॥ संध्याजपश्रवणशास्त्रविचारयोगनिष्ठाग्निहोत्रनिगमाध्ययनार्यपूजाः । सर्वाः क्रियाः परशिवे परिपूर्य पूर्णास्तेऽन्तर्विचारपरमा मुनयो बभूवुः ॥ ८१ ॥ प्रभुगुरुकरुणापांगेक्षणैरीक्षितास्ते सपदि विगतबन्धास्संप्रदायैकनिष्ठाः । परशिव इति देवं पंडितास्ते विदित्वा पुनरपि कृतपूजाः प्राहुरेनं मुनींद्राः ॥ ८२ ॥ गुरुवर भुवि मायोत्पत्तिकाले मुनीनां सकलनिगमकृत्येष्वाहतेषु त्व-

---

नाच्या कर्माचें रहस्य मी तुह्मांस सांगतों. ॥ ७९ ॥ अभ्यंतर यज्ञ कसा असतो तो ऐका. त्या यज्ञांत अहंकार हा पशु होय, वायूंचा रोध करणें ही दोरी होय. मन हा वधस्तंभ आहे, विज्ञान हा अग्नि आहे, सोमवल्लीचा रस हें चंद्रनाडीपासून निघणारें अमृत आहे. ग्रहांचे समुदाय हीं सर्व सौषुम्न चक्रें होत. आत्मा हा यजमान असून इच्छितफल मोक्षप्राप्ति ही होय. ॥ ८० ॥ अशा रीतीनें त्यांनीं अन्तर्यज्ञ केला व त्याचीं सर्व तत्वें त्यांना समजलीं, व त्यांच्या कर्माचा समूळ नाश होऊन ते निर्मळ रीतीनें शिवयोग साधन करूं लागले, व त्यांचा ज्ञानरूप यज्ञ चांगल्या तऱ्हेनें सिद्धीस गेला. नंतर सद्गुरूच्या कृपेनें दीक्षा घेऊन, मनांतील सर्व संशय काढून टाकून, आणि मायापाश सगळे तोडून टाकून, ते नित्यस्वरूपानंद समुद्रांत सुखानें कालक्रमण करूं लागले. ॥ ८१ ॥ संध्या, जप, श्रवण, शास्त्रविचार, योग, श्रद्धा, अग्निहोत्र, वेद, अध्ययन, अतिथिपूजा, वगैरे त्यांचीं सर्व कर्मे श्रेष्ठ शिवामध्यें जाऊन मिळालीं, व अल्लमप्रभूच्या उपदेशामुळें ते मुनीश्वर आपापल्या मनामध्यें सारासार विचार करून कृतार्थ झाले. ॥ ८२ ॥ अल्लमप्रभूनें त्या सर्व मुनीश्वरांकडे कृपादृष्टीनें पाहिल्यामुळें, ते सर्वजण तत्काळ जन्ममरणादिक संसारपाशापासून मुक्त झाले; त्या आचारनिष्ठ विद्वान् ऋषींनीं जाणिलें कीं, श्रेष्ठ अल्लम हाच प्रत्यक्ष शिव आहे; असें मनांत आणून त्यांनीं पुन्हा अल्लमाची पूजा केली व त्यास ह्मणूं लागले, ॥ ८३ ॥ हे गुरुश्रेष्ठा, जेव्हां माया ( ममकार राजाची मुलगी ) पृथ्वीवर अवतरली तेव्हां ऋषींचीं सर्व वेदकर्मे बंद

**मेव । हृदयकुहरवासी तावदस्मानरक्षीरिदमपि विदितं नः साधु दुर्वाससैव ॥ ८३ ॥ परमपुरुष युष्मत्सेवयाऽद्वैतमुक्तिः करतलकलिता नः कारणं भाग्यमत्र । इति मुनिभिरधीशः स्तूयमानः समन्तादनुमतिमथ दत्वा स्वान्तरन्तर्हितोऽभूत् ॥ ८४ ॥ अथ पुनरपि भक्तान्रक्षितुं तत्र तत्र स्वयमपि परिदृश्यस्साधुचित्तैक्यवश्यः । चरगुरुशिवलिंगाराधनं साधकानां प्रतिपदमुपदिश्य श्रीगुरुः संचचार ॥ ८५ ॥ त्रिपुरभिदनुमत्या ये गणा भूमिभागे विदितसकलवृत्ताः पूर्वविज्ञानयुक्ताः । इह जनिमलभन्त ब्राह्मणाद्यन्ववायेष्वधिकृतशिवदीक्षास्ते प्रभुं प्राप्य हृष्टाः ॥ ८६ ॥ प्रमथकुलमिदं नः पावनं लोकरक्षाकरधृतशिवदीक्षं नास्ति भेदोस्य किंचित् । अकुलमपि कुलानामग्रतः पूजनीयं भवतु मधुवशादित्यब्रवीद्देवदेवः ॥ ८७ ॥ अधिगतशिवदीक्षा**

---

पडलीं; त्या वेळेस तूंच आमच्या चित्तरूप गुहेंत राहून आमचें रक्षण केलेंस; हें आह्मांस पूर्वींच दुर्वासऋषीकडून समजलें आहे. ॥ ८४ ॥ हे अल्लमप्रभो, तूं परमपुरुष ( श्रेष्ठ मूलपुरुष ) आहेस, तुझ्या चरणकमलांच्या सेवेमुळें अद्वैतमुक्ति आह्मांस तळहातांतील वस्तुप्रमाणें सुलभ झाली आहे, ह्याचें मुख्य कारण पाहिलें तर आमचें सुदैवच आहे. ह्याप्रमाणें मुनीश्वरांनीं स्तवन केल्यावर अल्लमप्रभु सर्वांस सन्मार्गानें वागण्याचा उपदेश करून, व सर्वांस संतुष्ट करून, सर्वांचे सम्मतीनें तेथून निघून दुसरीकडे गेला. ( गुप्त झाला. ) ॥ ८५ ॥ मग पुन्हाही जागोजाग भक्तलोकांचें रक्षण करण्यासाठीं स्वतः देह धारण करणारा, व सज्जनांच्या मनांत राहणारा तो अल्लमप्रभु, साधक लोकांस “जंगम, गुरु, लिंग, ह्यांची वेळोवेळीं पूजा करीत जा,” असा उपदेश करीत करीत पृथ्वीवर संचार करूं लागला. ॥ ८६ ॥ शंकराच्या आज्ञेप्रमाणें पृथ्वीवर जन्म घेऊन पूर्वजन्माचें ज्ञान असणारे, व विज्ञानसंपन्न, असे कितीएक प्रमथगण ब्राह्मणादिकांच्या वंशांत जन्मले होते, ते सर्व अल्लमप्रभूस येऊन भेटले, व त्यापासून शिवयोगदीक्षा घेऊन संतुष्ट झाले. ॥ ८७ ॥ ते ह्मणूं लागले, आमचें हें प्रमथगणांचें कुल पवित्र आहे, आह्मी लोकांचें कल्याण करणारी शिवयोगदीक्षा घेतली आहे; आतां आह्मांस निराळेपणा ह्मणून राहिला नाहीं. मधाची वास्तविक उत्पत्ति पाहिली तर चांगली नाहीं, कारण, तो मध माशांचे तोंडांतून अनेक प्रकारच्या रसांनीं तयार होतो; तरी तो सर्वांस मान्य आहे. असें त्यांचें बोलणें ऐकून अल्लमप्रभु ह्मणाला, ॥ ८८ ॥ ज्यांनीं शिवदीक्षा घेतली आहे, व त्याखेरीज इतर कर्में जे करीत नाहींत, ते

**अन्यकर्मस्वसक्ता जगदवनधुरीणाश्चारुगार्हस्थ्यधर्माः । दृढपरमविरागा ये निराभारदीक्षा यतिमुनिमतरीत्या ते भवन्तीत्युवाच ॥ ८८॥ चरगुरुशिवलिंगाराधनार्थं स तेषां प्रतिदिनमखिलार्थानार्जितुं कायिकानि । तदनुगुणविधानि स्वैरमाज्ञाप्य देवो भुवनमखिलमेतद्वीरशैवं चकार ॥ ८९ ॥ व्यवहृतिमवलंब्याप्येष भक्तान्ववायो मम चरणसरोजध्याननिर्धूतदोषः । भवतु हृदयनिष्ठां तामसीं तां च जित्वा चरगुरुशिवलिंगाराधने जागरूकः ॥ ९० ॥ इति गुरुरुपदिश्य स्वात्मतत्वोपदेशं शिवमतहितरीत्या स्वान्तरन्वग्रहीत्तान् । तदनु तदनुमत्या ते परं शीलवन्तस्सततमभवभक्त्या वर्द्धमाना बभूवुः ॥ ९१ ॥ कथितमखिलमेतत्साधकानुग्रहार्थं प्रभुगुरुचरितं वः शौनकाद्या मुनींद्राः । पठति परमभक्त्या यः शिवाराधनान्ते प्रभुरधिकममुष्मै वांच्छितार्थं ददाति ॥९२॥**

**इत्यार्षे श्रीभविष्यत्पुराणकथाविशालायां प्रभुलिंगलीलायां साधकानुग्रहवर्णनगतिर्नाम विंशोऽध्यायः ।**

---

पृथ्वींतील लोकांस सन्मार्ग दाखवून त्यांचें कल्याण करतील, त्यांनीं गृहस्थाश्रमानें वागावें; व जे लोक फार वैराग्यशील आहेत, व ज्यांनीं निराभारदीक्षा घेतलेली आहे, त्यांनीं मुनीश्वरांप्रमाणें किंवा संन्याशांप्रमाणें वर्तन करावें. ॥ ८९ ॥ जंगम, गुरु आणि शिवलिंगाच्या पूजनासाठीं, व त्या लोकांचा दररोजचा चरितार्थ योग्य रीतीनें चालण्यासाठीं, त्या त्या स्थितीला अनुसरून योग्य असे उपाय सुचवून व तसा उपदेश करून, त्या अल्लमप्रभूनें सर्व पृथ्वीवर वीरशैवमत वृद्धिंगत केलें. ॥ ९० ॥ आपापला चरितार्थ चांगल्या रीतीनें चालवून हा माझ्या भक्तांचा (प्रमथगणांचा) वंश माझ्या चरणकमलांच्या भक्तीमुळें निष्पाप होवो, व त्यांचे मनांत भरलेला तामसपणा जाऊन ते जंगम, गुरु आणि शिवलिंग ह्यांच्या पूजनाविषयीं नेहमीं तत्पर राहोत. ॥ ९१ ॥ असा विचार मनांत आणून अल्लमप्रभूनें आत्मतत्वाचा त्यांस उपदेश करून, शिवमताच्या हितकारक रीतीनें त्यांचीं मनें पवित्र केलीं. तदनंतर अल्लमप्रभूच्या उपदेशाप्रमाणेंच ते सर्व भक्तलोक सदाचारी होऊन शिवभक्ति वरचेवर ज्यास्त ज्यास्त आवडीनें करूं लागले. ॥ ९२ ॥ हे शौनकादिक ऋषीश्वरांनो, हें साधक लोकांवर कृपा करण्याच्या संबंधाचें मीं अल्लमप्रभुगुरूचें चरित्र तुह्मांस सांगितलें; जो कोणी पुरुष हें चरित्र मनापासून शिवपूजन झाल्यानंतर वाचील त्याचे सर्व मनोरथ अल्लमप्रभुगुरु पूर्ण करील.

ह्याप्रमाणें ऋषीश्वरांनीं भविष्यत्पुराणांतील कथांत सविस्तर रीतीनें सांगितलेल्या प्रभुलिंगलीलेंतील, साधक लोकांवर कृपा केल्याचें वर्णन असलेला हा विसावा अ०

---

नंदिकेश्वराय नमः ॥

# अथ एकविंशोऽध्यायः ॥

श्रीसिद्धेश्वरवीरदेशिकपदाम्भोजार्चनातत्पराः श्रुत्वा भक्तिरहस्यमेव गुरुणा तेनोपदिष्टं महत् ॥ नंदीशो बसवाह्वयः समतनोद्यच्छून्यसिंहासनं तच्छ्रोतुं रसिकाः प्रभोश्चिदमला लीलाऽनुसंधीयतां ॥ १ ॥ अथात्र कल्याणपुरेऽल्लमप्रभोर्महोपदेशात्प्रतिभासमृद्धिमान् ॥ प्रवृत्तिमार्गं बसवः परित्यजन्निवृत्तिमार्गैकरसो बभूव सः ॥ २ ॥ ततोऽस्य कामाद्यरिनाट्यवैभवं विभग्नमासीद्दलिता गुणोद्धतिः ॥ इगिंद्रियाणां प्रमदो लयं गतो मदास्तथाष्टौ दलिताः पलायिताः ॥ ३ ॥ षडूर्मयः स्थातुमितो भयान्वितास्तथैव कर्मेंद्रियधैर्यमाहतं ॥ गतोऽस्य षड्भावविकारसंभ्रमो मनस्तु तस्य स्तुतिनिंदयोः समं ॥ ४ ॥ तदंतरंगं शिवयोगसत्क्रियासदासमभ्यासधुरीणतां ययौ ॥ जितो-

---

(अध्याय २१) अर्थ— ॥ १ ॥ सूत ह्मणतात—ऋषीश्वरांनो, श्रीसिद्धेश्वर वीरगुरूच्या चरणकमलांचें पूजन करण्यांत तुह्मी तत्पर आहां व रसिक आहां, अल्लमप्रभूनें सांगितलेलें भक्तिरहस्य ऐकून बसवेश्वर नांवाच्या नंदीश्वरानें जें शून्य नांवाचें मोठें सिंहासन तयार केलें, त्या संबंधाची अल्लम प्रभूची, चित्स्वरूपामुळें निष्पाप अशी लीला मी तुह्मांस सांगतों, ती तुह्मी लक्ष्य देऊन ऐका. ॥ २ ॥ असो. त्या कल्याणनगरांत अल्लमप्रभूच्या सर्वोत्कृष्ट उपदेशामुळें त्या ज्ञानवान् बसवेश्वरानें आपलें मन प्रवृत्तिमार्गाकडून (संसारसुखांतून) काढून निवृत्तिमार्गाकडे (परमार्थसाधनाकडे) लाविलें. ॥ ३ ॥ त्यामुळें बसवेश्वराचे काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर ह्या सहा शत्रूंचे नाटकाचें चातुर्य (बसवेश्वराचें मन वाईट कामाकडे वळविण्याचें सामर्थ्य) नाहींसें झालें. सत्व, रज, तम या तीन गुणांचा गर्व मावळून गेला, दृष्टि वगैरे पांच ज्ञानेंद्रियांचा गर्व नाहींसा झाला, व ज्ञानमद, कुलमद, ऐश्वर्यमद वगैरे आठ प्रकारचे मद पराभव पावून पळून गेले. ॥ ४ ॥ क्षुधा, तृषा, आशा, जरा, जनन, मरण वगैरे सहा ऊर्मी बसवेश्वराजवळ राहण्यास भिऊं लागल्या, तसेंच पांच कर्मेंद्रियांचें धैर्य कमी झालें, व बसवेश्वराचे मनांतून कामक्रोधादिक सहा शत्रू निघून गेल्यामुळें, त्याचें मन निंदा आणि स्तुति ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच मानूं लागलें. ॥ ५ ॥ बसवेश्वराचें मन, शिवयोगाचें सत्कर्म नेहमीं करण्यांत

पसर्गस्य गुरोरनुग्रहाद्बभूव संतोषसमृद्धिरात्मनः ॥ ५ ॥ स्वयं ततोऽन्तर्मुखमार्गमाश्रितः प्रबोध्यतां कुण्डलिनीं क्रमादयं ॥ क्षणादृजूकृत्य तदीयवक्रतां ययौ तदाधारमहागृहांगणं ॥ ६ ॥ ततोऽस्य तद्वारकवाटबाह्यतो निहत्य कामं जितकालतां गतः । प्रविश्य तत्रोपरि हृत्सरोरुहे भवभ्रमोच्चाटनतत्परोऽभवत् ॥ ७ ॥ तदूर्ध्वगो भ्रूयुगमध्यमण्डले सुबिंदुरत्नं स्थिरतामवापयन् । निजानुभूत्या बसवोऽन्वभूच्चिरं प्रबोधसाम्राज्यसुखं हृदन्तरे ॥ ८ ॥ अथैष योगः सगुणो वशंगतः कथं पुनर्निर्गुणयोगसाधनं । गुरुः कदाऽऽगत्य ममोपदेशमं करिष्यतीत्यंतरचिंतयच्चिरं ॥ ९ ॥ कदाऽल्लमोऽमेयमहाप्रभाववान् गृहं समायास्यति भाग्यतो मम । कदा मदीयान्तरसंशयच्छिदा प्रभूपदेशादचिराद्भविष्यति ॥ १० ॥ मदन्तरंगस्थितमीदृशं सुखं कदा भवेद्वा सहजं

---

प्रवीणपणा पावलें. ( तो नेहमीं शिवध्यान करूं लागला. ) ज्याचे सर्व उपसर्ग नाहींसे झाले आहेत अशा अल्लमप्रभूच्या कृपेमुळें, त्यास आत्मस्वरूपाचें ज्ञान होऊन तो नेहमीं आनंदांत राहूं लागला. ॥ ६ ॥ नंतर बसवेश्वर अन्तर्मुख मार्गाकडे वळला व त्या कुंडलिनीस जागी करून हळू हळू हा तिचा वांकडेपणा काढून टाकून तिला सरळ करून तो त्या कुंडलिनीच्या आधारगृहाच्या अंगणांत गेला. ॥ ७ ॥ नंतर त्या कुंडलिनीच्या आधारगृहाच्या दाराच्या बाहेर मदनाचा नाश करून बसवेश्वर यमास जिंकण्यास समर्थ झाला; मग तेथें वरच्या हृदयरूप कमलावर चढून त्यानें आपल्या संसाराच्या भ्रमाची काळजी मुळापासून उपटून टाकिली. ॥ ८ ॥ नंतर बसवेश्वराचे हृदयकमलावरील दोन्ही भोंवयांच्या मध्यभागांतील सुबिंदुरत्न स्थिरपणा पावलें, व त्यामुळें बसवेश्वर आत्मानुभवामुळें आपल्या मनांत ज्ञानरूप सार्वभौमराज्याचा उपभोग घेऊं लागला. ( बसवेश्वर पूर्ण आत्मानुभवसुख भोगूं लागला. ) ॥ ९ ॥ मग, हा सगुण योगसाधनाचा मार्ग झाला, निर्गुणयोगसाधन मला कसें करितां येईल? गुरु केव्हां येईल? आणि मला तत्वज्ञानाचा उपदेश कधीं करील? अशी नेहमीं बसवेश्वर मनांत काळजी करूं लागला. ॥ १० ॥ ज्याच्या प्रभावाचें कांहींच प्रमाण करितां येत नाहीं, असा तो अल्लमप्रभु माझ्या दैवयोगामुळें माझ्या घरीं कधीं येईल? व अल्लमप्रभूच्या सदुपदेशामुळें माझ्या मनांतील सर्व संशय केव्हां नाहींसे होतील? ॥ ११ ॥ अल्लमप्रभूच्या कृपादृष्टीमुळें माझ्या मनांत

कृपावशात् । चिदंबरेशस्य महानटात्मनः कथं निरालंबतया प्रवर्तनं ॥ ११ ॥ स केन वेषेण कयाऽपि भाषया क्व केन रूपेण गुरूद्वहः स्वयं । समागमिष्यत्यथ तद्विभावने ममास्ति किंवा सदुपायचिन्तनं ॥ १२ ॥ मयाऽप्रमत्तेन सदाऽवधार्यमित्ययं कृतोहः प्रभुणा पुरात्मनः ॥ अनुग्रहोक्तं गुणयोगमाश्रयन्नुपासनामेव दृढीचकार सः ॥ १३ ॥ स इत्थमात्मन्यवलोक्य शांभवीप्रपंचमभ्यंचितभद्रपीठवत् । विभाव्य तत्राल्लमसद्गुरूत्तमं निवेश्य सद्भक्तिरसादपूजयत् ॥ १४ ॥ हृदन्तरस्थं सुदृढं विभाव्य तद्बहिश्च पूजार्थममुष्य सद्गुरोः । स शून्यसिंहासनमेकमद्भुतं सुशिल्पिना कारयितुं समुद्यतः ॥ १५ ॥ स तप्तजांबूनदराशिमुज्ज्वलं महार्घरत्नौघचयं समानयन् । क्षितौ क्रियाकौशलवत्सुशिल्पिनस्समाव्हयामास विचार्य पंडितैः ॥ १६ ॥ तदाज्ञया निर्ममिरे सुशिल्पिनः सुधांशुकान्तोपलकुट्टिमं पुरः । तथास्य सोपान-

---

चित्स्वरूपाच्या स्वाभाविक सुखाचा अनुभव केव्हां येईल? महानटेश्वर, चिदंबरेश्वर व ज्याला कोणाच्या आश्रयाची अपेक्षा नाहीं, असा प्रभु कसा येईल? ॥ १२ ॥ अल्लमप्रभु माझा गुरु आहे, तो कोणत्या वेषानें येईल, कोणती भाषा बोलेल, व त्याचें रूप कोणत्या रीतीचें असेल, हें मला समजण्याला कांहीं तरी चांगला उपाय योजिला पाहिजे. ( एरव्हीं अल्लमप्रभु आलेला मला कसा समजणार? ) ॥ १३ ॥ मी नेहमीं सावधपणानें राहावें असें अल्लमप्रभूनें सर्वांसमक्ष मला सांगितलें आहे, ही त्याची मजवर कृपाच झाली; मग बसवेश्वरानें गुणयोगाचा आश्रय करून आपली उपासना ज्यास्त बळकट केली. ॥ १४॥ बसवेश्वरानें आपल्या मनामध्यें शांभवी प्रपंच आणून सुशोभित अशा रत्नसिंहासनाची कल्पना करून, त्या सिंहासनावर अल्लमप्रभूस बसविलें, व भक्तिपूर्वक त्याची यथास्थित रीतीनें पूजा केली. ( बसवेश्वरानें मानसिकपूजेनें अल्लमाचें पूजन केलें. ) ॥ १५ ॥ मानसपूजेचे वेळीं अल्लमप्रभूस ज्या रीतीचें सिंहासन कल्पिलें होतें, त्याचप्रमाणें बाह्यपूजेच्या वेळींही अल्लमप्रभूस बसण्यास असावें, अशा हेतूनें त्यानें एक सर्वोत्कृष्ट रत्नजडित शून्य नांवाचें सिंहासन कारागिर लोकांकडून तयार करविण्यास आरंभ केला. ॥ १६ ॥ त्यानें तापविलेल्या लखलखीत सोन्याच्या राशी व मौल्यवान् रत्नें पुष्कळ आणविलीं. त्या सिंहासनाकरितां त्या कामांत वाकबगार अशा लोकांच्या माहितीनें जागोजागचे कारागीर जमा केले. ॥ १७ ॥ मग बसवेश्वराच्या आज्ञेप्रमाणें त्या चतुर कारागिरांनीं

**ततोर्हरिन्मणीसुहीरगोमेधिकवालवायजैः ॥ १७ ॥ क्रमेण तस्योपरि यत्ननिर्मिता सुवर्णरत्नालिभिरुन्नतोन्नताः । पृथग्यथान्यायमवेक्ष्य शिल्पिभिः प्रदीप्तसप्तावरणोरुभित्तयः ॥ १८ ॥ तदन्तरालेषु धगद्धगायिताः प्रकीलिताः स्युर्नवरत्नपंक्तयः । अनन्यसामान्यमशोभताद्भुतं चिदभ्रपीठं बसवेन निर्मितं ॥ १९ ॥ बहिर्नवद्वारसुशोभितं पुरं तदन्तरे द्वारचतुष्टयोज्ज्वलं । तदुन्नतद्वारयुगान्तरालयं रराज तद्द्वारमथोर्ध्वमेककं ॥ २० ॥ तदन्तराधारसुलिंगनाभिहृद्विशुद्धिसद्भ्रूयुगमध्यचित्रितं । क्रमेण षट्चक्रपथं निधाप्य तच्छिरस्यधुर्ब्रह्मबिलाख्यचक्रकं ॥ २१ ॥ धराम्बुबर्हिर्मरुदभ्रमण्डलान्युपर्यधो जीवपरौ न्यधापयन् । सुभक्तमाहेश्वरमुख्यषट्स्थलान्यनुक्रमात्पीठवरे न्ययोजयन् ॥ २२ ॥ क्षितौ तु काठिन्यमथाम्बुनि द्रवं सदौष्ण्यमग्नौ चलनं प्रभं-**

---

त्या सिंहासनापुढें अगोदर चंद्रकांत मण्यांची सुंदर फरसबंदी तयार केली; त्या फरसबंदीवरून सिंहासनावर चढण्याकरितां इंद्रनीलमणि, उत्तम हिरे, पाच, गारुत्मत वगैरे उत्तम उत्तम रत्नें बसविलेल्या पायऱ्या तयार केल्या. ॥ १८ ॥ तदनंतर त्या पायऱ्यांवर त्या कारागिरांनीं वेगळ्या वेगळ्या व अगदीं बरोबर प्रमाणानें मोठ्या प्रयत्नानें सोन्याच्या आणि रत्नांच्या लखलखीत सात परकोट असणाऱ्या मोठमोठ्या भिंती तयार केल्या. ॥ १९ ॥ त्या भिंतींच्या मध्यें लखलखीत रत्नांच्या नऊ ओळी बसविल्या. बसवेश्वरानें जें हें शून्य सिंहासन तयार केलें, तें फार विचित्र असून असें सिंहासन कोणासही करितां येणार नाहीं इतकें उत्कृष्ट झालें असल्यामुळें फार सुशोभित दिसत होतें. ॥ २० ॥ बाहेरच्या नऊ दारांमुळें शोभणारें असें एक तेथेंच नगर तयार केलें; त्यांत चार दारांमुळें शोभिवंत दिसणारें एक घर तयार केलें; त्याच्या भोंवतीं मोठमोठीं चार दारें असून त्या दारांवर एकेक दार होतें. त्यामुळें तें घर शोभत होतें. ॥ २१ ॥ त्यामध्यें आधारलिंग, बेंबी, हृदय, विशुद्धि, व भ्रूमध्य अशा पांच चक्रांचा मार्ग तयार करून त्याच्यावर कारागिरांनीं ब्रह्मरंध्रनांवाचें सहावें चक्र तयार केलें. ॥ २२ ॥ पृथ्वी, जल, अग्नि, वायु व आकाश हीं पंचमहाभूतें त्या सिंहासनांत स्पष्ट रीतीनें दाखवून तेथें खालीं जीवात्मा व वर परमात्मा दाखविला होता, व भक्त, माहेश्वर, प्रसादि, प्राणलिंगी, शरण व ऐक्य हीं सहा स्थलेंही क्रमाक्रमानें दाखविलीं होतीं. ॥ २३ ॥ पृथ्वीच्या अंगीं कठीणपणा, पाण्याचे अंगीं द्रव,

**जने । तथावकाशं गगने च शून्यतां विचित्रमात्मन्यपि स न्यधापयन् ॥ २३ ॥ इडोत्तरे दक्षिणतश्च पिंगला सुषुम्नया मध्यगया प्रकल्पिते । तयोर्द्वयोश्चंद्रदिवाकरावुभौ यथा स्वयं संचरतस्तथाहि तौ ॥ २४ ॥ रराज वीथीपुरि तालुमूलसत्पदोत्तरद्वादशिकान्तभूमिगा । चिदंबरं तच्छिखरोपरि स्फुरन्महार्हसिंहासनमुन्नतं बभौ ॥ २५ ॥ सुशून्यसिंहासनमध्यमे महान्सदाशिवाख्यस्तरुरस्ति निस्तुलः । यदस्य मूलं प्रणवः परः स्वयं लतास्तु पंचाक्षरदिव्यचित्कलाः ॥ २६ ॥ सुमानि वर्णानि पदानि सत्फलान्यमुष्य नादो हि विमुक्तिदो रसः । स्वरः प्रकाण्डस्सकलार्थदायको महाद्रुमो रत्नमयो विराजते ॥ २७ ॥ महाद्रुमस्यास्य लतेव संगता फणींद्रमूर्धन्यमणिद्युतिर्यथा । बभौ स्वयं ज्योतिरमेयचित्कलाशिखेव दीव्यच्छिवतत्त्वभूरुहः ॥ २८ ॥ अहो सम-**

---

अग्नीच्या अंगीं उष्णता, वायूच्या अंगीं चंचलपणा व आकाशाच्या अंगीं विस्तीर्णता व आत्म्याचे अंगीं शून्यपणा, हे सर्व गुण त्या सिंहासनांत बसवेश्वराचे आज्ञेप्रमाणें कारागिरांनीं स्पष्ट दाखविलेले होते. ॥ २४ ॥ त्या सिंहासनाचे उत्तरेकडे इडा, दक्षिणेकडे पिंगला, आणि मध्यें सुषुम्ना अशा नाड्या दाखविल्या होत्या, त्या दोहोंमधून चंद्र आणि सूर्य जसे कांहीं आपोआप फिरतात असें दाखविलें होतें. ॥ २५ ॥ नगरांत तालुमूलाजवळ चांगली बारा पावलें आंत जावयाची वाट शोभत होती. त्या शिखरावर चिदंबर लखलखित मौल्यवान् मोठें सिंहासन शोभत होतें. ॥ २६ ॥ त्या शून्य नांवाच्या सुशोभित अशा रत्नसिंहासनाच्या मध्यभागीं, सदाशिव नांवाचा अवर्णनीय वृक्ष तयार केला होता; ॐकार हें त्या वृक्षाचें श्रेष्ठमूळ असून पंचाक्षर ( नमःशिवाय ) ह्या दैदीप्यमान चैतन्यकला त्या सदाशिववृक्षावर वेलीसारख्या शोभत होत्या. ॥ २७ ॥ त्या सदाशिवरूप वृक्षाचीं अक्षरें हीं फुलें असून पदें हीं उत्तम उत्तम फळें होत, नाद हा मोक्षप्राप्ति करून देणारा रस होय व स्वर ह्या फांद्या होत. हा सदाशिववृक्ष आपल्या मनाच्या सर्व इच्छा परिपूर्ण करणारा होता. असा तो रत्नांनीं तयार केलेला सदाशिवनांवाचा मोठा वृक्ष त्या शून्यसिंहासनावर शोभत होता. ॥ २८ ॥ त्या सिंहासनावरील सदाशिववृक्षास सर्पांच्या मस्तकावरील रत्नांची कांति वेलीसारखी शोभत होती, किंवा, शिवतत्वरूप वृक्षाला जशी अनुपम चित्कलारूप ज्योति शोभावी तशी शोभत होती. ॥ २९ ॥ काय आश्चर्य

**स्तानि च साधनान्ययं स्वयं प्रपेदे बसवो विमुक्तये । स पंचभूतो-र्ध्वमहाचिदंबरे चतुर्दशासूनि जगन्त्यवासयत् ॥ २९ ॥ समस्ततत्वो-परि शून्यपीठिकां जगन्नुतां कारयति स्म सोद्भुतां । अहो विचित्रं सकलाश्च देवता यथातथं स्थापयति स्म तत्पुरे ॥ ३० ॥ यदत्र नाडीस्सकलाश्च तद्गता मरुन्मयी कुण्डलिनीः सशक्तिकाः । निधाप-यामास सुभक्तिसत्कलास्तथा क्रियाज्ञानकलाश्च मर्मवित् ॥ ३१ ॥ सबीजनिर्बीजसमाधियोगयोर्महारहस्योचितकोणनिर्मितिं । स्वयं यथादृष्टमकारयन्महानसौ शरण्यो बसवो जगत्त्रये ॥ ३२ ॥ भिदा न पिण्डाण्डयुगस्य केवलं विमृश्यतां साधुभिरित्ययं बुधः । विकासयामास बहिर्निजान्तरं ययेत्थमस्तूयत सोऽखिलैर्जनैः ॥ ३३ ॥ चिदभ्रसिंहासनमीदृशं महत् गुहेश्वराराधनदिव्यसाधनं । निजात्म-**

---

आहे पहा ? बसवेश्वराला हीं मोक्षप्राप्तीसाठीं सर्व साधनें आपोआप मिळालीं. त्यानें पंचभूतांच्यावर महाचिदंबराकाशांत हे चवदा लोक वसविले. ॥ ३० ॥ असो. अशा रीतीचीं सर्व तत्वें तयार करून त्या सिंहासनावर बसविल्यानंतर, त्या सर्वांवर त्यानें विचित्र रीतीची, सर्व लोक जिची प्रशंसा करतील, अशी शून्यपीठिका तयार करून बसविली. काय आश्चर्य सांगावें पहा ? त्या सिंहा-सनापुढें सर्व देवता बसवेश्वरानें त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्या त्या ठिकाणीं तयार करून बसविल्या. ॥ ३१ ॥ तसेंच त्यानें त्या सिंहासनावर सर्व नाडी आणि त्यांत राहणाऱ्या वायुस्वरूपी कुंडलिनी शक्तीसहित तेथें बसविल्या; तसेंच भक्ति, क्रिया, ज्ञानकला, हीं सुद्धां सर्व मर्म जाणणाऱ्या बसवेश्वरानें त्या सिंहा-सनावर तयार करून बसविलीं. ॥ ३२ ॥ सबीजयोगसमाधि आणि निर्बीज-योगसमाधि ह्या दोहोंच्याही रहस्याला योग्य असे कोंपरे त्या बसवेश्वरानें जसे स्वतः कांहीं पाहिलेच होते तसे अगदीं हुबेहुब तयार केले. कांतर त्रैलोक्यांत बसवेश्वर मोठा सामर्थ्यवान् व स्वधर्मसंपन्न होता. त्यास कोणतेंही काम अशक्य नव्हतें. ॥ ३३ ॥ तें सिंहासन पाहून पिंडांड व ब्रह्माण्ड यांचा निराळेपणा नाहीं, असें ज्ञानीलोकांस विचार केल्यावर सहज समजून यावें, ह्मणूनच कीं काय या चतुर बसवेश्वरानें अशा रीतीनें आपलें अंतरंग ( उद्देश ) बाहेर स्पष्ट करून दाखविलें, अशी पाहणारे लोक त्याची स्तुति करूं लागले. ॥ ३४ ॥ अशा तऱ्हेचें गुहेश्वराची पूजा करण्यास फार उपयोगी पडणारें, चिदभ्रनांवाचें सिंहासन बसवेश्वरानें तयार करविलें; आणि तें सिंहासन अगदीं आपल्या

रूढं बसवो विनिर्मितं विभाव्य संतुष्टमना बभूव सः ॥ ३४ ॥ यदत्र चित्रं सकलं हृदि स्थितं नयेन विज्ञाय धियाऽधिरोहणे । समर्थ एकः प्रभुरेव नान्य इत्यमन्यतानंदनिमग्नमानसः ॥ ३५ ॥ य एव धीरः स्वयमेत्य मद्गृहं महत्वमस्य प्रतिबुध्य निर्भयः । समाधिरोक्ष्यत्ययमेव मे प्रभुः स्वरूपबोधेऽयमुपाय एव नः ॥ ३६ ॥ इति प्रतिज्ञाय मतौ व्रती भृशं बुधैकगोष्ठ्या समयं नयन्नयम् । समागतानां विदुषां प्रदर्शयंश्चिदभ्रपीठं बसवाधिपः स्थितः ॥ ३७ ॥ गतिर्हि लिंगं भुवि मानसौकसः स्वरो हि लिंगं मधुरो पिकस्य सः । शुकस्य वाग्लिंगमनूदिताक्षरा प्रभोस्तु लिंगं यदिहाधिरोहणं ॥ ३८ ॥ विना न सूर्यद्युतिमक्षिगं तमो विनश्यति क्षोणितले यथा तथा । विना प्रभोर्दर्शनमीश्वरस्य मे न जातु माया कुटिला विनश्यति ॥ ३९ ॥

---

मनासारखें झालेलें पाहून त्यास मोठा संतोष वाटला. ॥ ३५ ॥ हें सिंहासन जसें पाहिजे होतें तसें झालें व ह्या सिंहासनामध्यें अशी एक खुबी आहे कीं, ह्याची योग्य रीतीनें माहिती मिळवून बुद्धिपूर्वक ह्याचेवर चढण्याला एक अल्लमप्रभूच समर्थ आहे, दुसरा कोणी समर्थ नाहीं; हा विचार मनांत येतांच बसवेश्वरास फारच आनंद वाटला, व तो आनंदसमुद्रांत बुडून गेला. ॥ ३६ ॥ मग बसवेश्वरानें आपल्या मनांत निश्चय केला कीं, जो कोणी धैर्यवान् पुरुष स्वतः माझ्या घरीं येईल, आणि ह्या सिंहासनाचें महत्व मनांत आणून निर्भयपणानें ह्यावर चढून समाधि लावील तोच माझा गुरु होय; प्रभूचें स्वरूप ओळखण्यास हा उपाय चांगला आहे. ॥ ३७ ॥ असा बसवेश्वरानें निश्चय ठरवून, व्रत घेऊन, विद्वानांच्या सभेंत बसून शिवतत्वांचा विचार करण्यांत कितीएक काळ घालविला. जे कोणी परकीय विद्वान् तेथें येत, त्यांस चिदभ्रसिंहासन दाखविण्याचा क्रम त्यानें चालविला. ॥ ३८ ॥ बसवेश्वरानें मनांत आणलें कीं, मानससरोवरांतील हंसांस पृथ्वीवर चालतांना त्यांच्या चालण्यावरून ओळखावें, कोकिळांस त्याच्या मधुर शब्दावरून ओळखावें, राघूस बोललेले शब्द उच्चारण्यावरून ओळखावें, तसेंच अल्लमप्रभूस ह्या सिंहासनावर चढून समाधि लावण्यावरून ओळखावें. ॥ ३९ ॥ जसा डोळ्यांस न दिसूं देणारा पृथ्वीवरील अंधकार सूर्यप्रकाशावांचुन दूर होत नाहीं, त्याचप्रमाणें मला अल्लमप्रभु ईश्वराचें दर्शन झाल्यावांचून माझी वक्र स्वभावाची माया कधींही दूर होणार नाहीं.

**इति स्वयं चेतसि निश्चयं गतः प्रतीक्षमाणः स्वगुरोः समागमं । पुरेव भक्त्या चरलिंगपूजनं समाचरन्नास्त स दण्डनायकः ॥ ४० ॥ तत्काले बसवाधिपस्य भवनं भुक्त्यर्थमेके गता केचिद्वेषधराश्च याचनपराः केचित्तु वेश्यारताः । तद्योग्यांबरभूषणादि बसवादाकृष्टुमप्यागता ये तेषां गणनैव नास्ति नियता लक्षोपलक्षाधिकाः ॥ ४१ ॥ तेष्वेकोऽपि न दिव्यपीठममलं द्रष्टुं न शक्नोति तत्पृष्टस्तत्र स येन केन बसवो वेत्तीति वक्ति स्फुटं । तेनैतत्कथमद्भुतं नियमितं ज्ञातुं कथं शक्यते लोके दृष्टचरं जनैरनुभवज्ञानं विनेति ब्रुवन् ॥ ४२ ॥ आहो चिद्गगनासनं निरुपमं ब्रह्मादिभिर्वा कथं ज्ञातुं चेतसि वा निमज्य बहुधा शक्येत लोकोत्तरं । एको वेत्ति बुधाग्रणीस्स बसवो यद्वाऽल्लमो देशिकस्सर्पा एव विदंतु तद्गतिमिति प्रोचुश्च सर्वे चराः ॥ ४३ ॥ मंत्रे नादलये**

---

॥ ४० ॥ दंडनायक बसवेश्वर स्वतः आपल्या मनांत असा निश्चय करून आपला गुरु अल्लमप्रभु ह्याची व आपली भेट कधीं होईल, ह्मणून मार्गप्रतीक्षा करीत राहिला; व पूर्वींप्रमाणेंच जंगमांचें व लिंगाचें पूजन करून आपला अधिकार चालवीत कालक्रमणा करूं लागला. ॥ ४१ ॥ त्या वेळीं बसवेश्वराच्या घरीं जेवणासाठीं कितीएक जंगम लोक आले, त्यांत कितीएक तर नुसता साधूंचा वेष घेतलेले लोक होते, कितीएक भिक्षा मागणारे असून कितीएक तर वेश्यागमनी होते; तसेंच, बसवेश्वरापासून चांगलीं चांगलीं वस्त्रें व अलंकार मिळविण्यासाठीं लक्षावधि लोक येऊं लागले. त्यांची तर गणनाच करितां आली नाहीं. ॥ ४२ ॥ त्या बसवेश्वराच्या घरीं आलेल्या लक्षावधि लोकांपैकीं एकाचीही त्या शून्य सिंहासनाकडे दृष्टीनें पाहण्याची देखील शक्ति झाली नाहीं. एखाद्यास कोणी विचारलें तर तो ह्मणे कीं, ह्या सिंहासनाची माहिती फक्त एक बसवेश्वरास आहे. त्यानें हें विचित्ररीतीचें सिंहासन कसें तयार केलें असेल तें असो; अनुभवज्ञानावांचून जगांत कोणतीही वस्तु तयार होत नाहीं. असें एकमेकांत बोलूं लागले. ॥ ४३ ॥ अहो काय आश्चर्य आहे ? हें चिद्गगनासन ( शून्यसिंहासन ) अतिशय उत्तम आहे, ब्रह्मादिकांस हें समजणार नाहीं असें हें लोकोत्तर चमत्कारिक शून्य सिंहासन कसें तयार केलें तें आह्मांस काय समजणार ? हा बसवेश्वर फार विद्वान् मनुष्य आहे, त्यास कळत असेल, किंवा, अल्लम प्रभूस ह्या सिंहासनाची तयार करण्याची कृति माहिती असेल; सापच सापांची गति जाणतात असें सर्व जंगम आपआपसांत बोलूं लागले. ॥ ४४ ॥ कितीएक लोक मंत्रांमध्यें,

**हठे परिचितास्सद्यंत्रतंत्रोर्जिता वेदान्तेष्वधिकास्तथैव कुशलाः षड्दर्शनज्ञानिनः ॥ ये दृष्ट्वांऽबरपीठमद्भुततमं दूरान्नमस्कृत्य ते दुर्ज्ञेयो बसवेश्वरस्य महिमेत्यूचुः शिरःकंपनैः ॥ ४४ ॥ क नु गृहमधिगत्य श्रीगुरुर्मे दयालुर्ललितगगनपीठं तावदारोक्ष्यतीति । तदमलनिजमूर्त्तिध्याननिष्ठागरिष्ठो बसवविबुधमौलिः स्वान्तरुत्कंठितोऽभूत् ॥ ४५ ॥ इति कथितममोघं शून्यपीठीमहत्वं पठति परमभक्त्या यस्सदा सन्मुनीन्द्राः । प्रभुगुरुकृपयैव प्राप्तसर्वार्थसिद्धिस्स महितशिवभक्तिः स्थैर्यमायाति धन्यः ॥ ४६ ॥**

**इत्यार्षश्रीभविष्यत्पुराणकथाविशालायां प्रभुलिंगलीलायां शून्यसिंहासनमहिमाऽनुवर्णनगतिर्नाम एकविंशोऽध्यायः ॥**

---

नादब्रह्मामध्यें व हठयोगामध्यें प्रवीण होते, तसेच यंत्रतंत्रामध्यें कितीएक पारंगत होते, कितीएक वेदान्तशास्त्रामध्यें प्रवीण होते, कितीएक अनेक प्रकारचीं कुशलतेचीं कामें करणारे होते, कितीएक षड्दर्शन जाणणारे होते, त्यांनीं तें शून्यसिंहासन पाहून त्यास लांबूनच नमस्कार केला; व बसवेश्वराचा महिमा मोठा आहे, तो आह्मांस मुळींच समजणार नाहीं, अशी त्याची प्रशंसा करून त्यांनीं आपल्या माना डोलविल्या. ॥ ४५ ॥ अल्लमप्रभु माझ्या घरीं केव्हां येईल ? तो दयाळु परमेश्वर ह्या मीं तयार केलेल्या सुंदर शून्य सिंहासनावर कधीं बसेल ? त्याचे दिव्य शरीराचें दर्शन मला कधीं होईल ? व त्याचें भक्तिपूर्वक ध्यान करण्याचा मला प्रसंग कधीं येईल ? अशा तऱ्हेनें विद्वानांत श्रेष्ठ तो बसवेश्वर आपल्या मनांत अगदीं उतावीळ झाला. ॥ ४६ ॥ हे मुनीश्वरांनो, अशा रीतीनें हें फलद्रूप होणारें शून्यसिंहासनाचें महत्त्व मीं तुह्मांस सांगितलें; जो कोणी मनुष्य भक्तिपूर्वक हें कथानक पठन करील, त्याचे अल्लमप्रभुगुरूच्या कृपनें सर्व मनोरथ परिपूर्ण होतील, त्याची शिवभक्ति वाढेल, व तो धैर्यवान् पुरुष स्थिरपणा पावेल. ( त्याचें मन स्थिर होईल. )

ह्याप्रमाणें ऋषीश्वरांनीं भविष्यत्पुराणांतील कथांत सविस्तर रीतीनें वर्णन केलेल्या प्रभुलिंगलीलेंतील शून्यसिंहासनाच्या महिम्याचें वर्णन नांवाचा हा एकविसावा अध्याय संपला.

---

श्रीनंदिकेश्वराय नमः ॥

# अथ द्वाविंशतितमोऽध्यायः ॥

**सूत उवाच**—॥ श्रीसिद्धवीरेश्वरदेशिकेंद्रश्रीपादुकाभक्तिरता मुनींद्राः । निर्देहतत्वस्य यतींद्रमौलेः प्रभोरमेयस्य कथां शृणुध्वं ॥ १ ॥ प्राणेश्वरे दूरगते सुसाध्वी यथा सपुष्पा फलकांक्षिणी स्त्री । रत्युल्बणं सोढुमशक्नुवाना चिंतां तदीयागमने करोति ॥ २ ॥ तथा प्रभोरागमनेऽनुभूतिस्सुखाभिलाषी बसवाधिनाथः । सबीजयोगोदित-भक्तिपूर्णश्चितां दुरन्तां हृदये ततान ॥ ३ ॥ अहो तदारोहणयोग्य-मुद्यच्चिदभ्रपीठं रचितं मयैतत् ॥ गतास्ततो द्वादशवत्सराश्च प्रभुर्महात्मा न समागतोऽभूत् ॥ ४ ॥ प्राणेश्वरेऽस्मिन्ममता मदीया नो याति पारं कथमप्युदीर्णा । आगत्य वैकल्यमदो निरस्य चित्तस्य देवः क्व दयां करोति ॥ ५ ॥ अर्चावदीशश्शिवयोगमर्म स्वान्ते मदीये-

---

( अध्याय २२ वा ) सूत ह्मणतात—॥ १ ॥ श्रीसिद्धवीरेश्वर गुरुश्रेष्ठाच्या चरणकमलांची मनापासून भक्ति करणारे मुनीश्वरांनो, ज्याची बरोबरी जगांत दुसरा कोणीही करूं शकणार नाहीं, आतमस्वरूप ज्याचें तत्व आहे, व जो सर्व सन्याशांत श्रेष्ठ आहे, अशा अल्लमप्रभूची लीला मी तुह्मांस सांगतों, ती ऐका. ॥ २ ॥ ज्याप्रमाणें ऋतुमती असून मूल होण्याची इच्छा करणारी पतिव्रता बायको, नवरा दूर गांवीं गेला असतां त्याची तुटातुट सोसण्यास असमर्थ असते व तो गांवाहून परत कधीं येईल, हीच चिंता नेहमीं करीत असते. ॥ ३ ॥ त्याप्रमाणें आत्मानुभवसुखाची इच्छा करणारा बसवेश्वर, सबीजयोगामुळें त्याची भक्ति ज्यास्त वाढली असल्याकारणानें, अल्लमप्रभु कधीं येईल ? ह्मणून आपले मनांत अतिशय काळजी करूं लागला. ॥ ४ ॥ अहो काय करावें ? त्या अल्लमप्रभूस वर चढून बसण्यास योग्य असें हें मीं शून्यसिंहासन तयार केलें, तें तयार होऊन आज बारा वर्षें होऊन गेलीं, परंतु अद्याप तो महासामर्थ्यवान् अल्लमप्रभु आला नाहीं. ॥ ५ ॥ अल्लमप्रभु माझ्या प्राणांचा ईश्वर आहे, व त्यावर माझी मोठी श्रद्धा आहे, ती कितीही सांगितली तरी पुरी होणार नाहीं. तो अल्लमप्रभु येथें येऊन माझ्या मनाचा विकल्प दूर करून मजवर केव्हां दया करील ? ॥ ६ ॥ तो अल्लमप्रभु पूज्य लोकांत श्रेष्ठ असून सर्वांतर्यामी आहे, तो शिवयोगाचें मर्म मला

ऽधिगमय्य सम्यक् । अनुग्रहिष्यत्यखिलान्तरात्मा कदा नु संधास्यति वा मुदं हृत् ॥ ६ ॥ प्रज्ञाबलान्मत्कृतदिव्यपीठं राज्ञा यथाज्ञातसुभृत्यकृत्यं । तथाऽल्लमेन्द्रानधिरोहणेन वृथा कथं स्यादथवेश्वराज्ञा ॥ ७ ॥ इत्थं हृदन्तर्बसवो विचिंत्य स्वयं बहिःस्थातुमनौचितीति । एकान्तमासाद्य यथोपदेशं प्राणान् रुरोधासनबन्धधीरः ॥ ८ ॥ अर्थेभ्य आहृत्य दशेंद्रियाणि तानि क्रमात्स्थूलतनोर्वियोज्य । लिंगानुसंधैक्यपदे सुसूक्ष्मे संस्थापयामास समाधिनिष्ठः ॥ ९ ॥ जिता यतः पूर्वसबीजभूमिः प्रभोः कृपायास्तत एव धीरः । अवाप्तनिर्बीजसमाधिभूमिश्चिरं निजानंदमयो बभूव ॥ १० ॥ समाधिसौख्यानुभवेन नित्यं व्युत्थानकालेऽपि जगत्समस्तं । लिंगात्मकं नान्यदिति स्थिरात्मा पुनःपुनश्चापि समाहितोऽभूत् ॥ ११ ॥ कदाचिदागत्य समाधिकाले सुनिर्मलेऽन्तर्मुखदर्पणेऽस्य । प्रभुः स्फुरन्प्रीतमना विभूतिं दधौ स्वयं

---

चांगल्या रीतीनें सांगून माझ्यावर कृपा कधीं करील? व त्यामुळें माझ्या मनास सुख कधीं देईल? ॥ ७ ॥ मीं आपल्या बुद्धिबलानें हें उत्तम शून्य सिंहासन तयार केलें आहे; ज्याप्रमाणें आपल्या चाकरांनीं केलेल्या कामाचा राजा स्वीकार करितो, त्याप्रमाणें अल्लमप्रभु या सिंहासनाचा स्वीकार कां करीत नाहीं? ईश्वराची आज्ञा व्यर्थ तरी कशी होईल? ॥ ८ ॥ ह्याप्रमाणें बसवेश्वर आपले मनांत विचार करून आतां सर्व लोकांत उघडपणें राहणें मला योग्य नाहीं असें जाणून एकांतस्थळीं जाऊन अल्लमप्रभूनें उपदेश केल्याप्रमाणें प्राणांचा रोध करून निश्चल समाधीचें आसन लाऊन बसला. ॥ ९ ॥ विषयसुखापासून बसवेश्वरानें आपलीं दहाही इंद्रियें वळविलीं, व क्रमाक्रमानें स्थूल देहापासून सूक्ष्म देहाकडे व तेथून लिंगैक्याच्या स्थानीं समाधिसाधनानें वळविलीं. ॥ १० ॥ अल्लमप्रभूच्या कृपेमुळें त्यानें पूर्व सबीजभूमि जिंकली, नंतर त्यामुळेंच त्यास धैर्य येऊन दुसरी त्यास निर्बीज समाधिभूमि प्राप्त होऊन तो बसवेश्वर चिरकाळ आत्मानंदस्वरूप झाला. ॥ ११ ॥ समाधिसुखाच्या अनुभवामुळें समाधि सोडून उठला तरी, हें सर्व जग लिंगस्वरूप आहे असें बसवेश्वर नेहमीं मानीत असे, आणि त्याचें मन नेहमीं स्थिर असे. ह्यामुळें त्यानें वारंवार समाधि लावण्याचा क्रम ठेवला. ॥१२॥ एके वेळीं बसवेश्वरानें समाधि लाविली असतां, त्याच्या स्वच्छ अन्तर्मुखरूप आरशांत अल्लमप्रभु स्पष्ट दिसला व त्या अल्लमप्रभूनें संतुष्ट होऊन निर्मल तत्वरूपी

निर्मलतत्वरूपां ॥ १२ ॥ ग्रह्वप्रसादोऽयमिति प्रभोस्तद्विभूतिमादाय स दण्डनाथः । आनंदबाष्पांचितनेत्रपद्मो बभूव भक्त्या पुलकांकितांगः ॥ १३ ॥ अन्तर्हितोऽभूत्प्रभुरल्लमोऽथ व्युत्थाय सद्ध्यानसमाधियोगात् । विस्फूर्जदत्यूर्जितदक्षनेत्रभुजांगयष्टिर्बसवो बभूव ॥ १४ ॥ स भागिनेयं सुगुणाभिधेयं छन्नाव्हयं सज्जनताविधेयं । स्वयं समाहूय समाधिदृष्टं विस्पष्टमस्मै कथयांबभूव ॥ १५ ॥ यो वेदशास्त्रादिभिरप्यवेद्यस्सोऽयं परं ज्योतिरनादिराद्यः । परः शिवोऽस्मत्प्रभुरागतोऽस्मान्नानंदयिष्यत्यचिरेण देवः ॥ १६ ॥ इत्थं तदाज्ञापितमात्मनीनं छन्नाभिधोऽयं बसवो निशम्य । आनंदलीलामृतपारवश्यात्प्रत्युद्गमोद्युक्तमना बभूव ॥ १७ ॥ उत्कण्ठितस्तत्क्षण एव सोऽयमाहूय तान्कर्मकरानशेषान् । प्रसाधनायास्य पुरस्य शीघ्रमाज्ञापयामास विभुः समन्तात् ॥ १८ ॥ पुरीमलंचक्रुरिमे समन्तात्संमार्ज्य

---

विभूति त्यास दिली. ॥ १३ ॥ हा अल्लमप्रभूचा माझ्यावर मोठा अनुग्रह झाला असें त्या राज्याधिकार चालविणाऱ्या बसवेश्वरानें मानिलें व ती विभूति घेतल्यावर त्याच्या डोळ्यांस आनंदाश्रु येऊन ते भरून आले व भक्तीमुळें त्याच्या सर्व अंगावर दाट शहारे आले. ॥ १४ ॥ विभूति देऊन अल्लमप्रभु लागलाच गुप्त झाला, मग बसवेश्वर त्या उत्तम रीतीच्या समाधीपासून उठला, तेव्हां त्या विभूतीच्या प्राप्तीमुळें त्यास अतिशय आनंद होऊन त्याचे डोळे, हात व शरीर सतेज दिसून शोभूं लागले. ॥ १५ ॥ बसवेश्वरानें लागलेंच चांगल्या गुणांमुळें शोभणाऱ्या व चांगल्या रीतीनें वर्तन करणाऱ्या छन्नबसवेश्वरास जातीनें हांक मारून समाधीमध्यें मला अल्लमप्रभूचें दर्शन होऊन त्यानें मला विभूति दिली, हें आनंदाचें वर्तमान सांगितलें. ॥ १६ ॥ व ह्मणाला, अरे छन्नबसवा, ह्या अल्लमप्रभूची यथार्थ माहिती वेदांस व शास्त्रांस देखील नाहीं, हा अल्लमप्रभु श्रेष्ठ परब्रह्मस्वरूप तेज आहे, ह्यास जन्म नसून हा सर्वांच्या आधींपासून आहे, हा श्रेष्ठ शिव आमचा गुरु असून तो देव आह्मांस सुख देण्यासाठीं खचित लवकर येईल. ॥ १७ ॥ असें बसवेश्वरानें सांगितलेलें आपल्या मनाजोगें वर्तमान ऐकतांच हा छन्नबसवेश्वर आनंदसमुद्रांत बुडून जाऊन एकदम देहभान विसरला व लागलाच अल्लमप्रभूस सामोरा जाण्यास निघाला. ॥ १८ ॥ छन्नबसवेश्वर उतावीळ होऊन लागलेच त्यानें सर्व अधिकारी व मजुरदार लोक बोलावून आणले, व लवकर लवकर सर्व शहर सुशोभित करण्यास त्यांस आज्ञा केली. ॥ १९ ॥ त्यांनीं रस्ते

धूलीः पुरवीथिकासु । सत्कृत्य गन्धोदकसेचनेन पुष्पाणि सर्वत्र तथोपजन्हुः ॥ १९ ॥ प्रासादसौधोपरि गोपुरेषु सालेष्वथाट्टालकतोरणेषु । सुवर्णकुंभोपरि दर्पणोद्यद्ध्वजावलीसन्नहनं प्रचक्रुः ॥ २० ॥ तदुत्सवं पौरजनाः समन्तादाकर्ण्य तत्तद्भवनांगणेषु । कस्तूरिकाम्भोभिरथानुलिप्य व्यचित्रयन्मौक्तिकरंगवल्लीः ॥ २१ ॥ भित्तीरलंकृत्य विचित्रजालैस्सर्वत्र रत्नोज्ज्वलहेमदण्डान् । संस्थाप्य तत्रोपरि दीप्यमाना वितानपंक्तेः परितो बबन्धुः ॥ २२ ॥ मुक्तावलिस्वच्छगुलुच्छरेखाः सन्नह्य तद्वन्मणिमालिकाश्च ॥ मध्ये कनद्वर्तुलदर्पणालीर्वितानगर्भेषु विनिन्युराढ्याः ॥ २३ ॥ रंभोज्ज्वलस्तंभविराजितानि द्वाराणि जांबूनदवस्त्रकूर्चैः । सपल्लवैस्सन्मणितोरणैश्च विभूषयामासुरभूतपूर्वं ॥ २४ ॥ गृहे गृहे प्रोन्नतकेतनानि प्रबध्य वीथीषु च वाद्यघोषैः । यथेनरश्मिः प्रसरेन्न किंचित्तथा बबन्धु-

---

चोहोंकडून चांगले झाडून काढवून स्वच्छ केले, व त्यांवर सुगंधि पाण्याचे सडे शिंपून त्यांवर सर्व ठिकाणीं फुलें पसरलीं; अशा रीतीनें त्यांनीं सर्व कल्याणनगर सुशोभित केलें. ॥ २० ॥ मोठमोठ्या वाड्यांवर, राजवाड्यांवर, वेशींवर, गांवकुसांवर, चौकांत, दारांवरील दर्पणांनीं सुशोभित केलेल्या सुवर्णकुंभांवर स्वच्छ पताका चोहोंकडे लावण्याची त्यांनीं तयारी केली. ॥ २१ ॥ तो समारंभ पाहून नगरवासी लोकांनींही आजूबाजूस भोंवतालीं व सर्व ठिकाणीं आपापल्या घरांच्या आंगणांत कस्तूरीच्या पाण्याचे दाट सडे टाकिले, व त्यांवर चित्रविचित्र मोत्यांच्या रांगोळ्या काढल्या. ॥ २२ ॥ भिंतींवर अनेक प्रकारच्या वेलबुट्टी काढून त्या सुशोभित केल्या व जागोजाग रत्नजडित सोन्याचे खांब उभे करून त्यांवर सुशोभित अशीं छतें घालून मांडव तयार केले व कमानी तयार केल्या. ॥ २३ ॥ मोत्यांचें पीठ करून व त्यांत गुलाल मिसळून रांगोळ्या घातल्या; तशाच रत्नांच्या माळांत सुंदर वाटोळे वाटोळे आरसे बसवून श्रीमंत लोकांनीं त्यांचीं प्रतिबिंबें आकाशांत पडतील असें केलें. ॥ २४ ॥ दारोदार केळीचे खुंट उभे केले, व त्यांवर जरीचे वस्त्रांचे पदर लोंबत सोडले, व दारांस रत्नांचीं तोरणें बांधून नगरास अशी शोभा आणिली कीं, तशी पूर्वीं कधींच आली नव्हती. ॥ २५ ॥ घरोघर उंच उंच गुढ्या उभ्या केल्या, जागोजाग वाजंत्री बसवून सुस्वर वाद्यें वाजविण्याची सोय केली, रत्नांचीं तोरणें तर इतकीं दाट

मणितोरणानि ॥ २५ ॥ घुमंघुमामोदलसत्प्रसूनप्रवालरत्नावलिभिः समन्तात् ॥ धूपैश्च कस्तूरिसुगंधिलेपैरलंप्रचक्रुः पुरि पण्यवीथीः ॥ २६ ॥ कल्याणमेतन्नगराधिराजं समस्तकल्याणगुणाभिरामम् । लक्ष्मीसरस्वत्युपलाल्यमानं लक्ष्यं बभूवामरपुंगवानां ॥ २७ ॥ महोत्सवस्तद्वसवाधिपस्य गृहे सुधर्माधिपतेरिवासीत् । उघे हरेति ध्वनिभिर्गणानां लघूकृतोऽभून्मथितांबुराशिः ॥ २८ ॥ तदाऽल्लमो मे प्रभुरागमिष्यत्यहो कदा कैस्सह किं प्रकारः । न बुध्यते संप्रति कुत्रवीथ्यामिति स्म दध्यौ बसवो हृदब्जे ॥ २९ ॥ स्थातुं न युक्तं सदने विधेयः प्रत्युद्गमो द्रागिति भक्तसंघैः । स दण्डनाथः सकलैः सभायां विनिर्ययावल्लमदत्तचित्तः ॥ ३० ॥ प्रत्युज्जगाम बसवो मणिवालनाथश्रीमाचयार्यवरकिन्नरसंयमिभ्यां । स च्छन्नवीरबसवः प्रभुलिंगमू-

---

बांधलीं कीं, त्यांतून रस्त्यावर सूर्याचे उन्हाचें एक किरण देखील खालीं दिसत नव्हतें. ॥ २६ ॥ जागोजाग सुवासिक फुलें आणि पानें आणून पसरलीं, कृष्णागरुचंदनाचे जागोजाग धूप पेटविले, व नगरींतील बाजारांतील सर्व रस्ते कस्तूरीचे सडे शिंपडून व सुगंधि धूप जागोजाग पेटवून सुशोभित केले. ॥ २७ ॥ हें कल्याणनगर सर्व नगरांत राजधानीचें मुख्य नगर असल्याप्रमाणें दिसत होतें. सर्वप्रकारचे कल्याणकारक गुण त्या नगरवासी लोकांच्या अंगांत होते, त्या नगरांत लक्ष्मी आणि सरस्वती दोघीही नांदत होत्या, ( लोक सधन आणि विद्वान् होते ) त्यामुळें देवांतील मुख्य मुख्य देवांस देखील तें नगर पहावेंसें वाटूं लागलें.॥२८॥ बसवेश्वराचे घरीं तर जशी इंद्राच्या सुधर्मा नांवाच्या देवसभेंत आरास व्हावी तशी आरास झाली, व "उघे उघे, हर हर" अशा जयजयकार शब्दांनीं प्रमथगणांनीं असा जयघोष चालविला कीं, त्यापुढें समुद्रमंथनाच्या वेळीं देवदैत्यांचा झालेला गलबला कांहींच नाहीं. ॥ २९ ॥ तेव्हां बसवेश्वर आपले मनांत नेहमीं काळजी करूं लागला कीं, माझा अल्लमप्रभु केव्हां येईल? कोणाबरोबर येईल ? कोणत्या रीतीनें येईल? तो सध्यां कोणत्या रस्त्यावर असेल? हें कांहीं मला कळत नाहीं. ॥ ३० ॥ आतां मला घरीं स्वस्थ बसून उपयोगीं नाहीं, भक्तमंडळीबरोबर घेऊन लवकर सामोरे जाणें चांगलें, असें मनांत आणून तो अधिकारी बसवेश्वर सर्व लोकांसह सभेंतून अल्लमप्रभूकडे आपलें लक्ष्य लाऊन त्यास सामोरा निघाला. ॥ ३१ ॥ बसवेश्वर मणिवाल, किन्नरार्य, व अल्लमप्रभूचा पट्टशिष्य विद्वान् हठप-

**तैरासेवितो हठपदार्पणसूरिणा सः ॥ ३१ ॥ अन्यैरनन्यहृदयैरभितो गजाश्वारूढैर्गणैः परिवृतो गणनातिगैस्तैः । भण्डारिवीरबसवः प्रययौ नृपालवृन्दैरमंदविभवैरपि पृष्ठभागे ॥ ३२ ॥ संसेवितो नवभिरात्मसमप्रधानैरन्यैर्भटप्रकरमागधबंदिवृन्दैः । संस्तूयमान-बिरुदावलिगद्यपद्यो हृद्यल्लमांघ्रियुगुलं कलयन्ययौ सः ॥ ३३ ॥ तत्रोन्नताकृतिभिरुज्वलवेत्रहस्तैर्विज्ञाततत्तदवनीधवतारतम्यैः । आहो प्रयात धुरि तिष्ठत सावधानं दूरे तथाऽपसरतेति वचोऽभ्यधायि ॥ ३४ ॥ संबाधवारणपरैः परिसेव्यमानः संचाल्यमानरणदंडुककु-न्तहस्तैः ॥ उत्पत्य तानुपनिगृह्य कृताट्टहासैरुक्त्वा स्वनाम पटुवीर-भटैर्ययौ सः ॥ ३५ ॥ खेटैः ससंभ्रमतया धृतखड्गखेटैर्भूयः कृतां-जलिपुटैश्च निजाभिमुख्यात् । दूरस्थितैः सविधगैश्च विनम्रकायैः**

---

दार्पण, यांस बरोबर घेऊन सामोरा निघाला. ॥ ३२ ॥ दुसरे तसेच मनापासून अल्लमप्रभूची भक्ति करणारे प्रमथगण कोणी हत्तीवर बसले, कोणी घोड्यावर बसले व सामोरे येण्यास निघाले, अशा सामोरे येणाऱ्या लोकांची तर गणतीच नव्हती. मागें मोठ्या ऐश्वर्यवान् अशा मांडलिक राजांचा समुदाय येतो आहे अशा थाटानें भंडारी वीर बसवेश्वर सामोरा चालला. ॥ ३३ ॥ आपल्या बरोबरीच्या नऊ प्रधानांसहित व दुसरे अनेक योद्धे बरोबर घेऊन स्तुतिपाठक, भाट वगैरे लोक गद्याचे रूपानें आणि पद्याचे रूपानें ज्याच्या गुणांचें वर्णन करितात, असा तो बसवेश्वर मनामध्यें अल्लमप्रभूच्या दोन्ही चरणकमलांचें स्मरण करीत सामोरा निघाला. ॥ ३४ ॥ त्यावेळीं चांगला पोषाख करून हातामध्यें सुंदर वेताच्या छड्या घेऊन भालदार लोकांनीं आपापल्या राजांचीं नांवें सर्व लोकांस कळविलीं; व पुढें चला, सावधपणानें उभे राहा, लांब सरा, असे शब्द उच्चारले. ॥ ३५ ॥ बसवेश्वर अल्लमप्रभूस सामोरा जात होता ती मौज पाहण्यास लोकांची अतिशय गर्दी झाली; ती मोडण्यासाठीं शिपाईलोक बरोबर होते, त्यांनीं ती मोडली, व बसवेश्वरास सुख दिलें. नंतर लढाईचे वेळचे दंड व भाले हातांत घेतलेले लष्करी लोक पुढें येऊन सर्वांची गर्दी मोडून मोठ्यानें आपापलें नांव उच्चारून बसवेश्वरास नमस्कार करून पुढें चालूं लागले. अशा समारंभानें बसवेश्वर सामोरा निघाला. ॥ ३६ ॥ पायानें चालणाऱ्या पायदळ लोकांनीं घाई घाईनें हातांत ढालतरवारी घेऊन हात जोडून बसवेश्वरास मुजरे केले. व नम्रतेनें कांहीं पुढें लांबून चालले, कांहीं बाजूंनीं जवळून चालले,

**पृष्ठैर्नटद्गतिगतैश्च भटैर्ययौ सः ॥ ३६ ॥ अर्काश्वसंयमपरैर्जवनैर्महाश्वैरैरावणस्फुरणवारणवारणौघैः । संख्यातिगैरतुलपुष्परथैरनेकैस्साकं ययौ बसवमंत्रिवरो मनस्वी ॥ ३७ ॥ चित्रांबराणि रमणीयतराणि धृत्वा भक्तस्त्रियः कलशदर्पणपाणिपद्माः । सद्भूषणा निटिलभास्वरभूतिरेखा जग्मुः पुरो बसवमंत्रिवरस्य बह्वयः ॥ ३८ ॥ भावप्रबोधनिपुणाः कवयस्तथैव तत्राशु कल्पितगुणाद्भुतकाव्यपाठैः । अप्रीणयन् हृदयमस्य तथा रसज्ञा नाट्यक्रमैर्भरतशास्त्रकलाप्रवीणाः ॥ ३९ ॥ छत्रैर्विचित्रकलशैः सितचामरौघैर्दैदीप्यमानवलयैर्व्यजनालवट्टैः ॥ वर्णानुरंजितमुहुर्मुहुरास्तृतां च संवीज्यमानपटकूचेशतैर्ययौ सः ॥ ४० ॥ रामाः पुरंदरवधूविजयाभिरामसद्दाम-**

---

कांहीं मागून चालले अशा रीतीनें चालणाऱ्या योध्यांसह बसवेश्वर सामोरा चालला. ॥ ३७ ॥ बसवेश्वराचे बरोबर जे घोडे होते ते इतके जलद चालणारे होते कीं, सूर्याच्या रथाच्या घोडयांस देखील मागें टाकीत; हत्ती इतके बळकट होते कीं, ऐरावण दिग्गजाची मस्ती जिरविण्यास ते कमी करणारे नव्हते; उत्तम उत्तम असे रथही अनेक होते. अशा थाटानें बसवेश्वर सामोरा निघाला. ॥ ३८ ॥ बसवेश्वराचे बरोबर पुष्कळ सुवासिनी पतिव्रता भक्तांच्या स्त्रिया असून त्या पुढें चालत होत्या, त्या अनेक प्रकारचीं चांगलीं चांगलीं उंची लुगडीं नेसल्या होत्या, कलश आणि आरसा प्रत्येकीनें आपल्या हातांत घेतला होता, अंगावर बहुमोल असे अलंकार प्रत्येकीनें घातले होते, व कपाळावर शोभिवंत विभूतीच्या रेषा (पट्टे) ओढल्या होत्या. ॥ ३९ ॥ बसवेश्वराबरोबर अभिप्राय चांगल्या रीतीनें व्यक्त करणारे असे कविही पुष्कळ होते; त्यांनीं लागलेच अनेक तऱ्हेचे रसभरित श्लोक नवीन तयार करून ह्मणून दाखवून बसवेश्वरास संतुष्ट केलें. तसेंच नाट्यकलेमध्यें प्रवीण असणाऱ्या बरोबरच्या कित्येक हौशी लोकांनीं नृत्य करून बसवेश्वराचे मनास सुख दिलें. ॥ ४० ॥ अनेक प्रकारचीं छत्रें, गमती गमतीचे (चित्रविचित्र) कलश, पांढरे पांढरे शुभ्र चामरांचे समुदाय, ह्यामुळें व लखलखीत ज्यांच्या भोंवतालच्या बाजू आहेत अशा विंझणवाऱ्यामुळें व नानाप्रकारच्या रंगांमुळें सुशोभित दिसणाऱ्या वरचेवर पसरणाऱ्या व गोळा होणाऱ्या पताकांवरील वस्त्रांमुळें त्या सामोरे जाण्याचे समारंभास ज्यास्त शोभा आली होती. अशा थाटानें बसवेश्वर सामोरा चालला. ॥ ४१ ॥ बसवेश्वराच्या पुढें ज्या स्त्रिया चालत होत्या त्या देवांगनांस देखील लाजवितील

णीयकनिजावयवाभिरामाः । नीराजनोद्यतकराहितहेमपात्राश्चित्रं विचेरुरुभयत्र पुरोऽस्य मार्गे ॥ ४१ ॥ पादौ सरोरुहजितौ पदकंकणान्तर्मुष्टेरपूर्णमवलग्नमभूच्च यासां ॥ ता निर्भरोरुजघनस्तनभारधुर्या धैर्याद्ययुर्विधृतसाधनपाणिपद्माः ॥ ४२ ॥ चंचन्मदालसदपांगदृशः स्मितास्याश्चेष्टाविलासभरिताः सरसोक्तिसाराः ॥ मिथ्यावचःकपटसत्यमृषाप्रमोहा वाराङ्गनाश्च बसवं पुरतोऽनुजग्मुः ॥ ४३ ॥ इत्थं महाविभवनिर्जितराजराजे प्रत्युद्गमोद्यतगतौ बसवाधिराजे । ये तत्र संति कतिचित्परवादिबौद्धास्ते तद्विभूत्यसहनादभजञ्जुगुप्सां ॥ ४४ ॥ गत्वाऽथ बीजलनृपं परवादिनस्ते कानि प्रकल्प्य वचनानि मृषैव धूर्ताः । ज्ञातप्रभूद्गमनवार्ततया तदीयमुन्मादिवर्तनसमं कथयांबभूवुः ॥ ४५ ॥ स्वप्ने विलोक्य परिपक्वफलानि

---

इतके त्यांचे अवयव नाजुक होते. त्यांनीं लखलखीत सोन्याचें नीरांजनपात्र हातांत घेतलेलें होतें, व त्या दोन्ही बाजूनें चालत होत्या. ॥ ४२ ॥ त्यांचे पाय कमलास जिंकतील इतके नाजुक होते व त्यांची कंबर इतकी बारीक होती कीं, त्यांच्या पायांतील सांखळ्या कमरेस घातल्या तर त्या देखील पोकळ होत असत; त्यांचे त्यांस स्तनांचें व ढुंगणांचें ओझें ज्यास्त होत होतें, तरी त्या पूजापात्र हातांत घेऊन तशाच धैर्यानें सामोऱ्या जात होत्या. ॥ ४३ ॥ तरुण असल्यामुळें त्यांचे डोळे चंचल होते, त्या सर्वजणी हंसतमुख होत्या, त्या अनेक प्रकारच्या चेष्टा व हावभाव करीत होत्या, त्यांचें बोलणें फार गोड होतें. खोटें बोलणाऱ्या, कपटी व लटकी प्रीति दाखविणाऱ्या, वेश्याही बसवेश्वराबरोबर सामोऱ्या जाण्यास निघालेल्या होत्या व त्या बसवेश्वराच्या पुढें चालत होत्या. ॥ ४४ ॥ अशा रीतीनें आपल्या ऐश्वर्यामुळें कुबेरास देखील लाजविणारा बसवेश्वर अल्लमप्रभूस सामोरा जाण्यास निघाला असतां, त्या वेळीं तेथें जे कितीएक परधर्मी नास्तिक बौद्ध होते, त्यांस बसवेश्वराचें ऐश्वर्य सहन न होऊन ते बसवेश्वराची निंदा करूं लागले. ॥ ४५ ॥ ते कपटी लोक लागलेच बीजल राजाकडे गेले व खोट्या खोट्या कांहीं गोष्टी बनवून बसवेश्वराच्या स्वप्नांत अल्लमप्रभु आला ह्मणून तो सामोरा चालला आहे व असें अभिष्टासारखें भलतेंच वर्तन बसवेश्वर करीत आहे, ह्मणून राजाजवळ त्याची निंदा करूं लागले. ॥ ४६ ॥ तें ह्मणाले राजा, जसें स्वप्नांत एखाद्या मनुष्यानें उत्तम उत्तम पिकलेले

**वृक्षे तस्मात्प्रबुध्य पुनरत्तुमिहेच्छतीव । दृष्ट्वा हठेन शुभसूचनमात्रमेष भ्रान्त्या तनोति जगदद्भुतदांभिकत्वं ॥ ४६ ॥ राजा निशम्य वचनं स्वमताभिमानात्किंचित्प्रकुप्य हृदये पुनरप्युवाच । आहो मदीयनगरे मयि वर्तमाने त्यक्त्वा ममानुमतिमेष कथं विधत्ते ॥ ४७ ॥ स्वप्ने तु किंचिदिह भस्मनि दीयमाने भ्रान्ति धराधरसमां बसवः प्रपेदे । भक्तोऽथवा भजतु लोकविरुद्धमर्थं सत्यं स एव भवतां किमु तेन हानिः ॥ ४८ ॥ वेत्ति स्वमेव महिमानमसौ स्वकीयं नो जात्वलौकिकमिदं वयमत्र विद्मः ॥ विज्ञायते च सकलैः पुनरेतदन्ते दृष्ट्वैव तावदधुना ननु भिद्यतां सः ॥ ४९ ॥ उक्त्वेत्थमेव नृपतिः पिशुनान्स्वकीयांस्तूष्णीं बभूव मनसाऽऽहितरोषपूरः ॥ विज्ञाय तन्नृपतिचित्तमसौ महात्मा चिन्तां चकार महतीं बसवाधि-**

---

आंबे पहावे, आणि जागें झाल्याबरोबर ते खाण्याची इच्छा करावी, तसेंच बसवेश्वरास अल्लमाचा नेहमीं निदध्यास असल्यामुळें अल्लम येतो असें स्वप्न पडतांच तें खरें समजून मूर्खपणानें डौल माजवून सामोरें जाण्याचें कसें लोकविरुद्ध वर्तन हा करीत आहे पहा ! ॥ ४७ ॥ राजानें त्या लोकांचे हें बोलणें ऐकतांच त्यालाही आपल्या मताचा (बौद्धमताचा) अभिमान असल्यामुळें तो आपल्या मनांत रागावला व पुन्हा ह्मणाला, काय आश्चर्य आहे! माझ्या शहरांत मी असतांना माझी परवानगी घेतल्यावांचून बसवेश्वर हें भलतेंच काय करीत आहे? ॥ ४८ ॥ बसवेश्वरास अल्लमानें स्वप्नांत भस्म दिलें काय! आणि त्यामुळें हा पर्वताएवढा मोठा वेडेपणा करित आहे काय! तो भक्त आहे तर त्या अल्लमाची खुशाल भक्ति करो; हें काम करीत आहे (सामोरा जात आहे) हेंही लोकविरुद्ध आहे हें खरें आहे, परंतु त्यापासून तुमचें नुकसान काय आहे? ॥ ४९ ॥ तो आपलें महत्व समजतो आहे हें त्याचें त्यालाच माहीत असेल. आह्मांला तर त्यांतलें कांहींएक समजत नाहीं; आतां सामोरे जाण्याचा काय प्रकार होतो तो आपोआप सर्वांस समजेलच. अल्लम आला नाहीं तर आपोआपच बसवेश्वराची फजीती होईल. ॥ ५० ॥ बीजल राजानें अशा तऱ्हेनें त्या आपल्या मताच्या दुर्जन लोकांस समर्पक उत्तर देऊन सर्वांस निरुत्तर तर केलेंच; परंतु बसवेश्वराचें करणें त्यास न आवडल्यामुळें तो मनांत बसवेश्वराचा द्वेष करूं लागला. राजाची गैरमर्जी झालेली समजतांच त्या सुस्वभावाच्या बसवे-

**नाथः ॥ ५० ॥ नायाति किं मम गुरुः प्रभुरल्लमेन्द्रो लोकेऽपहास्यचरितोऽस्म्यथवा महेशः ॥ सर्वत्र चास्ति मयि किं निगमागमानां कर्ता स एव भगवान्परवादिजेता ॥ ५१ ॥ इत्थं विचिंतयति भक्तकुलावतंसे हंसोल्लमोन्तरमवेत्य तदा तदीयं ॥ शीघ्रं न यामि यदि भूमिविभुर्जनाश्च भक्तं हसन्ति न तथास्त्विवति साधु मेने ॥ ५२ ॥ मत्वेति चिन्मयवपुः स्वयमप्यधीशः प्रोन्मत्तवेषभृदयं गुरुमण्डलेन्द्रः ॥ साक्षाद्बभूव बसवादिगणाधिनाथैर्ज्ञेयो न पामरजनैर्विषयैकलुब्धैः ॥ ५३ ॥ ह्रस्वांगसंगततनुः कुटिलांघ्रिरीषच्छ्मश्रूः कषायितकचो गडुवक्रकण्ठः ॥ क्षुभ्यत्कटिर्बहुलरोमततिः कुदृष्टिराक्रोशवाक्चलगतिर्विकृताट्टहासः ॥ ५४ ॥ नीलापसारविकसद्व्रणराजिरन्तर्ध्यायन्रुदन्परिहसन्कृशलंबकर्णः ॥ लालाक्षरन्मुखबिलः प्रभुराजगाम**

---

श्वराला मोठी काळजी पडली. ॥ ५१ ॥ बसवेश्वर मनांत ह्मणूं लागला, माझा गुरु अल्लमप्रभु येत नाहीं काय? लोकांमध्यें माझी फजीती होण्याची वेळ आली किंवा तो महेश्वर वेदांचा व आगमांचा कर्ता आहे तो सर्वत्र आहे, मग माझ्यांत कसा नसेल? तो परवादी लोकांस जिंकणारा आहे, मग मी काळजी तरी कां करूं? ॥ ५२ ॥ अशा रीतीनें तो भक्तकुलांतील श्रेष्ठ बसवेश्वर काळजी करूं लागला असतां, तो हंसस्वरूपी भगवान् अल्लमप्रभु त्या बसवेश्वराच्या मनांतील भाव जाणून आपले मनांत ह्मणूं लागला. जर मी आतां लवकर भूमीवर जाणार नाहीं, ( बसवेश्वराचे नगरांत जाणार नाहीं, ) तर माझ्या भक्तास सर्व लोक हंसूं लागतील; तर असें होणें हें कांहीं चांगलें नाहीं. ॥ ५३ ॥ हें मनांत आणून तो चित्स्वरूप अल्लमप्रभु लागलेंच स्वतः एका वेडगळ मनुष्याचें रूप घेऊन कल्याणनगरास आला. तें त्याचें कृत्रिमरूप बसवेश्वरादिक गणनायकांस समजलें. विषयसुखांत निमग्न असणाऱ्या इतर अज्ञान लोकांस कांहीं समजलें नाहीं. ॥ ५४ ॥ अल्लमाचें रूप ह्मटलें तर ठेंगू मनुष्यासारखें असून पाय वांकडे होते, थोडथोड्या तोंडावर मिशा उगवलेल्या होत्या, आंगावर रांठ केस होते, गळ्याला आवाळू आल्यामुळें तोंड वांकडें झालें होतें, कंबर मोठी होती, अंगावर लव फार होती, डोळे वाईट होते, शब्द कर्कश होता, मन चंचळ असून त्यास हसतांना वेडेंवांकडें तोंड करून हंसण्याची संवय होती. ॥ ५५ ॥ अंगावर जागोजाग व्रण झाले असून त्यांतून निळ्या रंगाचें रक्त व पू सारखा वाहत होता, मनाशींच बोलण्याची संवय होती, घटकेंत रडावें, घटकेंत हंसावें,

भृंगीश्वरः स्वयमिवाश्रितवत्सलोऽसौ ॥ ५५ ॥ इत्थं प्रभुर्नगरमेत्य विनिंदतोऽपि कांश्चिज्जनान्प्रतिवदन्स्वयमाशिषैव ॥ कांश्चित्प्रताडन-परान् स्तुतिमेव चक्रे गायज्जनान्प्रति जगौ नटतो ननाट ॥ ५६ ॥ कांश्चिच्च भूषणपरान्प्रतिभूष्य तत्र कांश्चिन्नियुद्धचतुरान्प्रतियुध्य धीरः ॥ कांश्चिन्नमस्कृतिपरान्प्रति नम्रमूर्धा कांश्चिद्विकारवदनान्विकृतिं चकार ॥ ५७ ॥ बालान्विलोक्य पुरि बालवदेव देवश्चिक्रीड कुत्र च पपात धरातलेऽसौ ॥ उत्थाय शीघ्रमभवोऽर्भकवच्च केषां केषां च वृद्धवद-भूत्परिदृश्यमानः ॥ ५८ ॥ दृष्टः कदा रसिकवत्क· च मूढतुल्यो दृश्यः कदा गगनवत्क च निर्विकारः ॥ दूरे क्वचित्क च समीपगतः कदाचित्सर्वत्र सर्वग इति प्रथयन्स्वशक्तिं ॥ ५९ ॥ इत्थं प्रभोर्वि-

---

अशी स्थिति होती, वाळून गेल्यासारखे लांब लांब कान होते, तोंडाच्या भोंकां-तून नेहमीं लाळ गळत होती. अशा रीतीचें कुत्सित रूप घेऊन अल्लमप्रभु भक्तांचें रक्षण करणाऱ्या भृंगीश्वराप्रमाणें कल्याणनगरांत आला. ॥ ५६ ॥ त्याचें तें कुत्सित रूप पाहून कितीएक लोक त्याची निंदा करूं लागले, तरी त्यांस त्यानें त्यांच्या निंदेबद्दल यत्किंचित् दुःख न दाखवितां उलट आशीर्वाद दिले. कोणी वेडा समजून त्यास मारूं लागले तरी त्यानें त्यांची स्तुति केली. गाणाऱ्या व नाचणाऱ्या लोकांबरोबर तो स्वतः गाऊं लागला व नाचूं लागला. ॥ ५७ ॥ कितीएकांनीं अल्लमाचा अलंकार वस्त्र वगैरे देऊन सन्मान केला, त्यांचा उलट अल्लमानें सन्मान केला. कोणी कुस्ती करूं लागले त्यांचेबरोबर ह्यानें कुस्ती केली; कोणी नमस्कार केला त्यांस ह्यानें डोकें वांकवून नमस्कार करावा; कोणीं तोंड वांकडें केलें तर त्यास उलट ह्यानें तोंड वांकडें करावें. ॥ ५८ ॥ कोठें वाटेंत लहान मुलें भेटलीं त्यांचेबरोबर लहान मुलांचे खेळ खेळला, कोठें जमिनीवर पडला, कोठें लोकांस तो अल्लमप्रभु लहान मुला एवढा दिसला, कोठें कोणास ह्राताऱ्या मनुष्यासारखा दिसला. ॥ ५९ ॥ कोणास तर रसिक मनुष्यासारखा दिसला, कोणास मूर्ख मनुष्यासारखा दिसला, कोणास आकाशासारखा निर्विकार रूपाचा दिसला, कोणास अगदीं जवळ आहे असा दिसला, कोणास दूर आहे असें भासलें, कोणास तर अल्लमप्रभु चोहोंकडे आहे असें दिसलें. अशा तऱ्हेनें त्या सर्वत्र गति असणाऱ्या परमेश्वरानें आपली अद्भुत शक्ति प्रकट केली. ॥ ६० ॥ अशा रीतीनें स्वच्छंदपणानें फिरणाऱ्या अल्लमप्र-

हरतो महिमावबोधः कस्यापि नाभवदथो बसवेश्वरस्तं ॥ गूढं निधिं भुवि यथांजनसिद्धयोगी तद्वत्सुनिर्मलधियाऽल्लममेव मेने ॥ ६० ॥ उत्कण्ठितः स हृदये पुलकांकितांगः स्वानंदबाष्पलहरीपरिपूर्णनेत्रः ॥ भक्तैः समं सविधमेत्य निधाय भस्मताम्बूलमाल्यनिचयं पदयोर्ननाम ॥ ६१ ॥ भक्तांगना विनयभक्तियुतास्समेत्य दीव्यन्निजाभरणदीप्तिभिरुल्लसत्सु ॥ दन्ताक्षिहस्तरुहरश्मिषु चारुगीतैर्नीराजनानि विदधुः प्रभुलिंगमूर्तेः ॥ ६२ ॥ वाद्यध्वनिस्फुरणमत्यधिकं बभूव चाटुप्रबंधमपठद्भटबंदिवृंदं ॥ पौरास्समेत्य विनयेन ववंदिरेऽमुं भंगं मुखेषु परवादिगणाः प्रपेदुः ॥ ६३ ॥ कल्याणपट्टणमिति प्रथितं पृथिव्यां यद्वादशप्रथितयोजनविस्तृतं तत् ॥ सर्वं प्रभूत्तमसमागमने बभूव कल्याणदीपकरपौरसतीसमेतं ॥ ६४ ॥ भक्तव्रजे प्रमुदिते

---

भूचें यथार्थ ज्ञान कोणासच झालें नाहीं, परंतु एखाद्याच्या डोळ्यांत मांत्रिकानें दिव्य अंजन घातल्यावर त्या योग्यास भूमींतील जसें द्रव्य दिसतें, त्याप्रमाणें त्या आपल्या निर्मल ज्ञानामुळें बसवेश्वरानें मात्र त्यास ओळखलें. ॥ ६१ ॥ त्यास ( अल्लमास ) पाहतांच त्याचें ( बसवेश्वराचें ) मन एकदम गहिंवरलें, सर्व अंगावर दाट रोमांच आले, आत्मानंदामुळें आनंदाश्रु येऊन त्याचे दोन्ही डोळे भरून आले. मग लागलाच बसवेश्वर सर्व भक्तमंडळीसह अल्लमाच्या जवळ आला आणि भस्म, विडा, फुलांचा ढीग पुढें ठेवून त्यानें अल्लमाच्या पायांवर डोकें ठेवून नमस्कार केला. ॥ ६२ ॥ भक्त लोकांच्या स्त्रियांनीं लागलेंच पुढें होऊन भक्तिभावानें गाणीं ह्मणत अल्लमप्रभूला नीरांजन केलें. त्या वेळीं त्यांचे अंगावरील बहुमोल अलंकारांचें प्रतिबिंब पडून त्या स्त्रियांचे दांत, डोळे, दोन्ही हस्तकमल सुशोभित दिसूं लागले. ॥ ६३ ॥ त्या वेळीं एकदम चोंहोंकडे मंगल वाद्यें वाजूं लागलीं, स्तुतिपाठक लोक अनेक प्रकारचे प्रबंध तयार करून आनंदानें ह्मणूं लागले, नगरवासी लोक नम्रतेनें पुढें येऊन अल्लमप्रभूस नमस्कार करूं लागले, व बौद्धादिक परवादी लोकांचीं तोंडें अप्रतिष्ठेमुळें काळीं ठिक्कर पडलीं. ॥ ६४ ॥ कल्याणशहर कांहीं लहानसहान गांव नव्हता, तें पृथ्वीवर प्रसिद्ध शहर असून त्याची लांबी रुंदी अठ्ठेचाळीस कोस होती, तें सर्व शहर अल्लमप्रभू आलेला पाहतांच त्यास नीरांजन करण्यासाठीं जिकडे तिकडे नगरवासी लोकांच्या बायकांनीं आपापल्या हातांत पंचारती घेतलेलें असें दिसूं लागलें. ॥ ६५ ॥ भक्तलोकांचा समुदाय संतुष्ट होऊन दोन्ही हात जोडून शरणार्थी

**शरणार्थितोक्त्या भक्त्या कृतांजलिपुटे परितः स्तुवत्सु ॥ पौरव्रजेषु धृतचामरसत्पताकाचित्रातपत्रवलयैः प्रभुराजगाम ॥ ६५ ॥ प्रत्युन्नतांसपरिवर्तनचातुरीषु नारीषु संभृतविलोकनसंभ्रमासु ॥ संवर्धितत्रिभुवनाद्भुतवैभवं तद्गेहं विवेश बसवस्य गुहाधिनाथः ॥ ६६ ॥ गंगांबिकाप्रभृतितद्रमणीमणीषु भक्त्या प्रणम्य जयमंगलशब्दपूर्वं ॥ आरार्तिका विदधतीषु गृहं प्रविश्य देवश्चिदभ्रमणिपीठसमीपमागात् ॥ ६७ ॥ दृष्ट्वा प्रहृष्य गुरुरात्मनि शून्यपीठं सर्वान्निवर्त्य च समागतपौरसंघान् ॥ शिष्यप्रभावमधिगम्य गणेषु पश्यत्स्वारोहणाय विदधे मतिमल्लमेंद्रः ॥ ६८ ॥ सर्वात्मनः सगुणनिर्गुणयोगसंविद्रूपस्य तस्य भुवनत्रयसंविधातुः ॥ चित्रं किमल्लमगुरोरिति भक्तसंघेष्वन्तः स्तुवत्सु गुरुरासनमारुरोह ॥ ६९ ॥ द्वासप्ततिप्रथितनाडिसहस्रबद्धं बुध्वा नरांगमिह कीलितपुत्रिकावत् ॥ यो नाटयेत्किमिदमस्य तथापि**

---

शरणार्थी ह्मणत असतां, नगरवासी लोकांचा समुदाय जयघोष करून स्तवन करीत असतां, कोणी चवऱ्या वारीत आहेत, कोणी छत्र धरीत आहेत, कोणी पताका धरीत आहेत अशा समारंभानें अल्लमप्रभु बसवेश्वराच्या वाड्याकडे जाण्यास निघाला. ॥ ६६ ॥ स्त्रीलोकांचा समुदाय आपापले खांदे चतुरपणानें उंच करून त्या समारंभाची मौज पाहण्यांत गुंतला असतां, त्रैलोक्यांतील ऐश्वर्यापेक्षां ज्यास्त ऐश्वर्य असलेल्या बसवेश्वराच्या घरास अल्लमप्रभु येऊन पोंचला. ॥ ६७ ॥ गंगांबिका वगैरे सर्व स्त्रिया भक्तिपूर्वक नमस्कार करून जयजयकार शब्द करून आरत्या करीत असतां, अल्लमप्रभु बसवेश्वराचे वाड्यांत जाऊन त्या चित्स्वरूप रत्नसिंहासनाजवळ येऊन पोंचला. ॥ ६८ ॥ अल्लमप्रभूनें तें शून्य सिंहासन पाहतांच त्याचे मनास मोठा संतोष वाटला. मग पोंचविण्यासाठीं आलेला नगरवासी लोकांचा समुदाय सर्व आपापल्या घरीं परत पाठविल्यावर, शिष्याचें सामर्थ्य जाणून सर्व प्रमथगण पाहत असतां अल्लमप्रभूनें त्या शून्य सिंहासनावर चढण्याचा विचार केला. ॥ ६९ ॥ हा अल्लमप्रभु सर्वान्तर्यामी आहे, हा देहधारी असून निराकार आहे, तिन्ही लोकांचा उत्पन्नकर्ता आहे, ह्याला ह्या शून्य सिंहासनावर चढण्याचें काय अशक्य आहे ? अशा तऱ्हेनें भक्तलोकांचा समुदाय आपापल्या मनांत स्तुति करीत असतां अल्लमप्रभु शून्य सिंहासनावर चढला. ॥ ७० ॥ हें मनुष्यशरीर बहात्तर हजार नाडींच्या समुदायानें एखाद्या पुतळीप्रमाणें खिळून टाकिलें आहे, त्याला जो नाचवितो

**लोके प्रख्यापनाय बसवाधिपदिव्यकीर्तेः ॥ ७० ॥ आधारभूतमिदमेव हि षट्स्थलानामित्यग्रपीठमुपदर्श्य गुरुस्तदीयं ॥ सत्कीलकं समुपदिश्य गणाधिपेभ्यस्तन्मूलपीठमवलंब्य समारुरोह ॥ ७१ ॥ तत्रस्थगोप्यमुपदिश्य ततः परस्तादेकैकभूमिमधिरुह्य गुरुः क्रमेण ॥ तत्तद्रहस्यमपिताननुभाव्य दीव्यत्सिंहासनाग्रमभवः स्वयमाविवेश ॥ ७२ ॥ षड्भूतषट्कमलषट्स्थलषड्विधांगषड्भक्तिषट्चरणषड्विधवर्णमालाः ॥ षट्छक्तिषड्द्युतिषडंबरषट्प्रयोगान्सम्यग्दिदेश शिवभक्तगणानधीशः ॥ ७३ ॥ तत्तन्निवेशनविधानचमत्क्रियायां भक्ताग्रगण्यबसवस्य निवेदितायां ॥ देवेन ते शिवगणाश्चलदुत्तमांगा नासाग्रदत्तनिभृतांगुलयो बभूवुः ॥ ७४ ॥ शक्त्याऽन्वितानि परिहृत्य स कुण्डलिन्याश्चण्डांशुपावकसुधाकरमण्डलानि ॥ आसेदिवानकुलचक्रघने सुषुम्नाद्वाराग्रजाग्रदतुलांबरपीठशृंगे ॥ ७५ ॥ तत्रागमा-**

---

(वागवितो) त्या अल्लमास शून्य सिंहासनावर चढण्यास काय अवघड पडणार होतें? तरीपण सर्व लोकांत बसवेश्वराची कीर्ति पसरण्याकरितां, ॥ ७१ ॥ षट्स्थलांस (भक्त माहेश्वर वगैरेंस) हें शून्य सिंहासन आधारभूत आहे असें सांगून अल्लमानें त्याचें कीलक (खूण, रीति) सर्व प्रमथनायकांस सांगून त्या मूल सिंहासनाचा आश्रय करून तो वर चढला. ॥ ७२ ॥ तेथील गौप्य शिकवून तदनंतर क्रमाक्रमानें अल्लमप्रभु एकेक भूमीवर चढून तेथील तें तें गौप्य (रहस्य) सर्वांच्या अनुभवास आणून त्या शोभायमान सिंहासनाच्या अग्रभागावर चढला. ॥ ७३ ॥ सहा भूतें, सहा कमलें, सहा स्थलें, सहा अंगें, सहा प्रकारची भक्ति, सहा प्रकारचें तपश्चरण, सहा प्रकारची अक्षरांची पंक्ति, सहा शक्ति, सहा कांति, सहा आकाश, सहा प्रयोग ह्या सर्वांची योग्य रीतीनें अल्लमानें शिवभक्तांच्या समुदायास माहिती करून दिली. ॥ ७४ ॥ अल्लमप्रभूनें सर्व भक्तमंडळींत श्रेष्ठ अशा बसवेश्वरास त्या त्या बसण्याच्या रीतींचे प्रकार सांगितले असतां सर्व प्रमथगण माना डोलवूं लागले, व आपल्या नाकाच्या शेंड्यावर हाताचीं बोटें ठेवून आश्चर्यानें थक्क झाले. ॥ ७५ ॥ कुंडलिनीचीं शक्तिसहित असणारीं सूर्य, अग्नि, चंद्र नांवाचीं मंडलें टाकून तो अल्लमप्रभु ज्यांची तुलना करितां येत नाहीं अशीं अनेक चक्रें असलेल्या सुषुम्ना द्वारावरील मूर्तिमन्त गगनसिंहासनाच्या शिखरावर चढला. ॥ ७६ ॥ तेथें आगमांत पर्यंकाचे खूर होते,

**न्तचरणे प्रणवोपधाने वाक्यैश्चतुर्भिरपि निर्मितपट्टबन्धे ॥ सद्ब्रह्मपंचकसकंचुकहंसतूले पंचार्णमंचफलके प्रभुराविवेश ॥ ७६ ॥ श्रीमत्प्रभोः समुपवेशनतस्तदैव सर्वाः क्रमेण निहिता बसवेन पूर्वं ॥ तास्ताः सचेतनतयाऽखिलशक्तयोऽत्र स्वांगैश्चलद्भिरभजञ्जगदीशमेनं ॥ ७७ ॥ अत्यद्भुतं तदवलोक्य भयेन केचिद्दूरं गताः कतिचनात्मविदो विधिज्ञाः ॥ साक्षाच्छिवोऽल्लम इति प्रणता बभूवुः स्वात्मन्यवाप बसवः परमं प्रमोदं ॥ ७८ ॥ भूयः प्रणम्य बसवो निगमान्तवाक्यैस्तुष्टाव भक्तिभरितो गुरुसार्वभौमं ॥ स च्छन्नवीरबसवः परमावधानी स्वात्मार्पणं समतनोत्प्रभवे प्रभूणां ॥ ७९ ॥ अत्रान्तरे हठपदार्पणमाचयार्यौ भूमौ प्रणेमतुरमुं प्रतिपारवश्यात् ॥ अन्ये च किन्नरमुखा भयभक्तिनम्रा दण्डप्रणामशतकैश्शरणं प्रपन्नाः ॥ ८० ॥**

---

ॐकाररूप उशी होती, चारी वेदांनींही तेथें पट्टबंध केले होते, उत्तम पांच प्रकारचें ब्रह्म हीच त्या पलंगावरील चादर होती, अशा त्या पंचाक्षररूप पलंगावर अल्लमप्रभु चढला. ॥ ७७ ॥ अल्लमप्रभु त्या शून्य सिंहासनावर चढत असतांनाच बसवेश्वरानें अगोदर क्रमानें तेथें (शून्य सिंहासनांत) स्थापन केलेल्या सर्व शक्ति सजीवपणानें आपापल्या हालणाऱ्या अंगांनीं अल्लमप्रभूस जाऊन मिळाल्या. (बसवेश्वरानें सिंहासन तयार करितांना ज्या ज्या ठिकाणीं ज्या ज्या शक्ति स्थापिल्या होत्या, त्या त्या अल्लमप्रभूच्या रूपांत जाऊन मिळाल्या). ॥ ७८ ॥ तो विचित्र प्रकार पाहून कितीएक तर भयानें लांब पळून गेले, कितीएक आत्मज्ञानी लोक त्या रीतीविषयीं माहितगार होते, त्यांनीं हा अल्लमप्रभु प्रत्यक्ष शंकर आहे ह्मणून नमस्कार केला; बसवेश्वराला तर अल्लप्रभु शून्य सिंहासनावर बसलेला पाहून अतिशय आनंद झाला. ॥ ७९ ॥ नंतर बसवेश्वरानें पुन्हा नमस्कार करून निगमांतील वाक्यांनीं अल्लमाची स्तुति केली, व हा सर्व गुरूंचा चक्रवर्ती राजा आहे असें समजून त्याचें मन भक्तीनें सद्गदित झालें. तो छन्न बसवेश्वर तर मोठा परमावधानी होता, त्यानें आपलें शरीर, मन आणि आत्मा हीं सर्व गुरूंच्या गुरूला (अल्लमास) तत्काळ अर्पण केलीं. ॥ ८० ॥ इतक्यांत हठपदार्पण आणि माचयार्य ह्या दोघांनींही भक्तीमुळें तल्लीन होऊन जमिनीवर अल्लमास साष्टांगनमस्कार घातला. दुसरे किन्नर वगैरे प्रमथगण होते त्यांस अल्लमाच्या महिमातिशयामुळें भय वाटून व भक्ति उत्पन्न होऊन

**येऽन्ये प्रभोर्विरचितं बसवेन पीठं द्रष्टुं पुरीमधिगताः शिवभक्तसंघाः ॥ कल्याणपट्टणनिवासिगणाश्च सर्वे तत्रागतास्सपदि जंगमलिंगवर्याः ॥ ८१ ॥ संचार्य भूमिमखिलां समुपागता ये ते दण्डनाथबसवेन कृतोपचाराः ॥ नित्यं वसन्ति रमणीयमठेषु वृद्धाः श्रद्धान्विताः प्रभुमुपाययुरुत्सवेन ॥ ८२ ॥ सर्वे च ते कृतनमस्कृतयः पुरोऽस्य स्थित्वा प्रभोः स्तुतिशतान्यभितो वितेनुः ॥ हर्षेण केचिदथ गीतपदैरगायन् नाट्यं प्रचक्रुरपरे कृतहस्तताळाः ॥ ८३ ॥ विद्याः श्रुतिस्मृतिपुराणमुखास्समस्ता .यस्यादिमध्यचरमान्न विदन्त्यतीतः ॥ यो नादबिंदुकलिकास्तमधीशमेनमारोहयद्गगनपीठमसौ महात्मा ॥ ८४ ॥ को वेत्ति दिव्यमहिमानममुष्य लोके सर्वोत्तमस्य बसवस्य जगद्धितस्य ॥ इत्यन्तरंगपरिपूर्णपरप्रमोदास्सर्वे प्रतुष्टुवुरुघे जयशब्दपूर्वं ॥ ८५ ॥ स्वामी तदाऽल्लमगुरुर्बसवाधिनाथं संवीक्ष्य निश्चलदृशो भयसामरस्यात् ॥**

---

त्यांनींही प्रभूला दंडासारखे शेंकडो वेळ नमस्कार केले. ॥ ८१ ॥ दुसरे कितीएक लोक अल्लमप्रभूकरितां बसवेश्वरानें तयार केलेलें सिंहासन पाहण्यास कल्याणनगरास आले होते. कितीएक लोक शिवभक्त होते. कल्याणनगरांत राहणारे प्रमथगण आले होते. जंगमलोक होते तेही सर्व तेथें त्या वेळीं आले होते. ॥८२॥ सर्व पृथ्वीवर फिरत फिरत जे लोक आले होते त्या सर्वांचा, अधिकार चालविणाऱ्या बसवेश्वरानें योग्य आदरसत्कार करून त्यांस ठेवून घेतलें. ते नेहमीं चांगल्या मठांत राहिले होते व त्यांतील सर्व ज्ञातारे ज्ञातारे लोक भक्तिपूर्वक अल्लमप्रभूचें दर्शन घेण्यास मोठ्या उत्कंठेनें आले होते. ॥ ८३ ॥ त्या सर्वांनीं अल्लमप्रभूपुढें येऊन भक्तीनें नमस्कार केले. व मनापासून त्यांनीं अनेक प्रकारांनीं स्तुति केली, कितीएक हर्षानें गाऊं लागले, दुसरे कितीएक लोक आनंदानें टाळ्या वाजवून नाचूं लागले. ॥ ८४ ॥ श्रुति स्मृति पुराण वगैरे सर्व विद्या ह्या अल्लमप्रभूचा जन्म, तारुण्य, मरण ह्या अवस्था जाणण्यास समर्थ नाहींत, जो प्रभु नादबिंदु कला यांच्या पलीकडला आहे, त्या अल्लमप्रभूला ह्या बसवेश्वरानें शून्यसिंहासनावर बसविलें; हा बसवेश्वर मोठा सज्जन मनुष्य आहे. ॥ ८५ ॥ हा बसवेश्वर सर्व जगाचें कल्याण करणारा आहे, सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे, ह्याचें माहात्म्य त्रैलोक्यांत कोणासही समजणार नाहीं. ह्याप्रमाणें मनापासून आनंदानें सर्व प्रमथगण "उघे उघे" असा जयजयकारशब्द करून बसवेश्वराची प्रशंसा करूं लागले. ॥ ८६ ॥ दोहोंकडील ( अंतरबाह्य ) सामरस्यामुळें व

अन्तस्तरंगितसुखानुभवानुरागादाह स्म भक्तनिवहेषु मिषत्सु सत्सु ॥ ८६ ॥ लिंगार्चनप्रतिभया विमलान्तरंगध्यानावधानपरिशीलननिष्ठया च ॥ सज्जंगमार्चनविधानसदैकरीत्या लोकोत्तरो बसव एव घनो न चान्यः ॥ ८७ ॥ आहो जयिन् बसव भक्तितनो महात्मन्नाहो फलिन् बसव भक्तमनःप्रसन्न ॥ आहो महिन् बसव सद्गुणरत्नधामनाहो वशिन् बसव भाग्यवतां वरेण्य ॥ ८८ ॥ इत्यल्लमे स्तुवति सद्गुरुसार्वभौमे भक्त्या ह्रिया च बसवः प्रणतोत्तमांगः ॥ साष्टांगदण्डनतिभिः स्तुतिभिः प्रभुं तं स्तुत्यं विचित्रपदवाक्फणितिर्नुनाव ॥ ८९ ॥ भक्तेषु चित्रलिखितेष्विव विस्मितेषु तत्पारवश्यकलया बसवे स्थितेऽस्मिन् ॥ स्थानान्यतीत्य सकलानि गुरुर्गुरूणां संविन्मयो गगनपीठगतो बभूव ॥ ९० ॥ इति सकलमुनीन्द्राः शून्य-

---

मनांतील आत्मानुभवाच्या सुखामुळें सर्व भक्तलोकांचा समुदाय डोलूं लागला असतां, अल्लमप्रभु शांतदृष्टीनें बसवेश्वराकडे पाहून बोलूं लागला. ॥ ८७ ॥ लिंगार्चनाच्या बुद्धीमुळें, निर्दोष अशा अंतरंगध्यानाच्या सावधपणामुळें, अभ्यासामुळें, विश्वासामुळें व उत्तम उत्तम अशा जंगमलोकांच्या पूजा करण्याच्या रीतीमुळें हा एक बसवेश्वरच त्रैलोक्यांत धन्य आहे. ह्याची बरोबरी दुसरा कोणी करूं शकणार नाहीं. ॥ ८८ ॥ फार काय सांगावें ? बसवेश्वरा, तूं जयशाली असून भक्तिरसाची मूर्ति आहेस, तूं मोठ्या मनाचा आहेस, तुझ्या जन्माचें सार्थक झालें; बसवेश्वरा, तूं भक्तलोकांच्या मनास सुख देणारा आहेस, तुझा महिमा मोठा असून तूं सद्गुणरूप रत्नांचा निधि आहेस, तूं इंद्रियनिग्रहवान् आहेस, बसवेश्वरा, तूं सर्व भाग्यवान् लोकांत श्रेष्ठ आहेस. ॥ ८९ ॥ अशा रीतीनें सर्व गुरूंचा चक्रवर्ती तो अल्लमप्रभु बसवेश्वराची प्रशंसा करूं लागला असतां, बसवेश्वरानें भक्तीमुळें व लाजेमुळें आपली मान खालीं घातली. त्यानें अनेकवेळ साष्टांग नमस्कार घातले, तो दंडासारखे जमीनीवर कितीएक वेळ लोळला व स्तुति करण्यास योग्य अशा अल्लमप्रभूची त्यानें विचित्ररीतीच्या शब्दचातुर्यानें स्तुति केली. ॥ ९० ॥ सर्व भक्तमंडळी चित्रासारखी स्तब्ध बसली असतां व बसवेश्वर भक्तीमुळें तल्लीन होऊन गेला असतांना, सर्व स्थानें ओलांडून तो चित्स्वरूपी सर्व गुरूंचा गुरु अल्लमप्रभु गगनसिंहासनावर ( शून्यसिंहासनावर ) जाऊन बसला. ॥ ९१ ॥ मुनीश्वरांनो, अशा रीतीनें घडलेलें शून्यसिंहासनासंबंधाचें अल्लम-

सिंहासनोद्यच्चरितमखिलमेतच्छ्रावितं शास्त्रसारं ॥ पठति परमभक्त्या नित्यमेकान्तनिष्ठः श्रवणपथगतं वा भावयेद्यः स धन्यः ॥ ९१ ॥

इत्यार्षश्रीभविष्यत्पुराणकथाविशालायां प्रमथगणवचनानुकूलायां कलिकल्मषनिमग्नजनसमुद्धरणशीलायां प्रभुलिंगलीलायां प्रभुसमागमनतदीयशून्यसिंहासनाधिरोहणवर्णनगतिर्नाम द्वाविंशोऽध्यायः ॥

---

प्रभूचें सर्व चरित्र मीं तुह्मांस सांगितलें. हें चरित्र जो भक्तिपूर्वक नेहमीं एकाग्रनिष्ठेनें ऐकेल किंवा याचा मनांत योग्यरीतीनें विचार करील, तो धन्य होईल.

ह्याप्रमाणें ऋषीश्वरांनीं भविष्यत्पुराणांत कथेच्या रूपानें सविस्तर रीतीनें वर्णन केलेल्या, प्रमथगणांच्या वचनास अनुकूल असणाऱ्या, कलियुगांतील पातकांत बुडणाऱ्या लोकांस उद्धार करण्याच्या उपयोगीं पडणाऱ्या प्रभुलिंगलीलेंतील अल्लमप्रभूचें येणें व त्याचें शून्यसिंहासनावर चढणें वगैरे वर्णन असलेला हा बाविसावा अध्याय संपला.



श्रीनंदिकेश्वराय नमः ॥

# त्रयोविंशोऽध्यायः ॥

**सूत उवाच ॥ श्रीसिद्धिवीरगुरुमण्डलचक्रवर्तिपादाम्बुजातभजनाभिरता मुनीन्द्राः ॥ नित्यव्रताचरणनिर्मलशीलवन्तः शृण्वन्तु भक्तिभरिताः प्रभुलिंगलीलाम् ॥ १ ॥ गगनपीठशिखाग्रचिदम्बरस्थगितयंत्रलसद्दहरान्तरे ॥ अधिवसन्तमनंतगुणाश्रयं प्रभुमगाद्बसवो भयभक्तिमान् ॥ २ ॥ सविधमेत्य तमर्चितुमुद्यतो विविधसाधनसंभृतितत्परैः ॥ निजगणैर्भजमानहृदंबुजैः प्रभुमपूजयतागममार्गतः ॥ ३ ॥ अपचितिं बसवे प्रभुमूर्तये सपदि कुर्वति तद्भगिनीसुतः ॥ बसवतुल्यगुणः शिवयोगिराडतनुताखिलसाधनसंभृतिं ॥ ४ ॥ हठपदार्पणकिन्नरमाचयास्सुजनमौलिगमारघनादयः ॥ अपि च भाचरसाधुमुखा गणा विनयभक्तियुताः परिवव्रिरे ॥ ५ ॥ क्षितितलस्थितभक्तगणेऽखि-**

---

( अध्याय २३ ) अर्थ—सूत ह्मणतात ॥ १ ॥ मुनीश्वरांनो, श्रीसिद्धवीरगुरु श्रेष्ठाच्या चरणकमलाच्या भक्तीची तुह्मांस मोठी आवड आहे, तुह्मी नेहमीं नियमानें वागतां, तुमचें आचरण चांगलें असून तुह्मी स्वभावानें चांगले आहां, भक्तिवान् आहां, मीं तुह्मांस प्रभुलिंगाचें चरित्र सांगतों तें तुह्मी ऐका. ॥ २ ॥ शून्यसिंहासनाच्या शिखरावर बसविलेल्या चित्स्वरूपयंत्राच्या सुशोभित मध्यभागीं बसलेल्या, अनंत सद्गुणांचा आश्रय अशा अल्लमप्रभूजवळ बसवेश्वर भीतभीत भक्तिपूर्वक आला. ॥ ३ ॥ बसवेश्वर अल्लमप्रभूजवळ येऊन नानाप्रकारच्या साहित्यांची सिद्धता करण्यांत प्रवीण असणाऱ्या, ज्यांच्या हृदयकमलांत अल्लमप्रभूविषयीं भक्ति आहे अशा आपल्या प्रमथगणांसह्वर्तमान आगमाचे रीतीनें अल्लमप्रभूची यथाविधीनें पूजा करूं लागला. ॥ ४ ॥ बसवेश्वर अल्लमप्रभूची पूजा करूं लागतांच लागलेच त्याच्या बहिणीचा ( नागांबेचा) मुलगा, बसवेश्वरासारखाच सद्गुणी व शिवयोगी लोकांत श्रेष्ठ असा तो छन्नबसवेश्वर सर्व तऱ्हेच्या पूजाद्रव्यांची तयारी करूं लागला. ॥ ५ ॥ तसेंच हठपदार्पण, किन्नरार्य आणि माचयार्य व सुजन लोकांत श्रेष्ठ असा मौलिगमार (मोळिगिमारय्या) व भाचर (बाचरस ) वगैरे नम्र स्वभावाचे व अल्लमाची भक्ति करणारे सर्व प्रमथगण तेथें लागलेच जमा झाले. ॥ ६ ॥ पृथ्वीवरील सर्व प्रमथगण अल्लमाच्या पूजेचा समा-

**ले दधति विस्मयमर्चनगौरवात् ॥ विभवनिर्जितवासववैभवः स बसवः प्रभुमूर्तिमपूजयत् ॥ ६ ॥ अथ तदीयमहार्चनवैभवं पुरि विलोकितुमुत्सुकतां गताः ॥ अनुययुर्बसवाधिपमंदिरं शिवगणाः प्रगुणा गणनातिगाः ॥७॥ य इह वेश्मनि तस्य दिने दिने घनरसायनभोजनतत्पराः॥ बहुलजंगमलिंगगणाश्च ते समधिगम्य गुरून्समलोकयन् ॥ ८ ॥ भसितभूषितसल्ललितांगसंगतहराक्षसरा मननव्रताः ॥ कपिलवर्णजटाभरबंधुरा धृतसितातपवारणपाणयः ॥ ९ ॥ विमलशीलयुताश्च विलंबितश्रुतिपुटाः पटुदीप्तितनूभृतः ॥ करकमण्डलुजाप्यमणिस्रजश्चरगणा धृतकंबलकंधराः ॥ १० ॥ निरुपमानहरप्रतिविग्रहास्समुपगत्य चिदंबरविष्टरे ॥ स्थितगुरोश्चरणासनसन्निधौ विनयतोऽन्यवसन्बसवाग्रतः ॥ ११ ॥ बसवदण्डपतौ प्रभुगोष्ठिभिश्चरगणार्चनभोजनसत्क्रियाः ॥ सपदि विस्मरति क्षुधिताश्च ते विकलिताः स्वयमात्मसु मेनिरे ॥ १२ ॥**

---

रंभ पाहून आश्चर्यचकित झाले असतांना ऐश्वर्यानें इंद्रासही लाजविणारा बसवेश्वर अल्लमप्रभूची पूजा करूं लागला. ॥ ७ ॥ तेव्हां अल्लम प्रभूच्या महापूजेचा समारंभ पाहण्यास उत्सुक असलेले नगरांतील अनेक गुणवान् असे शिवगण बसवेश्वराचे वाड्यांत गोळा झाले. ॥ ८ ॥ जे कितीएक लोक बसवेश्वराचे घरीं मिष्टान्नभोजन करण्याकरितां जमलेले होते व जे अनेक लिंग धारण केलेले जंगम होते ते सर्व अल्लम गुरूस पाहण्याकरितां आले. ॥ ९ ॥ त्यांनीं अंगास विभूति लाविल्यामुळें त्यांचीं अंगें सुशोभित दिसत असून त्यांनीं गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा घातलेल्या होत्या; ते नेहमीं आत्मध्यान करण्यांत तत्पर असत, त्यांच्या डोक्यावर पिंगटरंगाच्या जटांचा भार असल्यामुळें ते मनोहर दिसत होते. व त्यांनीं आपापल्या हातांत पांढऱ्या शुभ्र छत्र्या घेतलेल्या होत्या. ॥ १० ॥ त्यांचे स्वभाव चांगले होते, त्यांचे कान रुद्राक्षांमुळें लोंबत होते, त्यांचें शरीर तेजःपुंज होतें, त्यांचे हातांत कमंडलु आणि जपाच्या माळा असून त्यांनीं खांद्यावर भगव्या कांबळ्या घेतलेल्या होत्या. ॥ ११ ॥ ज्याला उपमा नाहीं असें अतिशय उत्तम शंकरासारखें त्यांचें रूप होतें, असे अनेक जंगम लोक तेथें आले व चिदंबरसिंहासनावर बसलेल्या अल्लमप्रभूच्या पायांजवळ नम्रतेनें बसवेश्वराचे पुढें येऊन बसले. ॥ १२ ॥ बसवेश्वर अल्लमप्रभूचे गुणानुवाद वर्णन करण्यांत गुंतल्यामुळें जंगमलोकांची पूजा करणें, त्यांस जेऊं घालणें, त्यांचा सत्कार करणें वगैरे सर्व विसरला; तेव्हां त्या जंगमांस अतिशय भूक लागून सर्वजण अगदीं थकून गेले

**अहह धीरमतिर्बसवः कथं गतविवेकतयाऽस्मदुपेक्षणं ॥ वितनुते बत भक्तिरियत्यभूत्स्थितमतिक्षतिवत् पठनोद्यमे ॥ १३ ॥ उदितचित्तविकारवदैंद्रजालिकममुं विकटासनसंस्थितं ॥ भ्रमवशादवलोक्य वशं गतो वसतु तेन सहायमिदं कियत् ॥ १४ ॥ इति विशंक्य मनःसु चरव्रजे झडिति तत्रगते बसवेश्वरः ॥ हृदि विचार्य चिरं स्फुरदुल्मुकन्यसनवानिव तापमुपाययौ ॥ १५ ॥ क्व नु गता मतिरद्य ममापि वाक्च्युतिरभूदबुधोऽस्म्युदरे मदात् ॥ विघसकामनयाऽऽगतजंगमाः प्रतिगताः कथमेष समाह्वये ॥ १६ ॥ अहह किं नु निधाय मुखं पुनः प्रतिसमाह्वयितुं प्रयतेय तान् ॥ मम महानपराध इयान् कियानिति कथं कथितुं बत शक्यते ॥ १७ ॥ इयदनेहसि मद्रचितं वृथाजनि चरामरपूजनमन्ततः ॥ व्रतशतं सुकृतं ननु भज्यते क्वचिदपि व्यभिचारवशाद्यथा ॥ १८ ॥ भ्रम-**

---

व आपल्या मनांत ह्मणूं लागले. ॥ १३ ॥ अरेरे! काय करावें? हा बसवेश्वर मोठा बुद्धिवान् आहे असें असतां मूर्खाप्रमाणें आमच्याकडे दुर्लक्ष्य कां करितो? काय दुःखाची गोष्ट आहे? बसवेश्वराची भक्ति अशीच व्यर्थ झाली. आमचा मात्र पठन करण्याचा खोळंबा झाला. ॥ १४ ॥ ह्या बसवेश्वराच्या मनाला वेड लागलें आहे, ह्या भयंकर सिंहासनावर बसलेल्या गारुड्यास पाहून हा त्याला भुलून जाऊन त्यास वश झाला आहे; होऊं द्या, त्याच्यापासून ह्याचा काय उपयोग होईल तो आपोआप दिसेल. ॥ १५ ॥ असे मनांत कुतर्क आणून सर्व जंगमलोकांचा समुदाय तेथून तत्काळ निघून गेल्यावर बसवेश्वरास तो प्रकार समजून आला; त्या वेळीं त्याला पेटलेलें कोलीत अंगावर ठेवावें अशा रीतीचें दुःख झालें. ॥ १६ ॥ तो आपल्या मनांत ह्मणूं लागला, माझी अक्कल कोणीकडे गेली? माझी वाचा कशी बसली? मी गर्वानें इतका उन्मत्त कसा झालों? मला शेषान्न मिळावें ह्मणून मुद्दाम मजकरितां आलेले जंगमलोक परत गेले, आतां मी त्यांस परत तरी कसें बोलाऊं? ॥ १७ ॥ अरेरे! काय करूं? ते लोक येथें आले होते तेव्हां माझें तोंड कोठें गेलें होतें? आणि आतां त्या इंद्रियनिग्रही लोकांस परत आणण्यासाठीं यत्न करीत आहें, माझा हा केवढा अपराध आहे पहा! तो सांगतां देखील येत नाहीं. ॥ १८ ॥ मीं इतकें निष्पाप वर्तन ठेवलें तें व्यर्थ गेलें. जंगमदेवाचें पूजन नाश पावलें. शेंकडों व्रतें करून संपादन केलेलें पुण्य एखाद्या अशा थोड्या चुकीमुळें व्यर्थ जातें. ॥ १९ ॥ माझें मन अगदीं वेडें झालें,

णमुल्बणमाप मदंतरं किमिति जीवनमेतदपार्थकं ॥ इति विचिंत्य गुरोः पुरतश्चिरं सभयगद्गदमाह सभांगणे ॥ १९ ॥ महित षण्णवतीष्टसहस्रभूर्यधिकलक्षगणार्हमिदं कृतं ॥ सकलरस्यपदार्थकदंबकं पुरभिदेऽर्पयितुं क गणान् ह्वये ॥ २० ॥ इति वचो बसवस्य मिताक्षरं स्मितमुखः प्रभुरेव निशम्य तं ॥ प्रतिजगाद शिशो हृदि चिन्तया किमुदितं तव साधु समर्थये ॥ २१ ॥ अहमपूर्णसहस्रचतुष्टयद्विगुणलक्षगणाधिकतृप्तये ॥ अलमहो क्षुधितोऽस्मि नियच्छ मे कवलमश्मि ततो विजयी भवान् ॥ २२ ॥ इति निपीय गुरोर्वचनामृतं स बसवो भयसंभ्रमसंभृतः ॥ वनितया बलदेवतनूजया सह यथोचितमर्चितवान् प्रभुं ॥ २३ ॥ स्वरमणीरमणीयकरद्वयीघटितहेमघटात्तहिमांबुभिः ॥ प्रभुगुरोः पदयोरभिषेचनं प्रविदधे बसवो वसुवासवः ॥ २४ ॥ विमलमर्घ्यजलं करपद्मयोः प्रतिनिधाय तथाऽऽचमनं मुखे॥ सुरभिचंदनस-

---

माझ्या जीवंत राहण्यांत कांहीं अर्थ राहिला नाहीं. असें मनांत आणून तो बसवेश्वर सभेमध्यें अल्लमप्रभूपुढें गळा दाटून येऊन भीतभीत बोलूं लागला. ॥ २० ॥ हे पूज्या गुरुवर्या, मी एक लक्ष शहाण्णव हजार जंगमलोकांस पुरेल इतके खाण्याचे अनेक तऱ्हेचे पदार्थ शंकरास अर्पण करण्याकरितां तयार केले आहेत; परंतु आतां जंगम लोकांस कोठून बोलावूं? ॥ २१ ॥ ह्याप्रमाणें बसवेश्वरानें थोडक्यांत केलेलें भाषण ऐकून अल्लमप्रभु हंसून ह्मणाला, मुला, मनांत व्यर्थ काळजी करूं नकोस, तुला तितके जंगमलोक मी एकटा पुरवीन. ॥ २२॥ एक लक्ष शहाण्णव हजार जंगमलोकांस पुरे पडणार नाहींत इतके, किंबहुना त्यापेक्षां देखील ज्यास्त भक्षणाचे पदार्थ मला एकट्याला पाहिजेत. असो, ज्यास्त बोलण्यांत अर्थ नाहीं, मी भुकेला आहें, मला घांस दे, मी खातों, नंतर तूं विजयी हो. ॥२३॥ असें अल्लमप्रभूचें अमृतासारखें गोड बोलणें ऐकून बसवेश्वराला भयही वाटलें आणि आश्चर्यही वाटलें. नंतर बसवेश्वरानें आपली बायको बलदेवाची मुलगी तिला बरोबर घेऊन अल्लमप्रभूची पूजा करण्यास सुरवात केली. ॥ २४ ॥ संपत्तीमुळें इंद्राप्रमाणें शोभणाऱ्या बसवेश्वरानें आपल्या स्त्रियेच्या नाजूक हातांतील सोन्याच्या घागरींत भरलेल्या थंड पाण्यानें अल्लमप्रभूच्या चरणकमलावर अभिषेक केला. ॥ २५ ॥ बसवेश्वरानें अल्लमाच्या दोन्ही हस्तकमलांवर स्वच्छ अर्घ्योदक दिलें व तोंडांत आचमनाचें उदक दिलें. व सुवासिक चंदन,

त्कुसुमाक्षतैः श्रुतिपदैः सममर्चितवान् प्रभुं ॥ २५ ॥ घुमघुमायित-धूपमथार्पयन् कपिलधेनुघृताक्तसुवर्तिभिः ॥ धगधगायितकांचनपात्रकैरभिदधे धुरि दीपसहस्रकं ॥ २६ ॥ तदनु दीव्यदमूल्यमणिस्फुरच्चरणवर्तुलकांचनविष्टरे ॥ उपदधे पुटपाकसमुल्लसत्कनकनिर्मितभोजनभाजनं ॥ २७ ॥ कनकरत्नविनूत्नधगद्धगच्चषकपंक्तिमुपास्य समन्ततः ॥ वनितया परिवेषमकारयत्प्रभुगुरोर्बसवो लसदाननः ॥ २८ ॥ तनुतरोज्ज्वलशालिसुतण्डुलान्परिविमृश्य दृगुत्सवकारिणः ॥ अमिलितप्रतिशिक्थमनुष्णिकं परिणतं मृदुलान्नमसौ न्यधात् ॥ २९ ॥ अनतिशीतलषड्रसपूरितं ललितशाकचयं प्रियया समं ॥ स परिवेषयति स्म सपायसं सकलभक्ष्यगणैः सह चोष्यकैः ॥ ३० ॥ तदनु हस्तजलं स्वयमाज्ञया ददति तद्बसवे प्रभुवल्लभः ॥ गुरुतरान् कवलानगिलत्क्षणात्स परिगृह्य न किंचिदशेषयत् ॥ ३१ ॥ स च विलोक्य तदा ब-

---

उत्तम उत्तम फुलें अक्षता ह्यांनीं मंत्र ह्मणत पूजा केली. ॥ २६ ॥ नंतर घमघमीत सुवास येणारा धूप अल्लमप्रभूस अर्पण केला, काळ्या गाईच्या चांगल्या तुपांत भिजविलेल्या वाती पेटवून लखलखीत सोन्याचे ताम्हणांत अल्लमप्रभूपुढें अनेक दीप पेटविले. ॥२७॥ नंतर लखलखीत मौल्यवान् रत्नांच्या चार पायांच्या अडणीवर सोन्याचें सुशोभित वाटोळें पात्र (ताट) मांडलें. ॥ २८ ॥ सोन्याचीं व रत्नांचीं नवीन नवीन लखलखीत पानपात्रें (वाट्या) भोंवतालीं मांडून प्रसन्नमुखानें बसवेश्वरानें आपल्या बायकोकडून अल्लमप्रभूच्या पात्राभोंवतालीं परिषिंचन करविलें. ॥ २९ ॥ फार बारीक आंबेमोहोराचे तांदूळ कांडून पाखडून इतके स्वच्छ केले होते कीं ते पाहतांच पाहणाऱ्याचे डोळ्यांस सुख होईल; अशा तांदुळांचा शितास शीत न चिकटेल असा मोकळा, फार कढत नाहीं व पुरतेपणानें शिजलेला (कच्चा नव्हे) असा मऊमऊ भात आणून बसवेश्वरानें अल्लमप्रभूस अर्पण केला. ॥ ३० ॥ गार झालेल्या नव्हेत (उन्ह उन्ह ताज्या) व सहा रसांची गोडी असणाऱ्या अनेक प्रकारच्या शाकभाज्या, चटण्या, कोशिंबिरी वगैरे बायकोकडून आणून वाढविल्या; खीर आणून वाढविली, त्याबरोबर तोंडीं लावावयाचे पदार्थ व चोखावयाचे पदार्थ आणून बसवेश्वरानें अल्लमप्रभूस वाढविले. ॥ ३१ ॥ नंतर अल्लमप्रभूच्या आज्ञेप्रमाणें बसवेश्वर हात धुण्यास पाणी देऊं लागला असतां अल्लमप्रभु मोठमोठे घांस घेऊन भराभर गिळूं लागला, त्यानें कांहींएक शिल्लक ठेविलें नाहीं. ॥ ३२ ॥ तें पाहतांच बसवेश्वरानें आनंदानें

**सर्वो मुदा परिकरैः सह संभृतमोदनं ॥ दयितया परिगृह्य रयादयं परिविवेष पुनः पुनरश्नतः ॥ ३२ ॥ अथ विबुध्य हृदा बसवेश्वरः पृथुलकांचनपात्रचतुष्टयं ॥ धुरि निधाप्य बहूनि महौदनान्यविकलं प्रणिनाय स तान्यलं ॥ ३३ ॥ स चतुरः करलाघववज्जनान्प्रतिनियम्य ततः परिवेषणे ॥ सपदि मध्यगतः स्वयमाहृतान्युपनिनीय मुहुस्तमभोजयत् ॥ ३४ ॥ समधिकं त्वरया परिभुंजति प्रभुगुरावथ दण्डपतिः स्वयं ॥ विपुलधौतपटोपरि संदधे बहुलसत्कदलीदलविस्तृतिं ॥ ३५ ॥ कति च नात्र महौदनसंहतेः प्रतिसमाहरणे परिवेषणे ॥ कति च नोज्ज्वलशाकसमुच्चये कति नियोजयति स्म गणान्स्वकान् ॥ ३६ ॥ कति च नोद्यदपूपनिधापने कति च सूपरसाद्यधिरोपणे ॥ कति च फाणिततेमनमर्जिकारससमानयने विनियुक्तवान् ॥ ३७ ॥ फलरसाज्यपयोमधुदध्युरुस्फुटघटानयने कति चार्पणे ॥ परिनियम्य तदा हृततद्गणं प्रभुमभोजयदात्मनि भक्तिमान् ॥ ३८ ॥ श्रमजलाप्लु-**

---

आपल्या आचाऱ्याकडून शिजविलेला भात बायकोकडून मागवून जलदीनें त्या भराभर खाणाऱ्या अल्लमप्रभूस वाढविला. ॥ ३३ ॥ तोही खाल्ला असें पाहतांच बसवेश्वरानें चार सोन्याचीं मोठमोठीं ताटें भरून उत्तमउत्तम भात आणून वाढला; तोही अल्लमानें भराभर खाऊन टाकिला. ॥ ३४ ॥ तेव्हां बसवेश्वर चलाख लोक वाढण्याचे कामावर नेमून व आपण स्वतः मध्यें उभा राहून वरचेवर भात मागवून आणून अल्लमास वाढवूं लागला. ॥ ३५ ॥ अल्लमप्रभु पहिल्यापेक्षां ज्यास्त वेगानें भराभर जेऊं लागलेला पाहतांच, अधिकार चालविणाऱ्या बसवेश्वरानें अल्लमप्रभूपुढें मोठमोठीं लांब रुंद धुतलेलीं स्वच्छ वस्त्रें आणून पसरलीं, व त्यांवर केळीचीं पानें हांतरून त्यांवर अल्लमप्रभूस अन्न आणून वाढलें. ॥ ३६ ॥ कितीएक लोक भात आणून वाढूं लागले, कितीएक अनेक प्रकारचे भाजीपाले आणून वाढूं लागले. अशी व्यवस्था बसवेश्वरानें केली. ॥ ३७ ॥ कितीएक लोक अनरसे, घारगे, वडे, वगैरे तळलेले पदार्थ आणून वाढूं लागले, कितीएक लोक वरण, आमटी, पातळ भाजी वगैरे पदार्थ आणून वाढूं लागले, कितीएक लोक दूध, दहीं वगैरेपासून तयार केलेले पदार्थ भराभर आणून वाढूं लागले. ॥३८॥ कितीएक लोक अनेक प्रकारचीं फळें, गोड गोड उसांचे रस, सरबतें, तूप, दूध, मध, दहीं ह्यांच्या घागरीच्या घागरी भरून आणूं लागले, व कितीएक अल्लमप्रभूच्या पानांत ओतूं लागले. याप्रमाणें भक्तिवान् बसवेश्वरानें अल्लमप्रभूस भोजन

तद्धावनतत्परैर्गणशतैरुपनीतमयं प्रभुः ॥ सकलभोज्यपदार्थगणं क्षणा-
त् प्रबुभुजे जगदद्भुतवर्तनः ॥ ३९ ॥ अपि च माषवटान् घृतपाचि-
ताननतिरसान्सरसान्यवपिष्टकान् ॥ तिलगुडात्तघुटीवटुकान्वहून्हृदयमो-
दकमोदकमंटपान् ॥ ४० ॥ मृदुलवर्तुलसूपसुपूपकान् जलघटोपरि प-
क्वघुटीगणान् ॥ मधुरसार्कशलाटुसमाह्वयान्सुखिवद्धून् घृतभावित-
पिष्टकान् ॥ ४१ ॥ सुगुणभूरिगणान्सरसक्तुकान्रुचिरचक्रिलपैठर-
फेनिकान् ॥ गरगरध्वनिकान्वरकार्पणान्घृतपयःक्वथनात्तघुटीव्रजान्
॥ ४२ अपि च भक्ष्यगणान्बहुचित्रितान् पृथुलवैणवपात्रशताहृतान् ॥
पृथगुपाहितपर्वतसन्निभान् स बुभुजे क्षणमात्रत ईश्वरः ॥ ४३ ॥
वसुकटाहशतैरथ राजतैर्धगधगायितदीप्तिसमुज्ज्वलैः ॥ बहुभिराहृत-
गोघृतपायसान्युपनिगृह्य करेण पपौ प्रभुः ॥ ४४ ॥ कटुरसाम्लघटा-

---

घातलें. ॥ ३९ ॥ त्रैलोक्यापेक्षां विचित्र रीतीचें वर्तन असणारा अल्लमप्रभु, अं-
गांतून घामाच्या धारा श्रमामुळें वाहत आहेत अशा बसवेश्वराच्या अनेक गणांनीं
आपल्या पानांत आणून वाढलेले अनेक प्रकारच्या पदार्थांचे ढीगचे ढीग भराभर
खाऊन टाकूं लागला. ॥ ४० ॥ तुपांत तळलेले उडदांच्या पिठाचे वडे व फार
गोड लागणारे सरस तांदुळांच्या पिठाचे वडे, तसेच तिळांत गूळ घालून तयार
केलेले लाडू, तसेच मनास सुख देणारे मोदक, ह्यांचे ढीगचे ढीग अल्लमप्रभूनें
खाऊन फस्त केले. ॥ ४१ ॥ फार मऊ व फारच वाटोळे असे चांगल्या रीतीनें
तळलेले अनरसे व घारगे तसेच पाण्याच्या घागरीवर शिजवून तयार केलेले
मांडे तसेच भजीं वगैरे तुपांत तळलेले पदार्थ, निरनिराळ्या धान्यांचें एकीकरण
करून ( भाजणीचे ) तूपांत तळलेले वडे, वगैरे आणून वाढले. ॥ ४२ ॥ उत्तम
तऱ्हेचे गुणकारी सातूंच्या पिठाचे केलेले वडे, तशाच ताटावर घालून चांगल्या
रीतीनें केलेल्या फेण्या, कुरकुर वाजणाऱ्या पापड्या, सांडगे, कुरवड्या, तुपांत त-
ळलेले पापड, तसेच तुपांत व दुधांत कढविलेले घुटींचे समुदाय आणून वाढले.
॥ ४३ ॥ आणखीही नानाप्रकारचे खाण्याचे पदार्थ वेळूच्या दुरड्या व शेंकडों
झांकण्यांत भरून आणून त्यांचे वेगवेगळे पर्वताएवढाले ढीग केले, परंतु तितके
सर्व ढीग अल्लमप्रभूनें एका क्षणांत खाऊन फस्त केले. ॥ ४४ ॥ लखलखीत
दिसणाऱ्या शेंकडों सोन्याच्या व रुप्याच्या कढयांत भरून आणलेलें उत्तम साजूक
तूप आणि खीर अल्लमानें आपल्या हातानें मागून घेऊन पिऊन टाकली. ॥४५॥

**न्मधुदुग्धदध्यमितस्तत्कलशांश्च निपीय सः ॥ बहुलचित्रविधान्नरसायनानयमभुंक्त विभुर्निमिषार्धतः ॥ ४५ ॥ लवणशाकशलाटुसुलेह्यसल्ललितचोष्यपदार्थकदंबकं ॥ सकलमाशु विघस्यबुभुक्षया पुनरपि प्रभुरेनमलोकयत् ॥ ४६ ॥ मनसि विस्मयसंभ्रमसंभृतस्स बसवश्चलनं किल नाप्तवान् ॥ अथ जगाद महानसनायकान् सकलवस्तु समानयतेत्ययं ॥ ४७ ॥ हृदयमस्य विबुध्य च पाचका बहुचमत्क्रियया च्छुटिकार्धतः ॥ सकलभोज्यततिं परिपाच्य तत्प्रभुगुरोः परिवेषणमाचरन् ॥ ४८ ॥ गिरिसमानपदार्थचयं पुनः परिसमाप्य पलाशमरिक्तयत् ॥ प्रभुरसौ बसवस्तु समादिशद्विपणिवीथिचयं परिचारकान् ॥ ४९ ॥ अनुगतास्त इमाः कदलीफलान्यतुलचूतफलानि बहूनि च ॥ पनसलांगलिकर्कटिगोस्तनीप्रमुखसत्फलसंततिमानयन् ॥ ५० ॥ अपि च खण्डशितामधुशर्कराद्यखिलभोज्यपदार्थचयं क्रमात् ॥ निज-**

---

तिखट, गोड, आंबट, पातळ पदार्थांच्या घागरी, मध, दूध, दहीं वगैरेंच्या भरलेल्या घागरीच्या घागरी पिऊन टाकून त्यावर अनेक तऱ्हेचीं गोडगोड अन्नें अल्लमानें एका क्षणांत खाऊन टाकिलीं. ॥ ४६ ॥ अनेक प्रकारचीं लोणचीं, अनेक प्रकारचे चाटून खाण्याचे पदार्थ, अनेक प्रकारचे चोखून खाण्याचे पदार्थ सर्व एकदम खाऊन टाकून, भूक लागल्याप्रमाणें पुन्हा अल्लमप्रभु बसवेश्वराच्या तोंडाकडे पाहूं लागला. ॥ ४७ ॥ तें पाहून बसवेश्वराचे मनाला मोठें आश्चर्य वाटलें व तो घाबरला, परंतु काडीमात्र गुरुभक्तीपासून तो डगमगला नाहीं; मग त्यानें सर्व स्वयंपाक्यांस सांगितलें कीं, तुह्मी जितके पदार्थ तयार केले आहेत तितके सर्व घेऊन या. ॥ ४८ ॥ बसवेश्वराचा अभिप्राय दिसतांच त्यांनीं लागलेच शिजलेले पदार्थ तर आणून वाढलेच; आणि जितकी जलदी करवेल तितकी करून मोठमोठे चर पेटवून हातचलाखीनें चुटकी वाजण्याइतक्या वेळांत पुन्हा सर्व पदार्थ शिजवून अल्लमप्रभूस आणून वाढले. ॥४९ ॥ त्या अन्नांचा पुन्हा पर्वताएवढा ढीग झाला, तो पात्रांत येऊन पडतांच तितकाही खाऊन अल्लमानें पुन्हा पान रिकामें केलें; तें पाहतांच बसवेश्वरानें आपल्या चाकरनौकरांस बाजारांतून फळफळावळ आणावयास सांगितलें. ॥ ५० ॥ त्या चाकरमाणसांनीं बाजारांतून पुष्कळ चांगले चांगले केळीचे घड आणले, आंबे आणले, फणस आणले, वाळकें कांकड्या, द्राक्षें वगैरे सर्व तऱ्हेची पुष्कळ फळफळावळ आणिली. ॥ ५१ ॥ तशीच खडीसाखर, पिठीसाखर, वगैरे अनेक प्रकारचे पदार्थ जितके ह्मणून खा-

पुरापणिसंस्थितमाहृतं प्रभुरथाहृतवान्क्षणमात्रतः ॥ ५१ तदनु हस्तविलेहनतत्परं गुरुवरं प्रसमीक्ष्य भयाकुले ॥ बसवमंत्रिवरे गणपुंगवास्त्वरितमात्मगृहान्प्रतिपेदिरे ॥ ५२ ॥ बसवकार्यसमर्थनतत्परास्सपदि भक्तगणाः स्वगृहस्थितान् ॥ सकलभोज्यपदार्थगणान्बहून्गुरुवरान्तिकमाशु विनिन्यिरे ॥ ५३ ॥ कवलमात्रमभूत्प्रभुभोजने सकलभक्तकुलाहृततत्कुलं ॥ सदसि वीक्ष्य जना हृदि विस्मिताः कलकलध्वनिभिः स्वयमूचिरे ॥ ५४ ॥ गगनचुंबिमहोन्नतजिह्विकाप्रसरणेन गुरुः किल विश्वभुक् ॥ हरिविधींद्रमुखैरपि शक्यते किमशनं कृततृप्तिनिवेदितुं ॥ ५५ ॥ बसवनाथ इदं किमकारयद्भ्रमवशादिव ह्यत्र कथं भवेत् ॥ इति वदत्सु जनेषु निशम्य तत्सदसि दण्डपतिः पुनरुद्यतः ॥ ५६ ॥ नरपतेः प्रभुतैव निजा यतस्तदखिलानपि कर्मकरान् व्हयन् ॥ नगरधान्यचयं समुपानयत्सकलमप्यनिवर्तितव-

---

ण्याच्या उपयोगीं पडणारे होते तितके सर्व आपल्या बाजारांतून विकत आणून अल्लमप्रभूपुढें ठेवले. तितके सर्व पदार्थ अल्लमप्रभूनें एका क्षणांत खाऊन फस्त केले. ॥ ५२ ॥ तदनंतर पुन्हा पोट भरलें नसल्याप्रमाणें हात चाटूं लागणाऱ्या अल्लमप्रभूस पाहतांच बसवेश्वरास भय वाटलें, तें पाहतांच इतर प्रमथगणांतील मुख्य मुख्य लोक भराभर आपापले घरीं गेले. ॥ ५३ ॥ व बसवेश्वराची कोणत्या रीतीनें कमतरता न दिसूं देण्याकरितां त्या प्रमथगणांनीं आपल्या घरांत जितके कांहीं खाण्याचे पदार्थ होते, तितके सर्व अल्लमप्रभूपुढें आणून ठेविले. ॥ ५४ ॥ त्या वेळीं सर्व भक्तलोकांनीं आपापल्या घरचे जितके कांहीं पदार्थ अल्लमप्रभूपुढें आणून ठेविले तितके सर्व अल्लमाचे एका घासास देखील पुरले नाहींत; तें पाहतांच सभेंतील सर्व भक्तलोक मनांत आश्चर्य करूं लागले. व मग एकच गोंधळ उडून सर्व लोक आपआपसांत बोलूं लागले. ॥ ५५ ॥ हा अल्लमप्रभु आकाशास जाऊन चिकटेल इतकी लांब जीभ पसरून सर्व जगास देखील खाऊन टाकील; अशा ह्या प्रभूला पोटभर अन्न घालून तृप्ति झाली काय? ह्मणून विचारण्याची विष्णु, ब्रह्मदेव, इंद्र वगैरे देवांची देखील शक्ति नाहीं. ॥ ५६ ॥ बसवेश्वरानें हें भलतेंच काय आरंभिलें आहे? हा त्याचा वेडेपणा झाला, आतां ह्याचा काय परिणाम होईल समजत नाहीं. असें सर्व लोक आपआपसांत बोलूं लागले असतां बसवे-

---

१ जेमने.

र्तनः ॥ ५७ ॥ सुमनषष्टिकशालियवाश्वणुप्रथिततोक्ययसुतंडुलपर्व-
तान् ॥ अपि च कोद्रवकंगुधराधरांश्चणकमाषमसूरकलायकान् ॥ ५८ ॥
तिलमयष्टकयावकमुद्गकान् वरकबर्बरखल्वगवेधुकान् ॥ अपि च
साम्यकुलुत्थकयावनालकगणानलसंदमुखान् बहून् ॥ ५९ ॥ त्वरित-
पाककृतौ विनियोजयन्नयुतलक्षगुणाधिकपाचकान् ॥ अपि सुपक्कमप-
क्कमधाशयत्प्रभुवरं बहुलौदनपर्वतं ॥ ६० ॥ सकलवस्तुचये समुपा-
हृते प्रभुवरेण तदा बसवेश्वरः ॥ परवशो बहुधान्यसमृद्धिमन्नृपति-
कोशचयं च समर्पयत् ॥ ६१ ॥ अहह चित्रमभून्मनसार्पितान्यगणि-
तान्यपि सर्वगतः प्रभुः ॥ पुरि महान् बुभुजे तुषवर्जितं स्वयमुपा-
श्रित एव चिदंबरं ॥ ६२ ॥ रसफलौदनधान्यविवर्जितं पुरमभूत्सकलं
निमिषार्धतः ॥ अथ विलोक्य गणा बभणुः प्रभुं क्षुदनिवृत्तिविदीर्ण-

---

श्वर हें ऐकून पुन्हा धीर धरून तेथून उठला. ॥ ५७ ॥ व मनांत विचार करूं लागला कीं, राजाचा प्रभुपणा सर्व आपलाच आहे, (माझ्या विरुद्ध राजा वागणार नाहीं.) मग त्यानें लागलेच आपले चाकरनौकर बोलावून शहरांतील सर्व प्रकारचें धान्य गोळा करून आणलें. त्याची आज्ञा मोडण्याची कोणाची शक्ति नव्हती. ॥ ५८ ॥ त्या लोकांनीं गहूं सहा खंडी, तांदूळ, जव, तूर, उंची तांदूळ वगैरे धान्यांचा ढीग केला; तसेंच कोद्रव, राळे ह्यांचा पर्वताएवढा ढीग केला. हरभरे, उडीद, मसूर, कलायक वगैरे धान्यांचा ढीग केला. ॥ ५९ ॥ तसेच तीळ, रानमुग, लाख, मूग, वरई, अवरी, रानगहूं तसेच हुलगे, जोंधळे, अळसंदी वगैरे सर्व जातीचीं धान्यें आणून त्यांचे मोठमोठाले ढीग केले. ॥ ६० ॥ व लवकर लवकर स्वयंपाक तयार करण्यासाठीं दहा लक्षांपेक्षां अधिक हुशार हुशार असे स्वयंपाकी लोक स्वयंपाकास लाविले व शिजलेला न शिजलेला असा मोठा थोरला पर्वताएवढा अन्नाचा ढीग करून अल्लमप्रभूपुढें ठेविला. ॥ ६१ ॥ अल्लमप्रभूनें तितक्या सर्व धान्यापासून तयार झालेलें अन्न खाऊन टाकलें असतां बसवेश्वर स्वतः परतंत्र असतांनाही त्यानें आपल्या ताब्यांत असलेलीं राजाची अनेक धान्याचीं कोठारें अल्लमास अर्पण केलीं. ॥ ६२ ॥ अबब! काय मौज सांगावी! बसवेश्वरानें मनांत आणून अल्लमप्रभूस अर्पण केलेल्या अनेक धान्याच्या कोठारांतील त्या महासमर्थ सर्वान्तर्यामी अल्लमप्रभूनें कोंडाखेरीज करून बाकी सर्व धान्य खाऊन टाकलें. व अल्लमानें स्वतः चिदंबरस्वरूप घेतलें. ॥ ६३ ॥ त्या नगरांतील रस, फळें, अन्न आणि धान्य एका क्षणांत अल्लमप्रभूनें खाऊन टाकिलें,

**निजाननं ॥ ६३ ॥ अहह यः क्षुधितः प्रलये पुमान् न परितृप्तिमवाप- महाप्रभुः ॥ कमलजाण्डशतैरपि सांप्रतं स कथमेष्यति तृप्तिमियत्त्वदैः ॥ ६४ ॥ सकलपूर्णपरात्परसद्घनप्रमदनित्यनिरंजनसंविदः ॥ प्रभु- गुरोः क्षुधितस्य कियत्पुरं परिमितं प्रभवेत्परितृप्तये ॥ ६५ ॥ भवति वाडववह्निसमिंधने जगति वापि जलैः शमयेत्कथं ॥ किमथ वा करकांबुकदंबकैः प्रभुगुरोः क्षुदपीह तथौदनैः ॥ ६६ ॥ श्रुतिशतैः स्तुत एष हि विश्वतोमुखतया ननु विश्वत ईक्षणः ॥ अपि च विश्वकरः किल विश्वतः पदतलोऽखिलविश्वभुगीश्वरः ॥ ६७ ॥ कथम- मुष्य भवेज्जगदीशितुर्जगति वस्तुचयैः परितर्पणं ॥ इति गणेषु वदत्सु भिया ह्रिया स बसवोऽभवदानतमस्तकः ॥ ६८ ॥ बहुविचारभरा-**

---

इतकें होऊनही अल्लमप्रभूची भूक शांत झाली नाहीं. पुन्हां पूर्वीप्रमाणेंच अल्लम- प्रभूचें भुकेलेलें तोंड पाहून ते सर्व प्रमथगण परस्परांत बोलूं लागले. ॥ ६४ ॥ अबब! जो भुकेलेला पुरुष महाप्रभु अल्लम प्रळयकाळाच्या वेळीं शेंकडों ब्रह्माण्डें खाऊन देखील तृप्त झाला नाहीं, तो सध्या ह्या थोड्याशा अन्नानें कसा तृप्त व्हावा? ॥ ६५ ॥ सकल पूर्ण परात्परस्वरूप व नित्य निरंजन संवित्स्वरूप अशा भुकेलेल्या ह्या अल्लमप्रभूला हें लहानसें शहर तृप्त करण्यास कसें समर्थ होईल? ( ह्या कल्याणनगराकडून अल्लमप्रभूची भूक दूर होणें शक्य नाहीं. ) ॥ ६६ ॥ वडवाग्नि पेटून सर्व जगाची राख करूं लागला असतां पुष्कळ गारा एकत्र करून त्याच्या पाण्यानें तो विझवूं ह्मटलें तर तो विझेल काय? तसेंच ह्या अल्लमप्रभूची भूक इतक्या थोडक्या अन्नानें कशी शांत होणार? मुळींच शांत होणार नाहीं. ॥ ६७ ॥ शेंकडों श्रुति अल्लमप्रभूची स्तुति करितात कीं, "ह्या अल्लमप्रभु विश्वतो- मुख आहे, विश्वत ईक्षण आहे, विश्वकर व विश्वतःपद आहे व विश्वभुक् आहे." ( सर्व जगाचीं जितकीं तोंडें आहेत तीं सगळीं अल्लमप्रभूचीं तोंडें होत. सर्व जगाचे जितके डोळे आहेत तितके सर्व अल्लमप्रभूचे डोळे होत. सर्व जगाचे जितके हात आहेत तितके सर्व अल्लमप्रभूचे हात होत. व सर्व जगाचे जितके पाय आहेत, तितके सर्व अल्लमप्रभूचे पाय होत. व जितकें अन्न सर्व जगास खाण्यास पाहिजे तितकें अन्न एका अल्लमप्रभूस खाण्यास पाहिजे, अथवा प्रसंग पड- ल्यास सर्व जग अल्लमप्रभु एकटा खाऊन टाकील. ) ॥६८॥ ह्या परमेश्वराची अनेक प्रकारच्या वस्तु भक्षण केल्या तरी तृप्ति कशी होणार? ह्याप्रमाणें इतर प्रमथगण भयभीत होऊन बोलत असतांना बसवेश्वरानें लाजून आपली मान खालीं घातली.

**विलमानसे बसवमंत्रिवरे समये तदा ॥ तमवदन्मणिवालकमाच-यस्सदसि तद्भगिनीसुतसंमतः ॥ ६९ ॥ असदृशं समरांगणमागतो भटवरः किमु गच्छति पृष्ठतः ॥ तनुमनोधनसाधुसमर्पणात्त्वमपि तर्पय तद्वदमुं गुरुं ॥ ७० ॥ हुसुहुसूरिति किं परितप्यसे हृदि शुचा क्व गता प्रतिभा तव ॥ इति स माचयदेववचोबलाद्बसवराट् बुबुधे समयोचितं ॥ ७१ ॥ विदितकृत्यतयोल्लसदाननस्त्रिकरणैक्यसमाहितमानसः ॥ स बसवो मणिवालघनं स्तुवन् समपदद्धितवागुपदेशकं ॥ ७२ ॥ अयि जयिन् मणिवाल दयानिधे जय जयामलभक्तिसुधांबुधे ॥ अघनिवारणकारण यद्भवान् मम हितार्थमिलां त्रिदिवाद्गतः ॥ ७३ ॥ उपगतोऽस्यथ वैव शिवाज्ञया प्रमथनाथ पुरात्परमेशितुः ॥ हितवचः समये मम संकटे त्वमुपदेष्टुमकारणवत्सलः**

---

॥ ६९ ॥ बसवेश्वर अशा प्रकारच्या काळजींत पडला असतां व खालीं मान घालून मुकाट्यानें उभा राहिला असतां त्याच्या भाच्याच्या पूर्ण प्रीतींतील मणिवालमाचयार्य ( मडिवाळमाचय्य ) सभेंत त्यास ह्मणूं लागला. ॥ ७० ॥ उत्तम प्रकारच्या युद्धभूमीवर आलेला शूर योद्धा पुन्हा माघारा जातो काय? तसाच तूं देखील ह्या अल्लमप्रभूला आपलें स्वतःचें शरीर, मन, धन चांगल्या रीतीनें अर्पण करून त्यास तृप्त कर. भिऊं नकोस. ॥ ७१ ॥ हुसूसू हुसूसू असे सुसकारे टाकून मनांतील दुःखामुळें दुःखी कां होतोस? तुझी बुद्धि कोठें गेली? असें माचयार्यानें समजावून सांगितल्यावर बसवेश्वर आपलें कर्तव्य कर्म योग्य रीतीनें कसें करावयाचें तें समजला. ॥ ७२ ॥ आतां पुढें काय करावयाचें तें समजतांच बसवेश्वराच्या तोंडावर हुरूप दिसूं लागली, व त्यानें कायावाचामनानें अल्लमप्रभूस तृप्त करण्याचें मनावर घेतलें. नंतर त्या मणिवालघनाची प्रशंसा करून हा गोड आणि हितकारक बोलणारा आपला गुरु आहे असें मानून त्यास ह्मणूं लागला. ॥ ७३ ॥ अरे श्रेष्ठा मणिवाला, शाबास, तुझा जय असो, तूं कृपेचा समुद्र आहेस. निष्पापभक्तिरूप अमृताचा समुद्र आहेस; पातकांचें निवारण करणारा आहेस. मला वाटतें कीं, माझें हित करण्यासाठीं तूं स्वर्गलोकांतून येथें मृत्युलोकीं आलास. ॥ ७४ ॥ अथवा हे प्रमथश्रेष्ठा, शिवाच्या आज्ञेनेंच तूं कैलासपुरापासून येथें आला आहेस हेंच खरें. माझ्या अशा संकटाच्या वेळीं मला योग्य उपाय सूचवून तूं कांहींएक कारण नसतां माझ्यावर मोठी कृपा केलीस. ( तूं माझा

॥ ७४ ॥ त्वमथवा मयि रक्षकतां गतो मम भरस्त्वदधीनतया स्थितः ॥ त्रिसमयेषु च जन्मनि जन्मनि प्रमथनाथ भजामि कृतार्थतां ॥ ७५ ॥ इति वदन्निजदेहमधीशितुर्निरुपमित्युपहारवदास्तिकाः ॥ अमनुतात्मनि कल्पयितुं तथा स च युवा बसवस्तदनुव्रतः ॥ ७६ ॥ सितमुभौ भसितं दधतौ मुदा धृतहराक्षमणिस्रगलंक्रियौ ॥ असदृशीं-द्रियसंयमतत्परौ रुरुधतुर्दशवायुगती क्षणात् ॥ ७७ ॥ तनुगुणा-न्परिहृत्य शिवात्मताकलिततत्वसुवासनयान्वितौ ॥ दलितवृत्ति-सुचित्तमथान्तरस्फुरितमार्गनिरर्गलमापतुः ॥ ७८ ॥ बसवदण्डपति-स्तदनु प्रभोस्सविधदेशमुपेत्य कृतांजलिः ॥ उपनिषद्वचनैरुपबृंह-णैस्सह नुतिं विदधे परमास्तिकः ॥ ७९ ॥ त्वयि समस्तमिदं जगदत्र च त्वमखिले परिपूर्णतया स्थितः ॥ पदमिदं तव सर्वपदादधस्तव

---

अकारणमित्र आहेस.) ॥ ७५ ॥ किंवा तूं माझा सर्वतोपरि रक्षक आहेस. माझी सर्वप्रकारची चिंता तुला आहे, मी निश्चिंत झालों. हे प्रमथश्रेष्ठा मी जन्मो-जन्म त्रिकाळ तुझ्या उपकाराची आठवण करीन, कधींही विसरणार नाहीं. ॥ ७६ ॥ हे ब्राह्मण हो, असें बोलून बसवेश्वरानें मनांत आणलें कीं मी आपला देह अल्लमप्रभूस खाण्याचा पदार्थ जसा अर्पण करितात तसा अर्पण करीन. असा त्याचा दृढ निश्चय होतांच तो तरुण चन्नबसवेश्वरही तसेंच करण्यास तयार झाला. ॥ ७७ ॥ त्या दोघांनींही पांढरी शुभ्र विभूति कपाळास लाविलेली होती, गळ्यामध्यें रुद्राक्षांच्या माळा त्यांनीं अलंकारांप्रमाणें घातलेल्या होत्या, त्यांचेसारखा इंद्रियनिग्रह कोणासही करितां येत नव्हता. इतके ते दोघे आत्मसंयमन करण्यांत तरबेज होते. त्यांनीं दहाही प्राणवायूंच्या गती (जाण्यायेण्याच्या क्रिया) अडवून धरल्या. ॥ ७८ ॥ त्यांनीं आपले शरीरगुण (देहावरील ममत्व) सोडिलें व सर्व जग शिवस्वरूप आहे अशी चांगली भावना त्यांनीं मनांत धरिली; त्यांचे मनाचे इतर विचार लयास जाऊन त्यांचें मन शुद्ध सच्चिदानंदस्वरूपाकडे लागलें. ॥ ७९ ॥ नंतर बसवेश्वर अल्लमप्रभूच्या जवळ जाऊन हात जोडून उभा राहिला व भक्तिपूर्वक स्तोत्ररूपाच्या उपनिषदांतील वाक्यांनीं अल्लमप्रभूची स्तुति करूं लागला. ॥ ८० ॥ हे परमेश्वरा, तुझ्यामध्यें हें सर्व त्रैलोक्य राहतें. तूं त्या त्रैलोक्यांत पूर्णपणें भरलेला आहेस. जितकीं कांहीं खोल स्थानें आहेत त्या सर्व स्थानांच्या खालीं तुझा पाय असून

शिरस्तु तथोच्छ्रितमुच्छ्रितात् ॥ ८० ॥ तव न चादिरधीश न मध्यमं न चरमं निगमागमसंहतिः ॥ परिविमृग्य न वेत्ति भवत्पदं न मनसापि विचिंतयितुं क्षमं ॥ ८१ ॥ दिश इमा दश दीर्घभुजास्तव द्युमणिवह्निसुधाद्युतयो दृशः ॥ मरुत उच्छ्वसितान्युदरं नभः पदयुगं पृथिवीति निगद्यते ॥ ८२ ॥ अहमहं क्रियया‌द्य भुजिक्रिया घटिततृप्तिकृते तव चागुरुं ॥ अकरवं कथितुं नहि शक्यते मम महानपराध इयानिति ॥ ८३ ॥ कमलजाण्डशतानि तवोदरे कमलकेसरसन्निभतां ययुः ॥ क्षुदपनोदनमोदनपूरणात्कथमहं करवै परमेशितुः ॥ ८४ ॥ यदशनं निदधामि तवेति तद्वचनमल्पमधीश सहस्व मे ॥ करुणया तव भैक्ष्यतयाऽद्य नौ परिग्रहाण तनुद्वयमल्लम ॥ ८५ ॥ यदि भवेदशनीयमिहावयोस्तनुयुगं ननु तर्हि भवेव तौ ॥ करणदोषनिराकरणात्पुनर्मरणजन्मजितौ सुखनिर्वृतौ ॥ ८६ ॥ इति वद-

---

तुझें मस्तक जितकीं उंच उंच पर्वताचीं शिखरें आहेत त्यांपेक्षां देखील उंच आहे. ॥ ८१ ॥ हे परमेश्वरा, तुला जन्म नाहीं, तुला तारुण्यावस्था नाहीं. तुला मरण नाहीं. वेद आणि आगम ह्यांचा समुदाय तुझ्या स्थानाचा नेहमीं शोध करितो; परंतु त्यांस तें तुझें स्थान सांपडत नाहीं; व तें मनानें विचार करितां येत नाहीं. तें अतर्क्य आहे. ॥ ८२ ॥ हे परमेश्वरा, ह्या दहा दिशा तुझे हात आहेत, सूर्य, अग्नि आणि चंद्र ह्या तुझ्या दृष्टि ( नेत्र ) आहेत, वायु तुझा श्वासोच्छ्वास असून आकाश हें तुझें उदर आहे आणि पृथ्वी ही तुझे पाय आहेत, असे वेद ह्मणतात. ॥ ८३ ॥ मी गर्वानें तुला पोटभर जेवावयास घालून तृप्त करीन असें ह्मणत होतों; परंतु त्यापैकीं अगदीं थोडें देखील काम मजकडून झालें नाहीं. मजकडून हा मोठा अपराध घडला तो सांगतां येत नाहीं. ॥ ८४ ॥ हे परमेश्वरा, तुझ्या पोटामध्यें शेंकडों ब्रह्माण्डें देखील कमलाच्या तंतूंसारखीं होतात, त्या परमेश्वराचें ( तुझें ) क्षुधानिवारण भातानें जेवण घालून माझ्यासारख्यानें कसें करवेल ? ॥ ८५ ॥ जें मी तुला जेवण पोट भरेपर्यंत घालीन ह्मणून बोललों त्या बोलण्याची परमेश्वरा मला क्षमा कर. आह्मी दोघेजण भिक्षान्नाच्या रूपानें तुजकडे आलों आहों; हे अल्लमप्रभो, कृपा करून आमच्या दोघांच्या शरीरांचा स्वीकार कर. ॥ ८६ ॥ आमचीं शरीरें जर खाण्यास योग्य असतील तर आह्मीं दोघेजणही खरोखर कृतार्थ झालों. इंद्रियदोष दूर झाल्यामुळें आमचें जन्ममरणाचें भय दूर झालें. व आह्मांस मोक्ष मिळाला असें

**त्ययमल्लमवल्लभो बसवमंत्रिवरे पुनराह तं ॥ स्मितमुखो नहि वाच्यमिदं त्वया श्रुतिविदा मयि पूर्णनिरंजने ॥ ८७ ॥ क्षुदसुधर्मतया तृडपि स्फुटा नहि चिदात्मन ईशितुरस्ति मे ॥ अथ कुतो व्यसनानि निराशिषः किमुत कामकथा स्मरवैरिणः ॥ ८८ ॥ बसवनाथ जगद्विदितां भवच्छरणदासतया स्थितिमूर्जितां ॥ इह निशम्य भवन्तमवेक्षितुं ननु समागत इत्यवगच्छ मां ॥ ८९ ॥ न किमपि त्वयि दातरि याचितुं गृहमवाप्नुवमद्य महामते ॥ अनितरोपमभक्तिविजृंभणं तव निरीक्षितुमागतवानहं ॥ ९० ॥ स्वमुखमेव सुनिर्मलदर्पणे बसवनाथ यथा पृथगीक्षते ॥ मयि च तद्वदपेक्षितमीक्षते तव हृदा शरणाञ्छरणार्थिना ॥ ९१ ॥ इति निशम्य गुरोर्वचनं पुनर्बसवराडिदमाह महाप्रभो ॥ क्व जडबुद्धिरहं क्वनुचित्तयस्त्वमखिलात्मसु जीवनतां गतः ॥ ९२ ॥ चरणभक्तिरतेषु जगद्गुरो तव कियानहमल्पविहा-**

---

समजतों. ॥ ८७ ॥ ह्याप्रमाणें प्रधानश्रेष्ठ बसवेश्वर बोलला असतांना अल्लमप्रभु हंसून ह्मणाला, अरे बसवेश्वरा, असें बोलूं नकोस, तूं तत्ववेत्ता असून माझ्यासारख्या निरंजनाविषयीं असें बोलणें तुला शोभत नाहीं. ॥ ८८ ॥ मी चित्स्वरूप परमेश्वर आहें, मला भूक तहान वगैरे शरीरधर्म मुळींच नाहींत. मी निरिच्छ असल्यामुळें मला दुर्व्यसनें कोठून असणार? मी मदनाचा वैरी आहें. मजजवळ विषयसुखाची गोष्ट देखील खपत नाहीं. ॥ ८९ ॥ बसवेश्वरा, लोकांमध्यें प्रसिद्ध असलेली शरण ( स्वधर्मसंपन्न ) लोकांवरील निष्ठा आणि शिवाची भक्ति ह्यामुळें तुझी उत्तरोत्तर वाढणारी कीर्ति ऐकून तुला पाहण्यासाठीं मी येथें आलों आहें असें समज, त्यापेक्षां माझा दुसरा कोणताही हेतु नाहीं. ॥ ९० ॥ हे बुद्धिवाना, तूं मोठा दाता आहेस ह्मणून मी तुजकडे कांहीं मागण्याच्या आशेनें तुझ्या घरीं आलों नाहीं, तुझ्यासारखा भक्ति करणारा मनुष्य त्रैलोक्यांत कोणी नाहीं, ह्मणून तुझी भक्ति पाहण्यासाठीं मी येथें आलों आहें. ॥ ९१ ॥ बसवेश्वरा, ज्याप्रमाणें स्वच्छ आरशामध्यें आपलें स्वतःचें तोंड निराळें ( दुसरें ) दिसतें त्याप्रमाणें शरणलोकांस शरणार्थ करणाऱ्या तुझ्या मनाला मी कांहीं मागण्याकरितां आल्याचा संशय येतो. ॥ ९२ ॥ असें अल्लमप्रभूचें बोलणें ऐकून बसवेश्वर पुन्हा ह्मणाला, गुरुश्रेष्ठा, मी मंदमती कोणीकडे! व विचारशक्ति कोणीकडे! तूं सर्व प्राणिमात्रांमध्यें जीवपणा पावला आहेस ( सर्व प्राणिमात्रांचा तूंच जीवात्मा आहेस. ) ॥ ९३ ॥ तुझ्या चरणकमलांची भक्ति कर-

यितः ॥ पदपरागतया स्थितिरेव मे भुवि कटाक्षवशादनुगृह्यतां ॥ ९३ ॥ मयि दया यदि देव समर्पितां तनुमवाप्य भोज्यपदार्थतां ॥ यदि न तादृशभाग्यममुष्य चेत्किमपि तंत्रमिहास्ति न मे स्वतः ॥९४॥ इति वदन्तमवेक्ष्य गुरुश्चिरं स्थिरहृदं बसवं स्मयदाननः ॥ अभिदधे गुरुपुत्र महामते न भवतास्ति समो भुवनत्रये ॥ ९५ ॥ तनुमनोधनमामकतां त्यजन्गुरुचरेशपदार्चनतत्परः ॥ निरुपमामलभक्तिरसाप्लुतस्त्वदितरो न भवेद्भुवनत्रये ॥ ९६ ॥ परिहृताष्टमदः क्रिययेद्धहृद्विमललिंगरतोऽगगुणांस्त्यजन् ॥ गतभवो विषयेंद्रियनिर्जयी त्वमभजो ममभोज्यपदार्थतां ॥ ९७ ॥ अहह साधुहृदार्पणमात्रतः सपदि तृप्तिरभून्मम सन्मते ॥ न कुरु संशयमत्र निधीयतां बसवहस्तजलं त्वरया

---

णाऱ्या लोकांत जगदीश्वरा, माझ्यासारख्या थोडाबहुत दानधर्म करणाऱ्याची एवढी काय प्रतिष्ठा आहे ? मी यःकश्चित् सामान्य मनुष्य आहें. जगांत तुझ्या पदकमलावर मी धूलीसारखें रहावें हीच माझी योग्यता आहे. माझ्यावर कृपाकटाक्ष ठेवून मला कृतार्थ करा. ॥ ९४ ॥ हे परमेश्वरा, मजवर जर आपली कृपा आहे तर इतकेंच करा कीं, माझें हें शरीर इतर भक्ष्यपदार्थांप्रमाणें आपण भक्षण करा. ह्याची जर इतकी योग्यताच नसली तर माझ्या जीवंत राहण्यांत कांहींएक अर्थ नाहीं. माझें जन्मास येणें व्यर्थ आहे. ॥ ९५ ॥ ह्याप्रमाणें बोलणाऱ्या बसवेश्वराकडे बराच वेळ पाहून व त्याचा दृढनिश्चय पाहून हास्यमुख करून अल्लमप्रभु ह्मणाला, हे गुरुपुत्रा बुद्धिमाना, तुझ्यासारखा सद्गुणी त्रैलोक्यांत सांपडणार नाहीं. ॥ ९६ ॥ तूं आपलें शरीर, मन आणि धन मला अर्पण केलेंस, व गुरूच्या आणि जंगमांच्या चरणसेवेविषयीं नेहमीं दक्ष असतोस. तूं निरुपम व निष्पाप अशा भक्तिरसानें ओथंबलेला ( भिजलेला ) आहेस, तुझ्यासारखा मनुष्य त्रैलोक्यांत सांपडणार नाहीं. ॥ ९७ ॥ तुझे आठ प्रकारचे गर्व लयास गेले आहेत, ( तुला गर्व नाहीं. ) सत्कर्मामुळें तुझें मन स्वच्छ झालें आहे. निर्मल अशा लिंगावर तुझी दृढनिष्ठा असल्यामुळें तुझें शरीरावरील प्रेम नाहींसें झालें आहे, तुझें जननमरण चुकलें आहे, विषयेंद्रियांस तूं जिंकलें आहेस, तूं माझ्या खाण्याच्या उपयोगीं पडण्यास योग्य आहेस. ॥ ९८ ॥ वाहवा, वाहवा, तुझी भक्ति धन्य आहे, तूं भक्तिभावानें मला आपलें शरीर अर्पण केलेंस; त्यामुळें माझी भूक तत्काळ शांत झाली. अरे सदाचारी बसवेश्वरा, आतां काडीमात्र शंका धरूं नकोस, मला लवकर तूं

**त्वया ॥९८॥ इति गुरोर्वदतः स्वयमुत्तरं सदसि वक्तुमयं भयसंयुतः॥ कलशमानयतात्मसतीयुतः परिमलोदकपूर्णहिरण्मयं ॥ ९९ ॥ अथ वितीर्य जलं प्रभुमूर्तये मुखकरांघ्रिविशोधनपूर्वकं ॥ सुरभिवीटिकया मुखवासनामरचयद्बसवो भयभक्तिमान् ॥ १०० ॥ स्रगनुलेपसुधूपनिरूपणैर्जयजयध्वनिवाद्यरवैः समं ॥ रचितमंगलदीपशतैः प्रभुं स्तुतिनमस्कृतिभिर्बसवोऽर्चयत् ॥ १०१ ॥ हृदि मुदा तदनु प्रभुरब्रवीद्बसवनाथ भवद्भवनान्तरे ॥ प्रतिदिनं विघसार्हगणाः परं क्षुधमवापुरमूंस्तरसाऽऽह्वय ॥ १०२ ॥ सुपरिपक्वमथान्नमवारितं बसव भोजय तान्स्वयमश्नुहि ॥ परिजनैः श्रम आशु निवार्यतामिति नतोऽभिहितो विनयान्वितः ॥ १०३ ॥ अथ गतो बसवो गणसन्निधिं प्रणिपतञ्छरणार्थितया पुरः ॥ उपनिधाप्य विभूतिसुवीटिका विनय-**

---

हस्तोदक (हात धुण्यास पाणी) दे. ॥ ९९ ॥ ह्याप्रमाणें बोलणाऱ्या अल्लमप्रभूस सभेमध्यें उत्तर देण्यास भय पावलेल्या बसवेश्वरानें आपल्या बायकोकडून सुवासिक पाण्यानें भरलेला सोन्याचा तांब्या अल्लमप्रभूपुढें आणून ठेवविला. ॥१००॥ मग अल्लमप्रभूला तोंड, हात, पाय धुण्यास पाणी देऊन प्रभूचें आंचवणें झाल्यावर सुगंधिपदार्थ घालून तयार केलेला विडा भय व भक्ति ह्यामुळें शोभणाऱ्या बसवेश्वरानें नम्रतेनें आणून अल्लमाचे हातांत दिला. ॥ १०१ ॥ नंतर उत्तम उत्तम सुवासिक फुलांच्या माळा, अंगास उटी लावणें, तसेंच कृष्णागुरु चंदनाचे धूप सुवासासाठीं पेटविणें, तसेंच जयजयकार शब्द करणें, अनेक प्रकारचीं मंजुल मंजुल वाद्यें वाजविणें, शेंकडों मंगल आरतीचे दीप पेटविणें, स्तुति करणें, नमस्कार करणें इत्यादि प्रकारांनीं बसवेश्वरानें अल्लमप्रभूची पूजा केली. ॥ १०२ ॥ बसवेश्वराचे पूजेमुळें अल्लमप्रभूच्या मनास मोठा संतोष वाटला. मग तो बसवेश्वरास ह्मणाला, तुझ्या घरांत दररोज भोजन करणारे जंगमलोक फार भुकेलेले आहेत, त्यांस तूं जाऊन अगोदर लवकर बोलाव. ॥ १०३ ॥ आणि उत्तम रीतीचें परिपक्व अन्न त्यांचे इच्छेप्रमाणें त्यांस लागेल इतकें जेऊं घाल. नंतर तूंही स्वतः जेव. तुला आज श्रम फार झाले आहेत. ते सेवकलोकांपासून सेवा घेऊन व विश्रांति घेऊन दूर कर. अशा तऱ्हेनें अल्लमप्रभूनें नम्रस्वभावाच्या बसवेश्वरास सांगितलें. ॥ १०४ ॥ ब्राह्मणहो, मग बसवेश्वर गणांजवळ (जंगमाजवळ) गेला व शरणार्थ करण्यांच्या रीतीनें त्यांस शरणार्थ करून, नम्रतेनें हात जोडून त्यांचे पुढें विभूति आणि विडा

**पूर्वमभाषत भूसुराः ॥ १०४ ॥ शिवगणाः क्षुधिताः स्थ यतः परं मम महानपराध इहागतः ॥ अवत मामनुगृह्य गृहागतास्सकरुणं कृतनित्यशिवार्चनाः ॥ १०५ ॥ अभिहिता बसवेन चराः पुनर्जगदुरार्य सषड्रसमोदनं ॥ उदरपूर्णमपूर्वमिवासिताः परमसौख्यमवाप्नुम सांप्रतं ॥ १०६ ॥ बसव नाद्यवदन्यदिने क वाप्यधिकतृप्तिरियत्यनुभाविता ॥ अयमहो महिमैव तवाथवा प्रभुगुरोर्महिमा नहि गोचरः ॥ १०७ ॥ गलमरुत्किल जीर्णकृदद्य नः सुरभिगन्धयुतः प्रसरत्ययं ॥ तदपि पूर्णतया परितृप्तितः क्षुदपनोदकृतं मुदमाप्नुमः ॥ १०८ ॥ अथ घुमंघुमिताल्लममूर्तिसल्ललितगन्धसुवासितदिक्तटाः ॥ चरतनोरधिगम्य विजृंभिताः स बसवो हृदि विस्मयमाप्तवान् ॥ १०९ ॥ विदिततद्गणतृप्तिरपि स्वयं सविनयं बसवः पुनरब्रवीत् ॥**

---

ठेवून ह्मणूं लागला. ॥ १०५ ॥ शिवगणांनो, तुह्मी फार भुकेलेले आहां, तुह्मांला परत जावें लागलें हा मजकडून मोठा अपराध झाला. मजवर कृपा करून माझें रक्षण करा. तुह्मी नित्य शिवपूजन करितां, तुह्मांस माझी दया येऊं द्या. ॥ १०६ ॥ असें बसवेश्वरानें ह्मटल्यावर ते जंगमलोक त्यास पुन्हा ह्मणूं लागले, श्रेष्ठा, बसवेश्वरा, आह्मी तुझे घरीं आतांच षड्रसअन्नें पोट भरून जेवलों, आमचें पोट इतकें भरलें आहे कीं, असें आमचें पोट पूर्वी कधींच भरलें नव्हतें. आह्मांस आतां अतिशय सुख वाटत आहे. ॥ १०७ ॥ बसवेश्वरा, आज जशी आमची तृप्ति झाली आहे अशी तृप्ति आजपर्यंत आमची कधीं कोठेंही झाली नाहीं. हें तुझें सामर्थ्य आहे किंवा ह्या अल्लमप्रभूचें सामर्थ्य आहे आह्मांस कांहीं समजत नाहीं. ॥ १०८ ॥ पोट भरलें ह्मणून आह्माला जी ढेकर येते आहे त्या ढेकरेला सुग्रास अन्नाचा घमघमीत वास येऊन तो सुवास चोहोंकडे पसरत आहे. आमचें पोट गच्च भरलें असल्यामुळें आह्मांला पोटभरून यथेच्छ जेवल्याबद्दल अतिशय सुख वाटत आहे. ॥ १०९ ॥ अल्लमप्रभूच्या शरीरास लावलेल्या सुवासिक उट्यांचा सुवास दहाही दिशांपर्यंत पसरला होता, त्या सर्व उट्या त्या जंगमलोकांच्या आंगास येऊन आपोआप लागल्या. हें पाहतांच बसवेश्वराचे मनास मोठें आश्चर्य वाटलें. ॥ ११० ॥ अल्लमप्रभु सर्वान्तर्यामी असल्यामुळें त्याच्या जेवणाच्या तृप्तीनेंच हे सर्वजण जेवून तृप्त झाले, हें बसवेश्वरानें ओळखलें. तरीपण पुन्हा नम्रतेनें बसवेश्वर सर्वांस ह्मणाला. अहो जंगमलोक हो, माझ्या घरीं चला आणि कृपा करून पूर्वी जसे माझ्या घरीं

चरगणा गृहमेत्य कृपान्विता भजत भोजनमाशु यथा पुरा ॥ ११० ॥ इति वदन्तमवेक्ष्य कृतांजलिं चरगणा बभणुर्बसवाग्रणीं ॥ क्षुधमपोह्य भवन्महिमैव नः किमु करोति विलज्जितमानसान् ॥ १११ ॥ भवतु वा महिमा जगदद्भुतः प्रभुगुरोर्भुवि साधनतैव नः ॥ चरगणेषु य एव महोन्नतो महिमवान्स गुरुर्भुवनत्रये ॥ ११२ ॥ तमखिलेश्वरमेकगुरुं प्रभुं यदभजस्त्वमिदं भजनं हि नः ॥ स जठरे जननीव सुतं जगत्त्रयमिदं परिरक्षति पूर्णदृक् ॥ ११३ ॥ तदनुभूतपदार्थरसार्पणादुदरगा वयमस्य च तर्पिताः ॥ तदिह तस्य विभोरशनार्पणं भवति सर्वचरार्पणमीदृशं ॥ ११४ ॥ यदिह तृप्तिरभूत्प्रभुसद्गुरोस्सकलजंगमतृप्तिरियं हि सा ॥ न हि कथानुभवोऽयमहो महान् करधृतस्य मणेर्मुकुरेण किं ॥ ११५ ॥ प्रथममानमिहेंद्रियकं स्फुटं तदनुमानमुखं

---

भोजन करीत होतां, तसें आतांही भोजन करा. ॥ १११ ॥ असें बोलून हात जोडणाऱ्या बसवेश्वरास ते जंगमलोक ह्मणूं लागले. बसवेश्वरा, तुझ्या अलौकिक सामर्थ्यानेंच आमची भूक दूर होऊन आह्मी तृप्त झालों. असें असून पुन्हा आह्मांस कां लाजवितोस ? ॥ ११२ ॥ पृथ्वीमध्यें हा अल्लमप्रभूचा अलौकिक महिमा वाढला हें फार चांगलें झालें; त्यामुळें आह्मांसही एकप्रकारचें साह्य झालें. तें असें कीं, जो कोणी जंगमलोकांत महान् सामर्थ्यवान् असेल त्यालाच सर्व त्रैलोक्याचा गुरु ह्मणावें. ॥ ११३ ॥ ज्याप्रमाणें तूं त्या सर्व त्रैलोक्याचा ईश्वर अशा अल्लमप्रभूस भजतोस त्याप्रमाणें आह्मीही त्याच अल्लमास भजत जाऊं. तो ज्ञानदृष्टि अल्लमप्रभू, आई जसें आपल्या पोटांत मुलाचें रक्षण करिते, त्याप्रमाणें सर्व त्रैलोक्याचें रक्षण करितो. ॥ ११४ ॥ त्यानें जे पदार्थ भक्षण केले व जे जे रस पिऊन टाकले, ते ते पदार्थ आणि ते ते रस आह्मी त्याच्याच पोटांत राहणारे असल्यामुळें आमच्या पोटांत येऊन आमचीं पोटें भरून आह्मी तृप्त झालों. त्यामुळें ह्या एका प्रभूला अन्न अर्पण केलें ह्मणजे तें सर्व जंगमलोकांस अन्न अर्पण केल्याप्रमाणें झालें. ॥ ११५ ॥ येथें जी अल्लमप्रभूची बसवेश्वराचे घरीं भोजन केल्यामुळें तृप्ति झाली ती सर्व जंगमलोकांचीच तृप्ति झाली, ही कांहीं गप्प नव्हे, तर प्रत्यक्ष अनुभवास आलेली गोष्ट आहे. हातांत धरलेल्या रत्नाला आरसा कशाला पाहिजे ? ॥ ११६ ॥ अगोदर इंद्रियांच्या समुदायास सुख व्हावें लागतें नंतर तें "सुख झालें" ह्मणून शब्दरूपानें बाहेर पडतें, ह्यास्तव आह्मी आपल्या तोंडानें तुला सुख झालें ह्मणून सांगतों त्यावरून आमच्या

**ह्यनुजीवति ॥ वचनमात्रमिदं बसवेंद्र नो विदितसारघनो हि भवाम्बुधः ॥ ११६ ॥ इति निशम्य चरोक्तिमयं पुनः प्रभुसमीपमुपेत्य कृताननतिः ॥ तदुदितं विनयात्तमजिज्ञिपन्मुहुरपि प्रकृतौपयिकं जगौ ॥ ११७ ॥ घनदयांबुनिधे चरदेशिकैस्तव न भेदकथा कियति प्रभो ॥ मयि तु निष्ठुरतोभयमध्यगे भवतु वा चरणं शरणं व्रजे ॥ ११८ ॥ इति निशम्य गुरुर्बसवोदितं पुनरुवाच यथार्थमिदं शृणु ॥ न हि भिदाऽस्ति मम क्व च जंगमैः सममतौ त्वहमेव भवान् सखे ॥ ११९ ॥ मतिभिदेव भिदां परिकल्पयत्यमलचित्तु कदापि न भिद्यते ॥ तदिह नौ नहि भेदकथा क्वचित्सुखमुपास्व चिदैक्यमखंडितं ॥ १२० ॥ इति तदाल्लमदेशिकसत्तमे समुपदेष्टति मंत्रिकुलोत्तमः ॥ मुकुलिताक्षियुगोऽद्वयभावनासुखमुपास्त चिरं पुरतः प्रभोः ॥ १२१ ॥ प्रभुमथ**

---

इंद्रियांस अगोदर सुख झालें हें उघड आहे. बसवेश्वरा, तुला सर्व तात्पर्यार्थ समजतच आहे, कारण तूंही चतुर आहेस. ॥ ११७ ॥ असें सर्व जंगमांचें बोलणें ऐकून बसवेश्वर तेथून अल्लमप्रभूकडे पुन्हा परत आला, व नमस्कार करून जंगमलोक काय ह्मणाले तें नम्रतेनें सांगूं लागला. व त्या समयास अनुसरून अल्लमप्रभूस प्रश्न विचारूं लागला. ॥ ११८ ॥ परमेश्वरा, तूं दयेचा खरोखर महासमुद्र आहेस, तुझ्यामध्यें आणि जंगमांमध्यें निराळेपणा काय आहे? कांहीं निराळेपणा तर दिसत नाहीं. मी दोघांसही सारखें मानीत असतां माझ्यावर तूं इतका निष्ठुर कां झालास? असो. मी तुझ्या पायांस शरण आहें. ॥ ११९ ॥ हें बसवेश्वराचें बोलणें ऐकून अल्लमप्रभु पुन्हा ह्मणाला, मी तुला वास्तविक प्रकार काय आहे तो सांगतों ऐक; मला आणि जंगमांला मुळींच निराळेपणा नाहीं. मित्रा, बसवेश्वरा, मी तुला आणि जंगमाला दोघांसही सारखेंच मानतों. ॥ १२० ॥ बुद्धिभेद (निरनिराळे विचार) असला ह्मणजे निराळेपणा वाटतो, निष्पाप मन असलें ह्मणजे निराळेपणा मुळींच नाहीं, ह्यासाठीं तूं आणि मी एकच आहोंत असें समज. तुझ्यामध्यें आणि माझ्यामध्यें निराळेपणा मुळींच नाहीं. परिपूर्णरीतीनें चित्स्वरूपसुखाचा त्याच्याशीं ऐक्य होऊन निरंतर उपभोग घे. ॥ १२१ ॥ असें अल्लमप्रभुगुरुश्रेष्ठ उपदेश करीत असतां तो सर्व प्रधानांत मुख्य असणारा बसवेश्वर दोन्ही डोळे झांकून अल्लमगुरूच्या पुढेंच, सर्व जग शिवमय आहे अशी कल्पना करून त्या सुखाचा अनुभव घेऊं लागला. ॥ १२२ ॥ त्या वेळीं सर्व प्रमथगणांनीं

बसवेन्द्रं प्रेक्ष्य भक्ताः समन्तात्समुदितशिवभावास्साधु साध्वित्यवोचन् ॥ महति महसि तस्मिन्भेरिभांकारघोषैर्जयजयनिनदोऽभूद्धो उघे इत्यपूर्वः ॥ १२२ ॥ इति कथितमृषींद्राः श्रीगुरोर्यन्महत्त्वं सकलनिगमसारं रक्षकस्येश्वरस्य। पठति परमभक्त्या यः शृणोति स्थिरात्मा प्रभुरधिकममुष्मै वाञ्छितार्थं ददाति ॥ १२३ ॥

इत्यार्षश्रीभविष्यत्पुराणकथाविशालायां प्रमथगणवचनानुकूलायां कलिकल्मषनिमग्नजनसमुद्धरणशीलायां प्रभुलिंगलीलायां बसवेश्वरकृतप्रभुसमाराधनतदीयभोजनमहिमानुवर्णनगतिर्नाम त्रयोविंशोऽध्यायः॥

---

अल्लमप्रभूकडे व बसवेश्वराकडे पाहिलें तेव्हां त्यांच्या मनांत शिवभक्तीचें स्फुरण होऊन सर्वजण वाहवा वाहवा ह्मणूं लागले. त्या वेळच्या मोठ्या समारंभांत नगारे व तुताऱ्या वगैरे वाद्यें वाजूं लागलीं, व जयजयकार शब्द व उघे उघे अशा शब्दामुळें बसवेश्वराचें सभागृह अगदीं दणाणून गेलें. ॥ १२३ ॥ ऋषीश्वरांनो, अल्लमप्रभु सर्व जगांचा रक्षक असून परमेश्वर आहे त्याचें सामर्थ्य कसें अलौकिक आहे हें तुह्मांस मीं सांगितलें. निश्चल मन करून जो कोणी हें पठन करील किंवा ऐकेल त्याचे अल्लमप्रभु सर्व मनोरथ परिपूर्ण करील.

ह्याप्रमाणें ऋषीश्वरांनीं भविष्यत्पुराणांत कथांच्या रूपानें सविस्तररीतीनें सांगितलेल्या, प्रमथगणांच्या वचनास अनुकूल असणाऱ्या, कलियुगांतील पातकांत बुडणाऱ्या लोकांचा उद्धार करण्यास उपयोगीं पडणाऱ्या, प्रभुलिंगलीलेंतील बसवेश्वरानें केलेलें अल्लमप्रभूचें पूजन, त्याचे भोजनाचें सामर्थ्य वगैरे वर्णन असलेला हा तेविसावा अध्याय संपला.



# अथ चतुर्विंशोऽध्यायः ॥

॥ श्रीनंदिकेश्वराय नमः ॥

**सूत उवाच**—॥ सिद्धश्रीवीरनाथेश्वरचरणयुगध्याननिर्धूतदोषा भाषावेषाद्यनीहा गुरुचरपुरभिल्लिगश्रृंगार्चनांगाः । मुक्त्यर्थाः शुद्ध-भावाः स्वतनुधनमनोरागशून्या विरक्ता भक्ताः श्रृण्वन्तु लीलां प्रभुशरणगुरोः सत्कथाभिर्विशालां ॥ १ ॥ ततः सकलशांभवप्रकर-मंघ्रिपीठांतिकस्थितं समवलोक्य तं शिवरहस्यबोधाप्तये । जग-द्गुरुरुवाच भोः श्रृणुत शास्त्रसारं परं मनोविलयनं विना नहि शिवैक्यसिद्धिर्नृणां ॥ २ ॥ मनः सृजति सर्वमप्यथ च वर्द्धय-त्येव तद्धनीभवदहंक्रियामुकुरबिंबितं मूर्तिमत् । तदेव ननु कारणं जगति बंधमोक्षद्वये दृढं च शिथिलं क्रमात्तदिह नाशयेत्सर्वथा ॥३॥ मनोविलयनं विना नहि शिवात्मबोधोदयः शिवानुभवमन्तरा नहि

---

सूत ह्मणतात—॥ १ ॥ श्रीसिद्धवीरनाथाच्या दोन्ही चरणकमलांच्या ध्याना-मुळें ज्यांचे सर्व दोष धुऊन जाऊन जे निर्दोष झाले आहेत, भाषा, वेष वगैरे ह्यांची मुळींच ज्यांना इच्छा देखील राहिली नाहीं, गुरु, जंगम व शिवलिंग ह्यांचें पूजन करण्याची ज्यांस इच्छा आहे, जे मोक्षप्राप्ति व्हावी ह्मणून इच्छितात, ज्यांचें मन अतिशय शुद्ध आहे, आपलें शरीर, आपलें धन, आपलें मन, ह्यांचे-वर ज्यांची मुळींच प्रीति नाहीं, जे विरक्त आहेत असे भक्त लोक, चांगल्या चांगल्या कथा असल्यामुळें जिला ज्यास्त महत्व आलें आहे अशा त्या प्रभुलिंगाच्या लीलेस भक्तिपूर्वक ऐकोत. ॥ २ ॥ नंतर सर्व जगाचा गुरु अल्लम सर्व शिव-भक्तांचा समुदाय (प्रमथगणांचा समुदाय) आपल्या चरणकमलाजवळ बसलेला पाहून त्यांस शिवरहस्याचें ज्ञान होण्यासाठीं सर्वांस ह्मणाला, अहो, शास्त्राचें मुख्य तात्पर्य ऐका. मनाचा नाश झाल्यावांचून (मन स्वस्थ झाल्या-वांचून) मनुष्यांस शिवैक्याची प्राप्ति होत नाहीं. ॥ ३ ॥ मन सर्व प्रकारचे तर्क करितें, व त्याप्रमाणें मनुष्य अनेक प्रकारचे उद्योगधंदे करूं लागतो. त्यामुळें आरशांत दिसणाऱ्या आपल्या स्वरूपाच्या प्रतिबिंबाप्रमाणें अभिमान दृढ होतो. ह्यास्तव तें मन बंधास आणि मोक्षास कारण आहे, तें मन दृढ झालें ह्मणजे बंध होतो व शिथिल झालें ह्मणजे मोक्ष होतो. ह्यास्तव त्या मनाचा सर्वतोपरि नाश केला पाहिजे. ॥ ४ ॥ मनाचा पूर्णपणें नाश झाल्यावांचून शिवतत्वबोधाचा

**भजेत माया क्षयं । शिवाद्वयसुखं तमस्ततिसमूलघातं विना न सिध्यति विबुध्यतां शिवगणैरिदं शांभवं ॥ ४ ॥ निशम्य गुरुणोदितं बसवमंत्रिराडब्रवीत्प्रभोऽल्लम समस्तसंशयनिवृत्तयेऽमी गणाः । भवच्चरणसेवया शिवरहस्यतत्वं परं प्रबोद्धुमभितो वसन्त्युपदिशानुगृण्हीष्व नः ॥ ५ ॥ वचो बसवसूरिणः प्रभुगुरुर्निशम्यादराद्रदद्युतिदरस्मितच्छुरितदिक्तटः सोऽब्रवीत् । तनुः परमपावनी प्रभवतीष्टलिंगार्चनान्मनः सुविमलं सदासुमयलिंगसंधानतः ॥ ६ ॥ गणेंद्र भवतां महाव्रतमिदं सुशीलादृतं विमुक्तिकरमस्ति किं परमिहोपदेश्यं मया । यदिष्टमिह दृष्टमात्मनि तथा स्मृतं वाखिलं शुभं भवतु सर्वदा शिवकृपावशादेव वः ॥ ७ ॥ इति प्रभुगुरुर्गणप्रततये कृताशीर्वचा विहृत्य समटाट्यया पुनरथागमिष्याम्यहं । ब्रुवन्निति गतोद्यतोऽभवदुपेत्य वेगात्ततः स दण्डपतिरग्रहीत्प्रभुपदाब्जयुग्मं दृढं ॥८॥**

---

उदय होत नाहीं, शिवानुभवावांचून मायेचा नाश होत नाहीं. शिवाचें अद्वयात्मक सुख अज्ञानाचा पूर्णपणानें नाश झाल्यावांचून होत नाहीं, असें शिवमत आहे. प्रमथगण हो, असें तुह्मीं नीट लक्ष्यांत धरा. ॥ ५ ॥ अल्लमप्रभूचें बोलणें ऐकून सर्व प्रधानांत मुख्य असा बसवेश्वर बोलूं लागला, हे सर्व प्रमथगण आपापल्या मनांतील सर्व संशय दूर होण्यासाठीं व तुझ्या चरणकमलांच्या सेवेनें शिवरहस्याचें मुख्य मर्म समजण्यासाठीं तुजजवळ येऊन बसले आहेत. आह्मां सर्वांस उपदेश करून आह्मांस कृतार्थ कर. ॥ ६ ॥ बसवेश्वराचें बोलणें ऐकून अल्लमप्रभु संतुष्ट होऊन हंसत हंसत बोलूं लागला, त्या वेळीं त्या हंसण्यामुळें त्याच्या पांढऱ्या शुभ्र दांतांचें तेज पडून दहाही दिशा उजळल्या गेल्या. असो. तो ह्मणाला, बसवेश्वरा, इष्ट लिंगाचें पूजन केलें असतां शरीर पवित्र होतें, तसेंच नेहमीं प्राणलिंगाचें पूजन केल्यामुळें मन पवित्र होतें. ॥ ७ ॥ हे प्रमथगणांनो, तुह्मी सर्वजण चांगल्या स्वभावाचे लोक आहांत, तुह्मी जें हें व्रत करितां तें सर्व व्रतांत श्रेष्ठ असून मोक्षप्राप्ति करून देणारें आहे. ह्यापेक्षां मी तुह्मांस ज्यास्त काय सांगूं? तुह्मीं येथें जें पाहिलें, व जें मनांत आणिलें तें सर्व शंकराच्या कृपेनें तुह्मांस नेहमीं कल्याणकारक होवो. ॥ ८ ॥ ह्याप्रमाणें तो अल्लमप्रभु गुरु प्रमथगणांच्या समुदायास आशीर्वाद देऊन घाईघाईनें पुन्हा मी लवकरच येईन असें सांगून जाण्यास तयार झाला. तितक्यांत बसवेश्वर जवळ येऊन त्यानें

**जगाद भयभक्तिमान्गुरुकृपांबुधेऽस्मन्मनःप्रबोधपदसंशयानिह निवार्य संरक्षितुं । दुरन्तभववारिधेर्गमयितुं च पारं भरस्त्वैव तदमी वयं शरणमागताः श्रीगुरुं ॥ ९ ॥ विमुक्तिपथमादरादनुगृहाण नान्यद्गुरो श्रियैव सह वर्द्धते हतधियां हि माया भृशं । क्रियाऽपि खलु यावती फलमभीप्सता दीयते जनेन ननु भुज्यते जडधियैव तावच्चिरं ॥ १० ॥ अतो विभवसंपदा फलदकर्मणा वाप्यलं चिदंग शिवलिंगनिर्मलनिरंतरध्यानतः ॥ निधाप्य पथि पश्चिमे पदमचंचलं सद्गुरो गमागमकृतां व्यथां धुरि निवार्य संरक्ष नः ॥ ११ ॥ प्रार्थयति बसवनाथे प्रभुरथ कृपया गणान्समन्वीक्ष्य । अधिकारिण इति मत्वा तत्वज्ञानोपदेशने प्राह ॥ १२ ॥ यूयं भक्तिक्रिययोः पारं गत्वा कृतार्थतां याताः । नैष्कर्म्यसिद्धिमतुलां प्रार्थितवन्तः परं पदं प्राप्तुं ॥ १३ ॥**

---

अल्लमाचे दोन्ही पाय घट्ट धरिले. ॥ ९ ॥ व अल्लमाविषयीं पूज्यबुद्धि असल्यामुळें भयानें व भक्तीनें हळूच बोलूं लागला, अल्लमप्रभो, तूं कृपेचा समुद्र आहेस. आमच्या मनांतील प्रबोधपदांचे संशय दूर करून आमचें संरक्षण करण्याकरितां आणि अपार अशा संसारसमुद्राच्या पैलतीरास जाण्याकरितां तूं आमचा मुख्य गुरु असल्यामुळें अल्लमप्रभो, आह्मी हे सर्वजण तुलाच शरण आलों आहों. ॥ १० ॥ अल्लमप्रभो, तूं आह्मांस मोक्षमार्ग दाखीव, त्याखेरीज आमचें दुसरें कांहीं मागणें नाहीं. अज्ञान मनुष्याच्या संपत्तीबरोबर मायाही ज्यास्त ज्यास्त वाढते, अज्ञान मनुष्य आपल्या आवडीचें जें जें काम करितो त्याप्रमाणें तितके दिवसपर्यंत त्याचें बरेंवाईट फळ भोगतो. क्रियेचें फळ भोगल्यावांचून त्याची सुटका होत नाहीं. ॥ ११ ॥ ह्यासाठीं ऐश्वर्य ( राज्याधिकार ) नको, संपत्ति नको, फळप्राप्ति करणारीं कर्मेंही नकोत, चित्स्वरूप आणि शिवलिंग ह्यांच्या निरंतर निर्मल ध्यानामुळें आह्मां सर्वांला पश्चिममार्गाकडे ( मोक्षमार्गाकडे ) लाऊन अल्लमप्रभो, स्थिरपदाची ( मोक्षपदाची ) आह्मांस प्राप्ति करून दे आणि जन्ममरणांचें दुःख अगोदर दूर करून आमचें रक्षण कर. ॥ १२ ॥ बसवेश्वर अशी प्रार्थना करीत असतां अल्लमप्रभूनें मग कृपादृष्टीनें एक वेळ सर्व प्रमथगणांकडे पाहिलें व हे सर्व प्रमथगण अधिकारी आहेत असें जाणून त्यांस तत्वज्ञानाचा उपदेश करण्यासाठीं अल्लमप्रभु बोलूं लागला. ॥ १३ ॥ प्रमथगणांनो, तुह्मी भक्ति आणि क्रिया ह्यांच्या पार गेलां आहां, व कृतार्थ झाला आहां, आतां कैवल्यपदाची प्राप्ति व्हावी ह्मणून उत्तम तऱ्हेची नैष्कर्मसिद्धिची तुह्मी

**भवतामधिकारवतां शिवतत्वरहस्यमेव वक्ष्यामि । शृणुतावहितस्वान्ता इति संबोध्याशु वक्तुमारेभे ॥ १४ ॥**

**प्रभुरुवाच—मृषा दृश्यं विश्वं यदि हृदि मृषैवेति कलयेच्छ्रुतेर्माया नश्येत्तदनु स भवेदिंद्रियजयी ॥ व्यथायां नष्टायां करणजनितायां विषयदुर्व्यतीहारो नश्येद्गतविषयगंधो जितरिपुः ॥ १५ ॥ तुषाद्युत्सादान्ते पुनरपि विवेकेन नु शिलानिरासे संशिष्येत्स्वयमिह यथा तण्डुलचयः । तथा दुःसंकल्पप्रकटितमनोवृत्त्यपचये ततो वृद्धिं यायाद्विमलतरसुज्ञानविभवः ॥ १६ ॥ प्रबोधे संपूर्णे हतविषयगंधस्य महतो भिदा नश्येद्धेयं त्विदमिदमुपादेयमिति सा । विकल्पानां हेतुः किल मन इदं तस्य विजये प्रपंचो मिथ्या स्यादयममृतसाम्राज्यमयते ॥ १७ ॥ अवस्थास्तिस्रस्तास्तिसृषु तनुषु त्रीनपि गुणानजस्रं जीवां-**

---

इच्छा करीत आहां. ॥ १४ ॥ तुह्मी सर्वजण उपदेश देण्यास योग्य आहां, तुह्मांस मी शिवतत्वाचें रहस्य सांगतों, तुह्मी एकाग्रमनानें ऐकून घ्या, असें त्यांस उद्देशून अल्लमप्रभु बोलूं लागला.

अल्लमप्रभु ह्मणाला—॥ १५ ॥ हें खोटें दिसणारें विश्व जेव्हां मनांत खोटेंच आहे असें वेदांत सांगितल्याप्रमाणें अनुभवास येईल तेव्हां मायेचा नाश होईल. मायेचा नाश झाला ह्मणजे तो पुरुष इंद्रियनिग्रही होतो, इंद्रियनिग्रह झाला ह्मणजे इंद्रियांपासून होणारी पीडा दूर होते. इंद्रियांची पीडा दूर झाली ह्मणजे विषयसुखाची वाईट खोडी दूर होते; विषयसुखाची आवड अगदीं नाहींशी झाली ह्मणजे तो मनुष्य कामक्रोधादिक षड्रिपूंचा नाश करण्यास समर्थ होतो. ॥ १६ ॥ कोंडा वगैरे सर्व काढून टाकिला व पुन्हा पाटावर घालून नीट काळजीनें खडे वगैरे पाहिले ह्मणजे जसे आपोआप स्वच्छ तांदूळ मात्र शिल्लक राहतात, तसेंच वाईट विचारांपासून उत्पन्न झालेल्या अनेक तऱ्हेच्या विचारांचा नाश झाला ह्मणजे मग अतिशय निर्दोष असें उत्तम ज्ञानाचें ऐश्वर्य वृद्धिंगत होतें. ॥ १७ ॥ ज्ञान पूर्णपणानें वृद्धिंगत झालें ह्मणजे त्या मनुष्यास विषयसुखाचा लवलेशही रहात नाहीं व तो श्रेष्ठ होतो. मग त्या मनुष्याची "हें टाकावें हें घ्यावें" अशा तऱ्हेची निराळेपणाची बुद्धि ( भेदबुद्धि ) नाहींशी होते. मन हें अनेक प्रकारच्या विकल्पांस ( कल्पनांस ) कारण आहे, त्याचा जय केला ह्मणजे हा प्रपंच खोटा भासूं लागतो, व मग त्या मनुष्यास अमृतसमुद्रांत पोंहल्यासारखें सुख वाटूं लागतें. ॥१८॥ बालपणा, तरुणपणा, म्हातारपणा ह्या तीन अव-

**स्त्रीनधिगमयदावर्तयति यत्। महासंसारे स्वर्नरकसुखदुःखादिबहुले मनस्तज्जेता स्यात्त्रयमिदमतीतः परशिवः ॥ १८ ॥ मनो यावद्बाह्यप्रसरणचणं तावदखिलः प्रपंचः सत्योऽयं भवति नहि मुक्तेः क च कथा। सुरत्वं मर्त्यत्वं सृजति ननु तिर्यक्त्वमपि तत्कदा वा निश्चेष्टं न भवति जये तद्बसवराट् ॥ १९ ॥ बहिर्द्वारस्संचारं त्यजदखिलमन्तर्हृदतया मनः प्रत्यक्तत्वे यदि भवति लीनं स्थिरपदं। जगन्मिथ्याभूतं भवति हि तदानंदभरितः स्वयं सुज्ञानी स्याद्बसव स गुरूणामपि गुरुः ॥ २० ॥ प्रतीयेत स्वान्ते स्मृतमिदमशेषं यदि जगद्बहिर्दृश्याकारं भवति मन एवानृतपदं। तदन्तस्थं कर्तुं यदि परमशक्तस्तदनुगो भवेत्स्वेच्छाचारी बसव नृपशुं विद्धि तमिमं ॥ २१ ॥ अहो मायापाशो भवति यदि ह्याशा यदि तया मनश्चेत्संबद्धं भवति सकलः**

---

स्था आहेत, स्थूल, सूक्ष्म, कारण हीं तीन शरीरें आहेत, सत्वगुण, रजोगुण, तमोगुण हे तीन गुण आहेत व जीवात्मा, अंतरात्मा व परमात्मा हे तीन आत्मे आहेत. मन हें प्राणिमात्रांला ह्या अवस्थांचा, शरीराचा, व गुणांचा संबंध घालून देऊन स्वर्ग, नरक वगैरे ठिकाणचें सुखदुःख असलेल्या ह्या अवाढव्य संसारांत लोळवितें त्या मनाला ज्यानें जिंकिलें त्यानें त्रैलोक्यास जिंकिलें; व तो प्रत्यक्ष शंकरच समजावा. ॥ १९ ॥ जोंपर्यंत मन बाह्य विषयांच्या पसाऱ्याकडे गुंतलेलें असतें तोंपर्यंत हा सर्व संसार खरा आहे असें भासतें, तोंपर्यंत मोक्षाचें नांव देखील घ्यावयास नको. मनच प्राणिमात्राला देवपणा, मनुष्यपणा आणि एखादे वेळीं पशुपक्षी ह्यांचा जन्म घेण्यास लावतें, कधीं मन निश्चल ह्मणून राहत नाहीं. ॥ २० ॥ बसवेश्वरा, हें मन जर बाहेरील विषयोपभोगांचा त्याग करून अन्तर्मन होऊन ज्ञानतत्वांत लीन झालें व तेथेंच स्थिर झालें, तर सर्व जग खोटें आहे असें आपोआप भासूं लागतें, नंतर असें मन झालेला मनुष्य अतिशय ज्ञानवान् होऊन निजानंदाचा उपभोग घेऊं लागतो. व तो सर्व गुरूंचाही गुरु होय, असें समज. ॥ २१ ॥ बसवेश्वरा, वर सांगितल्याप्रमाणें हें सर्व बाहेर दिसतें तें सर्व खोटें आहे, असें मनामध्यें आणलें व त्याप्रमाणें अनुभव आला, परंतु मनच खोटेपणाचें स्थान आहे तें आपल्या स्वाधीन ठेवून त्यास ज्ञानमार्गाकडे लावायाचें तें करण्यास जो प्राणी असमर्थ झाला आणि त्याच्याच तंत्राप्रमाणें वागूं लागला तो नरपशु आहे असें समजावें. ॥ २२ ॥ बसवेश्वरा, मनुष्य जर मायेच्या जाळयांत सांपडला तर त्यास आशा उत्पन्न होते. एकवेळ

क्लेशनिचयः । भवोऽयं तद्बद्धो भयमधिकमाप्नोति विजयी य आशा-यास्सोऽयं बसव गतदोषो हतभवः ॥ २२ ॥ इदं मे स्यान्मा स्यादिदमिति विकल्पोपकलितं स्वसंकल्पं जीवस्त्यजति न हि यावत्पशुतया । न तावच्छुङ्मोहाद्यरिनिकरपीडाक्षयमियात्ततस्तत्त्यागे स्याद्बसव स हि नित्यः पशुपतिः ॥ २३ ॥ क्षणार्धं कुत्रापि स्थितिमलभमानं मन इदं सदा सर्वार्थान्संस्मरति न हि पर्यायगणना । स्वभावोऽयं तस्य प्रभवति हि तेनैव सकलप्रपंचव्यासंगप्रतिफलितगंधव्यतिकरः ॥ २४ ॥ यद्वासनाभिरभिवृद्धिमवाप्य कामं संचालितो भ्रममुपैत्ययमन्तरात्मा । तन्मानसं ग्रसति यः स्थिरधीर्निगृह्य धन्योऽयमेव बसवेत्युदितोऽब्रवीत्सः ॥ २५ ॥

**बसव उवाच**—मनो ग्रसेदित्युदितं भवद्भिः कथं मनोग्रासचणं मनः स्यात् । गुरो यदि स्यात्परिहृत्य लौल्यं तन्निश्चलत्वं ग्रसनं

---

मन आशेला गुंतलें ह्मणजे अनेक प्रकारचीं दुःखें भोगावीं लागतात. तोच संसार होय. त्या संसारांत गुंतलेला मनुष्य वरचेवर ज्यास्त संकटांत पडतो. त्या आशेला ज्यानें जिंकिलें त्याचे दोष सर्व दूर झाले व त्याचें जन्ममरणही पण चुकलें असें समज. ॥२३॥ ही वस्तु माझी आहे, ही वस्तु माझी नव्हे अशा अनेक प्रकारच्या विकल्पांनीं ( कल्पनांनीं ) युक्त असणारा आपला संकल्प जोंपर्यंत मनुष्य पशुपणानें ( अज्ञानपणानें ) सोडूं शकत नाहीं, तोंपर्यंत त्याच्या दुःख, अज्ञान वगैरे मानसिक शत्रुसमुदायाच्या पीडांचा नाश होत नाहीं. बसवेश्वरा, त्या संकल्पाचा त्याग करणारा मनुष्य प्रत्यक्ष पशुपतिच ( शंकरच ) समजावा. ॥ २४ ॥ बसवेश्वरा, मन हें एक क्षणभर देखील एकेजागीं कधींही स्थिर होत नाहीं, नेहमीं अनेक प्रकारचे विचार करीत असतें. त्या विचारांची गणती देखील करितां येत नाहीं. हा त्या मनाचा अंगस्वभावच आहे आणि त्यामुळें सर्व संसारांतील कृत्यें होऊन त्यापासून सुखदुःखें वगैरे भोगावीं लागतात. ॥ २५ ॥ बसवेश्वरा, ज्या मनाच्या अनेक प्रकारच्या वासनांमुळें अंतरात्म्याचा भ्रांतिष्टपणा ज्यास्त ज्यास्त वाढत जातो, तें मन जो बुद्धिमान् मनुष्य जिंकून आपल्या स्वाधीन ठेवितो त्यालाच धन्य ( कृतकृत्य ) ह्मणावें.

बसवेश्वर ह्मणतो—॥ २६ ॥ आपण ज्या मनाचा ग्रास करावा ( जिंकावें ) ह्मणून सांगितलें तें मनच मनास जिंकण्यास कसें समर्थ होईल? ( कसें जिंकितां येईल ?) गुरुवर्या, मनाचा चंचलपणा नाहींसा करून तें निश्चल करणें ह्मालाच जर

तथास्तु ॥ २६ ॥ यद्यन्य एव ग्रसतीति चेतः स्वामिंस्तथा चेत्स किमेष जीवः । किमन्तरात्मा किमु वा परात्मा ममादिशेत्युक्त इदं स ऊचे ॥ २७ ॥

**प्रभुरुवाच**—आत्मान्तरात्मेति तथा परात्मेत्येको महेशः कथितो न चान्यः । आत्मा त्रयोऽन्तःकरणानुकारी स्वाध्यस्त तद्धर्मतया स जीवः ॥ २८ ॥ स एव निष्कृष्टतयान्तरात्मा शुद्धो मनोग्रासचणो यदा स्यात् । तदा परात्म्यैक्यमवाप्य पूर्णः स्वयं शिवानंदघनो विभाति ॥ २९ ॥ मनो न यावद्वशमेति तावद्यत्नेन तन्निग्रहणाय भाव्यं । मनो ग्रसामीति मनः प्रयत्नात्स्वयं ग्रसेत्तद्बसवार्य नूनं ॥ ३० ॥ मायामयैर्वृत्तिशतैर्मिलित्वा तत्साधकान्खेदयति ह्यवश्यं । अतस्तदाहृत्य वितुष्य धैर्याद्भमान्निवृत्तिर्ग्रसनं हि तस्य ॥३१॥ मनो ग्रसेद्यो महितप्रभावो विकारदूरः स हि साधुरूपः । वक्तुं न

---

ग्रसन ह्मणत असशील तर असो. ॥ २७ ॥ जर दुसरा कोणी मनास जिंकणारा असेल तर तो दुसरा कोण? तो जीव आहे? किंवा अंतरात्मा आहे? किंवा परमात्मा आहे? हें मला समजाऊन सांग असें बसवेश्वरानें विचारल्यावर अल्लमप्रभु सांगूं लागला.

अल्लमप्रभु ह्मणतो—॥ २८ ॥ जीवात्मा, अंतरात्मा आणि परमात्मा हे सर्व एक शंकरच आहे. दुसरा कोणी नाहीं; मन, बुद्धि, चित्त ह्या तिन्हींचें अनुकरण करणारा तो आत्मा होय. त्या मन, बुद्धि, चित्त यांचे गुणधर्म जो आपलेच आहेत असें समजतो तो जीव होय. ॥ २९ ॥ निष्कृष्टपणामुळें अंतरात्मा जीवपणा पावतो; अंतरात्मा शुद्ध होऊन जेव्हां मन निश्चल करण्यास समर्थ होतो, तेव्हां परमात्म्याशीं ऐक्य पावून परिपूर्ण होतो, व स्वतः शिवानंदस्वरूप होऊन शोभूं लागतो. ॥ ३० ॥ मन जोंपर्यंत वश झालें नाहीं तोंपर्यंत तें वश करण्याचा नेहमीं यत्न करावा. बसवेश्वरा, मीं मनाला निश्चळ करीन असा मनाचा निश्चय करून यत्न करूं लागलें ह्मणजे मन खचित निश्चल होतें. ॥ ३१ ॥ मायामय (अज्ञानमूलक) असे शेंकडो विकल्प मिळून ते साधकांस खचित दुःख देतात. ह्यास्तव धैर्यानें त्या मनाच्या सर्व विकल्पांस नाहींसें करून संतोषानें अज्ञानांतून दूर होणें हेंच त्या मनाचें ग्रसन जिंकणें होय. ॥ ३२ ॥ जो मनाचें ग्रसन करील, मन निश्चळ करील, तो मोठा सामर्थ्यवान् होय. त्याच्या सर्व पीडा दूर झाल्या, तो मूर्तिमन्त साधुस्वरूप आहे. त्याचें वर्णन करितां येत नाहीं.

शक्योऽयमिति प्रभूक्तिं श्रुत्वाऽब्रवीच्छन्नमनीषिवर्यः ॥ ३२ ॥

**छन्नबसव उवाच**—गुरो मनो नाशयितुं तदेतल्लक्ष्येण भाव्यं ननु साधकस्य । तादृग्विधं लक्ष्यमिहोपदिश्य कृतार्थयास्मान् प्रभुचक्रवर्तिन् ॥ ३३ ॥

**प्रभुरुवाच**—छन्नोक्तिमाकर्ण्य गुरुस्तमूचे प्रश्नस्त्वदीयो न हि सारभूतः । तथापि शाखाग्रशशीव लक्ष्यो बालप्रबोधार्थमुपाय एषः ॥ ३४ ॥ लक्ष्यप्रभेदा बहुधोपदिष्टाश्शास्त्रेषु योगागमशांभवेषु । यल्लक्ष्यतेऽन्तर्बहिरन्तरेषु तत्स्यात्प्रतीच्छायतयैव गौणं ॥ ३५ ॥ लक्ष्योक्तिभिर्लक्ष्यमिदं न लक्ष्यं लक्ष्यं हि निर्लक्ष्यतयैव लक्ष्यं ॥ सच्चित्सुखानंदघनैकलक्ष्यं मायां निरस्यात्मतयैव लक्ष्यं ॥ ३६ ॥ कटाक्षदृष्ट्याऽमृतसूक्तिसारैरन्वग्रहीच्छन्नघनं गुहेशः ॥ आरादयस्कान्तमणेरिवासौ सूचीपरत्या बसवो युवाऽऽसीत् ॥ ३७ ॥ अत्रान्तरे माचयदेवनाथः

---

असें अल्लमप्रभूचें बोलणें ऐकून तो विद्वान् चन्नबसवेश्वर बोलूं लागला.

चन्नबसवेश्वर ह्मणाला—॥ ३३ ॥ गुरुवर्या, मनाचा नाश होण्यासाठीं (निश्चळ होण्यासाठीं) साधकानें कांहीं तरी ध्यान धरिलें पाहिजे. तशा रीतीचें ध्यान सांगून आह्मांस कृतार्थ कर. तूं सर्व गुरूंचा सार्वभौम आहेस.

अल्लमप्रभू ह्मणाला—॥ ३४ ॥ चन्नबसवेश्वराचें बोलणें ऐकून अल्लमप्रभू त्यास ह्मणाला, अरे चन्नबसवा, तुझ्या प्रश्नांत कांहीं अर्थ नाहीं? तरी पण लहान मुलाला जसा झाडाच्या शेंड्यावर चंद्र आहे ह्मणून सांगतात त्याप्रमाणें चंचळ मन शांत करण्यास अज्ञान लोकांस ध्यान धरणें हा एक उपाय आहे, इतकेंच. ॥ ३५ ॥ योग आगम आणि शैवमत ह्यांत ध्यानाचे अनेक प्रकार सांगितले आहेत. जें आंत, बाहेर आणि आंत बाहेर ह्यांच्या मध्यें पूर्णपणें भरलेलें आहे तें ध्यान होय. तें एक निराळें आहे अशी कल्पना करून त्याचें ध्यान करणें हा गौण पक्ष आहे. ॥ ३६ ॥ ध्यान ह्मटलें तर ध्यान होत नाहीं ज्याचें ध्यान करितांच येत नाहीं तेंच ध्यान होय. मायेचा (अज्ञानाचा) नाश करून आत्मस्वरूपाच्या यथार्थ ज्ञानानें सच्चिदानंद सुखाचा पूर्णपणानें अनुभव घेणें हेंच ध्यान होय. ॥ ३७ ॥ असें ह्मणून त्यानें चन्नबसवेश्वराकडे दयार्द्रदृष्टीनें पाहिलें व त्या बरोबर प्रेमपूर्वक मधुर मधुर भाषण केलें. लोहचुंबकानें जसें आपल्या शक्तीनें लोखंडाचे सुईस आपलेकडे ओढून घ्यावें, त्याचप्रमाणें अल्लमानें तरुण चन्नबसवेश्वराचें मन आपल्याकडे ओढून घेतलें. ॥ ३८ ॥ इतक्यांत माचय

श्रीनाथपादाब्जयुगं प्रणम्य ॥ भक्त्या नतांगः सुविनीतवेषः प्रश्नं प्रचक्रे प्रतिबुद्धतत्वः ॥ ३८ ॥

**मणिवालमाचयदेव उवाच**—यत्तत्वं श्रुतिवागगोचरतमं यद्भावनादुर्लभं यद्ध्यानाविषयं यदंगरहितं यत्स्याद्दृश्यं दृशां ॥ तच्छून्यं परतत्वमीश्वर कथं बुध्वा महाभक्तितो नित्यत्वं लभते वदेत्यभिहितः प्रोचे गुरुर्माचयं ॥ ३९ ॥

**प्रभुरुवाच**—सत्यज्ञानसुखस्वरूपममलं पूर्णं परं ब्रह्म तत्सर्वत्रास्ति तथापि बाह्यकरणैर्बोद्धुं न शक्यं क्वचित् ॥ मायाजाड्यभरोऽस्ति यावदखिलो देहाभिमानो महांस्तावन्नास्ति कथैव वस्तुविषये दृश्यं हि नश्यं जगत् ॥ ४० ॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्तयस्त्रितनुषु प्रोतास्त्यवस्थास्सदा स्वात्मज्ञानविवर्जितं विदधते संभ्राम्य जीवं मुहुः ॥ दुःसंकल्पविकल्पजालविवशः संसारनिद्रां गतो नश्येत्सोऽयमतो

---

देव अल्लमाच्या चरणकमलास नमस्कार करून अल्लमाच्या बोलण्याचा भावार्थ त्यास समजला असल्यामुळें नम्रतेनें भक्तिभावानें नमस्कार करून अल्लमास विचारूं लागला.

॥३९॥ **मणिवालमाचय ह्मणाला**—जें श्रेष्ठ तत्व श्रुति आणि वाचा ह्यांस समजत नाहीं, ज्याची कल्पना देखील करितां येत नाहीं, ज्याला अंग नाहीं, जें दृष्टीला दिसत नाहीं, तें शून्यतत्व भक्तिमार्गानें जाणून नित्यपणा कसा प्राप्त होतो? तो मला सांग, असें ह्मटल्यावर अल्लमप्रभु माचयास ह्मणाला.

॥४०॥ अल्लमप्रभु ह्मणाला—तें तत्व सत्यस्वरूप आहे, ज्ञानस्वरूप आहे, सुखस्वरूप आहे, निष्पाप आहे, परिपूर्ण आहे, श्रेष्ठ आहे, ब्रह्मस्वरूप आहे, तें सर्व ठिकाणीं परिपूर्ण भरलेलें आहे. तरीपण तें बाह्येंद्रियानें (डोळ्यानें) दिसत नाहीं ज्ञानदृष्टीनेंच तें पाहिलें पाहिजे. जोंपर्यन्त मायेचें अज्ञान आहे, जोंपर्यन्त देहाचा मोठा अभिमान आहे, तोंपर्यंत त्या तत्वाचें नांवही काढावयास नको. तें तत्व यथार्थरीतीनें एकदां समजलें ह्मणजे जग आपोआप क्षणभंगुर दिसूं लागतें. ॥ ४१ ॥ जागृदवस्था, स्वप्नावस्था आणि गाढ सुषुप्त्यवस्था ह्या तिन्हीही अवस्था स्थूल सूक्ष्म आणि कारण ह्या तिन्ही शरीरांत भरलेल्या आहेत. त्या जीवाला वारंवार भ्रान्तींत पाडून त्याचें आत्मज्ञान नाहींसें करितात. मग वाईट वाईट तऱ्हेचे संकल्प आणि विकल्प ह्यांच्या जाळ्यांत सांपडून वश झालेला जीव संसाररूप झोंप घेऊं लागतो. ( संसारांत पडतो. ) ह्यास्तव इंद्रियनिग्रहवान् मनुष्यानें

जयेन्नियमवान्नादाववस्थात्रयं ॥ ४१ ॥ तुर्याह्वयेन सहजेन सदाधिरूढो यो नाशयेत्त्रयमिदं पशुतानिदानं ॥ सोऽयं महेश्वरतयात्मनि बोधपूर्णस्तत्वं प्रयाति परमात्मसुखानुभूत्या ॥ ४२ ॥ देहत्रयं स्वयमिति भ्रममुज्झिहानश्चिन्मात्र एव परिशिष्यति यः शिवार्थी ॥ वेदान्ततत्वमतिसूक्ष्मतमं विदित्वा नित्यत्वमेति स पुमानहमेव विद्वन् ॥४३॥ श्रुत्वा गुरूक्तमथ माचयदेवचित्तं तत्रैव कीलितमभूत्परमार्थतत्वे ॥ तद्वासनास्ति सकलाः परिहृत्य सत्यज्ञानात्मसौख्यमनुभूय समाहितं सत् ॥ ४४ ॥ चंद्रांशुसंघटितचांद्रशिलेव सांद्रस्वानंदसारसुखितं मणिवालचेतः ॥ विज्ञाय तत्र बसवादिगणास्समस्ता निःसंशयार्थमवदन्गुरुसार्वभौमं ॥ ४५ ॥

**बसवादिप्रमथगणा ऊचुः**—स्वामिन्मृषा तनुमनःकरणादि सर्वं यद्यात्मनो नहि घटादिव देव बाह्यं ॥ तर्ह्यस्य को नु परिहार-

---

प्रथम ह्या तिन्ही अवस्था जिंकाव्या. ॥ ४२ ॥ तुर्या नांवाची जी चवथी अवस्था आहे त्या अवस्थेच्या साह्यानें जो ज्ञानी मनुष्य अज्ञानपणा देण्यास कारण असणाऱ्या जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति ह्या तीन अवस्थांचा नाश करितो, तो मीच शिव आहें असें मानून आपल्या मनांत ज्ञानानें परिपूर्ण असतो. व परमात्मसुखाच्या अनुभवामुळें त्या श्रेष्ठ तत्वास जाऊन पोंचतो. ॥ ४३ ॥ हे विद्वाना मणिवाला, जो शिवसुखाची इच्छा करणारा मनुष्य स्थूल, सूक्ष्म व कारण हे देह ह्मणजे शुद्ध अज्ञान आहे असें समजून त्यांस टाकून देऊन चित्स्वरूपच होऊन राहतो, तो पुरुष समजण्यास कठिण असलेलें असें वेदान्ताचें तत्व जाणून नित्यपणा पावतो तो प्रत्यक्ष मीच आहें असें समज. ( तो माझ्यासारखा होतो. ) ॥ ४४ ॥ अल्लमप्रभूनें केलेला उपदेश ऐकून माचयार्याचें मन संसारांतील सर्व वासना वगैरे सोडून सत्यज्ञानात्मसुखाचा अनुभव घेऊन, शांति धरून, परमार्थतत्वांमध्यें मग्न झालें. ॥ ४५ ॥ चंद्राचें स्वच्छ चांदणें पडून चंद्रकांत मण्याचे शिलेला जसे पाझर फुटतात तसेंच अल्लमप्रभूच्या उपदेशानें मणिवालमाचयाचें मन आत्मज्ञानानंदानें परिपूर्ण झालेलें पाहून तेथील इतर सर्व प्रमथगण आपापल्या मनांतील सर्व संशय फेडून घेण्यासाठीं सर्व गुरूंचा मूर्तिमन्त चक्रवर्ती राजाच अशा अल्लमप्रभूस ह्मणूं लागले.

॥ ४६ ॥ बसवेश्वरादिक सर्व प्रमथगण ह्मणतात—गुरुवर्या अल्लमप्रभो, शरीर मन आणि इंद्रियें हीं जर खोटीं आहेत व घटासारखीं जर तीं बाह्य (स्पष्ट दिसणारीं)

विधौ प्रयत्नो व्यर्थो विदेहनिजमुक्तिकथाप्रसंगः ॥ ४६ ॥ यन्नास्ति बाह्यकरणादिकमेव सर्वं बध्येत तर्हि किमनेन पुमानसंगः ॥ बन्धो न चेत्कथममुष्य मुमुक्षुता स्याद्ब्रूहीति तैरभिहितः प्रभुराह भूयः ॥४७॥

**प्रभुरुवाच**—शृण्वन्तु भक्तनिवहा न हि युक्तिसाध्या माया दुरन्तपिशुना सदसद्विलक्षा ॥ सा कल्पयन्त्यविरतं ह्यसतोऽपि भावान्निःसंगमेव पुरुषं स्ववशं करोति ॥ ४८ ॥ तत्कार्यभूतमखिलं किल दृश्यजातं स्वापप्रपंचसदृशं नहि वस्तुतोऽस्ति ॥ यावत्प्रबोधमिदमस्तिवदेव भाति शुक्तौ यथैव रजतं तदिदं मृषात्वं ॥ ४९ ॥ तस्मादनादिजटिलभ्रमवारणाय भक्तिं महेश्वरपदांबुरुहे भजेत ॥ सोऽयं त्रिपात्प्रणवशृंगगतः परात्मा पादोऽस्य विश्वभुवनोदरभूतजातं

---

आहेत मग ह्या आत्म्याची त्या शरीर, मन आणि इंद्रियें ह्यांच्यापासून सुटका करण्याचा प्रयत्न करणें व्यर्थ आहे. व विदेहमुक्ति आणि सजीवमुक्ति ह्यांच्या गोष्टी देखील व्यर्थ आहेत. ॥ ४७ ॥ हीं दिसणारीं इंद्रियें वगैरे सर्व कांहीं जर नाहींतच तर ह्यामुळें निःसंग असा परमेश्वर कसा बद्ध होईल? बंधच जर नसेल तर त्याला मुमुक्षुता ( मुक्त होण्याची इच्छा ) तरी कशी होईल? असें त्यांनीं ह्मटल्यावर अल्लमप्रभु त्यांस पुन्हा बोलूं लागला.

॥ ४८ ॥ अल्लमप्रभु ह्मणतो—भक्तांनों ऐका. माया ही विचारानें समजण्यासारखी नाहीं. प्राणिमात्रांची तिच्यामुळें वाईट स्थिति होते, ती सत् ( खरें ) असत् ( खोटें ) ह्याहून विलक्षण आहे. ती माया नेहमीं वाईट वाईट विचार सुचवून परमेश्वर स्वतः निःसंग आहे तरी त्यास आपल्या नादीं लावून वश करिते. ॥४९॥ जशा स्वप्नावस्थेमध्यें दिसणाऱ्या कोणत्याही वस्तु खऱ्या नाहींत, त्याप्रमाणेंच तिच्या संबंधानें उत्पन्न झालेलें जग जरी प्रत्यक्ष दिसत असलें तरी तें खरें नाहीं, जोंपर्यंत शिंप आहे ह्मणून पुरतेपणीं समजलें नाहीं तोंपर्यंत तें रुपें आहे असा संशय येतो; तसेंच जोंपर्यंत आत्मज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत मायेचा सर्व पसारा खोटा असूनही तो खरा आहे असें वाटूं लागतें.

॥५०॥ ह्यासाठीं भक्त हो, अनादिकालापासून चालत आलेल्या मायेच्या भ्रमाचा समूळ नाश होण्यासाठीं तुह्मी शिवचरणांची मनापासून भक्ति करा, तो परमेश्वर तीन पाद असणाऱ्या ॐकाराच्या शृंगावर गेला असून ज्यामध्यें अनेक प्राणिमात्र राहतात तें त्रैलोक्य त्या परमेश्वराचा पाय आहे.

॥ ५० ॥ आहो वसंतमिव चंदनमंदवाताः सर्वे गणा बसवमंत्रिणमाश्रयन्तः ॥ सुज्ञानयोगवशगाः स्वयमर्थयन्ते लिंगैक्यमेव न पदांतरमंतरंगे ॥ ५१ ॥ वाग्ब्रह्मवादचतुरान्न जहाति माया नाद्वैतसिद्धिरभवस्य कृपां विनास्ति ॥ भक्तिं विना परशिवो न दयां करोति चित्तस्य निश्चलतया न विनास्ति भक्तिः ॥ ५२ ॥ तस्मात्प्रसह्य सहसा विजयेत रागद्वेषौ स्थिरा भवति धीस्तत एव भक्तिः ॥ तां सुस्थिरां कलयितुं न भजेद्विकल्पसंकल्पजालमणिवास्थितधीर्मुनींद्राः ॥ ५३ ॥ नान्तर्भावं नामरूपक्रियाणां लिंपेल्लुंपेत्तामहंतां दुरन्तां ॥ इत्थं देहप्राणचित्तादिधर्मांस्त्यक्त्वा मोहांभोधिमत्येति विद्वान् ॥ ५४ ॥ आस्तां तावद्बसव भवता लोकरक्षार्थमेव प्रश्नव्याजात्प्रकटितमभूद्वेदसिद्धान्ततत्वं ॥ त्वं सर्वज्ञस्त्रिभुवनगुरुस्त्वत्समो नास्ति लोके लिंगैक्य-

---

॥ ५१ ॥ काय आश्चर्य आहे! चंदनवृक्षावरून वाहाणारे मंद मंद वारे जसा वसंतऋतूचा आश्रय करितात, त्याचप्रमाणें हे प्रमथगण बसवेश्वर प्रधानाचा आश्रय करून सुज्ञानसंपन्न झालेले आहेत. व स्वतः आपणास लिंगैक्य व्हावें असें इच्छितात. दुसऱ्या कोणत्याही पदाची ( सुखाची ) इच्छा करीत नाहीं. ॥ ५२ ॥ तोंडानें पोकळ ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगणाऱ्यांस माया सुटत नाहीं. शंकराच्या कृपेवांचून अद्वैतसिद्धि होत नाहीं. भक्ति केल्याशिवाय तो श्रेष्ठ शंकर दया करीत नाहीं. आणि मन निश्चल झाल्याखेरीज भक्ति होत नाहीं. ॥ ५३ ॥ ह्यास्तव हरएक प्रकारच्या प्रयत्नानें राग आणि द्वेष यांस जिंकावें त्यामुळें भक्ति स्थिर होते. मुनीश्वरांनीं ती भक्ति निश्चळ होण्यासाठीं संकल्प आणि विकल्प सर्व सोडून दिले पाहिजेत. ॥ ५४ ॥ नाम, रूप आणि क्रिया ह्यांचा मनामध्यें गर्व करूं नये. शेवटीं दुर्गतीस नेऊन पोंचविणारा अभिमान सोडून द्यावा. ह्याप्रमाणें शरीर, प्राण, मन इत्यादिकांपासून होणारे अनेक प्रकारचे विकार आहेत ते सर्व सोडून दिल्यावर विद्वान् मनुष्य मोहरूप समुद्र तरून जातो. ॥ ५५ ॥ हें असो. बसवेश्वरा, तूं लोकांचा उपयोग होण्यासाठीं ( रक्षण होण्यासाठीं ) प्रश्नाच्या रूपानें वेद आणि सिद्धान्तशास्त्र यांतील रहस्य प्रकट केलेंस. तूं सर्वज्ञ आहेस, तूं सर्व त्रैलोक्याचा गुरु आहेस. लिंगैक्य आणि सामरस्य ह्यांचें ज्ञान आणि त्यावरील विश्वास ह्यामुळें तूं सर्व जगाचा हितकर्ता आहेस. ( सर्व लोकांस तूं लिंगैक्याची आणि सामरस्याची माहिती करून देतोस. ) तुझी बरोबरी करणारा जगांत

**श्रीसमरसकलानिष्ठया विश्वबंधो ॥ ५५ ॥ बसव भवदीयपरमार्थशिवनिष्ठामसदृशतया क इह वर्णयितुमीष्टे ॥ वसति सकलं त्वयि चिदात्मनि महात्मन् लससि गुणवानिव गुणैरनभिभूतः ॥ ५६ ॥ इत्यल्लमप्रभुगुरोर्वचनं निशम्य तत्पादपद्मयुगुलं शिरसा प्रणम्य ॥ भक्त्या कृतांजलिपुटः पुनराह देवं किंचिद्विनम्रवदनो बसवाधिनाथः ॥ ५७ ॥ किंचिज्ज्ञेऽस्मिन्नवगुणगणे श्रैष्ठ्यमारोप्य किंवा संसाराब्धौ पुनरपि महामोहगर्ते निपात्य ॥ यातायातं परिकलयितुं श्रीगुरो नैव युक्तं सम्यग्दृष्ट्या समरसय मां साधु तत्वोपदेशात् ॥ ५८ ॥ यन्नारिकेलमिह खण्डितुमप्यशक्यं दन्तैस्तदेव गिलितुं द्विरदेन जीर्णं ॥ तद्वत्त्वमेव कवलीकृतसर्वतत्वो देहीव सन्नपि विदेहतया विभासि ॥ ५९ ॥ सर्वे वयं हि पशवस्तव पाशबद्धा देवो भवान्पशुपतिः पुरुषः पुराणः ॥ जीवो भवत्करुणयैव महेश्वरत्वं प्राप्नोति सद्गुरुवरेत्युदितो-**

---

दुसरा कोणी नाही. ॥ ५६ ॥ बसवेश्वरा, तुझी शिवावरील निष्ठा खरोखर असाधारण आहे, ती कोणाच्यानें वर्णन करवेल? तूं स्वतः चित्स्वरूप असल्यामुळें तुझ्यामध्यें सर्व कांहीं राहत आहे. तूं महात्मा आहेस, तूं गुणवान् आहेस, तुझे गुण अलौकिक आहेत. (तुझ्यामुळें गुणांस शोभा आली अशी वास्तविक स्थिति आहे; गुणांमुळें तुला शोभा आली असें नव्हे.) ॥ ५७ ॥ ह्याप्रमाणें अल्लमप्रभूचें बोलणें ऐकून बसवेश्वरानें त्याच्या पदकमलावर आपलें मस्तक ठेवून नमस्कार केला व भक्तिपूर्वक हात जोडून नम्रतेनें किंचित डोकें लववून तो ह्मणाला. ॥ ५८ ॥ महाराज, मी अल्पज्ञानी आहें (अज्ञान आहें) माझ्यासारखा दुर्गुणी दुसरा कोणी नाहीं अशा मला नसतें महत्व देऊन पुन्हां महामोहरूपी (अज्ञानरूप) भोंवरे असणाऱ्या संसारसमुद्रांत लोटून देऊन जन्ममरणांची यातना भोगण्यास लावणें तुला योग्य नाहीं, मजवर कृपादृष्टि करून मला चांगल्या रीतीनें तत्वज्ञानाचा उपदेश करून सामरस्यसुखाचा अनुभव घेण्यास लावा. ॥ ५९ ॥ नारळ फोडतां देखील येत नाहीं. तोच नारळ हत्तीनें आपल्या दांतांनीं फोडला ह्मणजे सहज गिळतां देखील येतो. त्याप्रमाणेंच तुला सर्व तत्वांची माहिती असून तूं देहधारी असल्याप्रमाणें दिसतोस तरी विदेह असा आहेस. ॥ ६० ॥ आह्मी हे सर्व लोक पशु असून तुझ्या पाशानें बांधलों गेलों आहों, तूं पशुपति आहेस, तूं पुराणपुरुष आहेस. तुझ्याच कृपेनें जीव महेश्वरपणा पावतो, तूं सर्व गुरूंमध्यें श्रेष्ठ गुरु आहेस असें बसवे-

ऽब्रवीत्सः ॥ ६० ॥

**प्रभुरुवाच**—अध्यात्मविद्यामूर्तिस्त्वमधिकारीव वर्तसे ॥ संप्रदायप्रकाशार्थं लोके श्रीगुरुशिष्ययोः ॥ ६१ ॥ विधिवत्कथिता विद्या ह्यद्या वेदान्तसम्मता ॥ खचितास्तु सदा स्वान्ते शान्ते बसव तावके ॥ ६२ ॥ तुष्यत्यात्मा ममात्यन्तं तवांतिकगतो यतः ॥ न स्तोत्रपरिपाटीयं मर्म जानामि यत्तव ॥ ६३ ॥ पंचाक्षरीमनननिर्जितपंचभूततत्तद्गुणप्रकरसंचितपंचकोशाः ॥ त्वामाश्रयन्ति सततं शरणाः शरण्यं मौलिर्भवान्हि शशिमौलिमहागणानां ॥ ६४ ॥ त्वद्भावनैव बसवार्य गुरुं करोति लिंगं करोति च तथा तव भावनैव ॥ सा जंगमं च कुरुते शपथं करोमि त्वय्येव नूनमभवस्य भवान् हि मूर्तिः ॥ ६५ ॥ अक्केव सा तव मनःस्मृतिरात्मनीना स च्छन्नवीरबसवो मणिवालनाथः ॥ ज्ञप्तिः स भाचरसुधीः प्रथितो विवेकः शीलं तथार्पणमुनिस्तव किन्न-

श्वराचें बोलणें ऐकून अल्लमप्रभु बोलूं लागला.

॥ ६१ ॥ अल्लमप्रभु ह्मणतो—बसवेश्वरा, तूं प्रत्यक्ष अध्यात्मविद्येची (शिवतत्वविद्येची) मूर्ति आहेस, तूं जगामध्यें श्रीगुरु आणि शिष्य ह्यांचा संप्रदाय दाखवून देण्यासाठीं अवतार घेतलेल्या अधिकाऱ्यासारखा वागतोस. ॥ ६२ ॥ बसवेश्वरा, मीं तुला यथाविधीनें विद्या शिकविली आहे, ही विद्या सर्व वेदांतशास्त्रास मान्य असून तुझ्या शांत असणाऱ्या मनांत ती नेहमीं खिळून गेली आहे, (दृढ झालेली आहे.) ॥ ६३ ॥ तुझ्याजवळ आल्यामुळें माझ्या मनाला मोठें सुख वाटतें, मीं तुझी प्रशंसा केली ती खोटी नाहीं. कां तर, मला तुझें मनोगत समजलेलें आहे. ॥ ६४ ॥ शिवपंचाक्षरी मंत्राचा "नमः शिवाय" ह्या मंत्राचा नेहमीं पाठ केल्यामुळें पंचभूतात्मक शरीर, त्याचे गुणधर्म त्याच्या समुदायांत असणारे पांच कोश ज्यांनीं जिंकले आहेत असे हे सर्व स्वधर्मसंपन्न प्रमथगण तुझ्या संमतीनें वागतात, तूं शरणागतांचें रक्षण करणारा आहेस शंकराच्या प्रमथगणांत तूं मुख्य आहेस. ॥ ६५ ॥ हे बसवेश्वरा, तुझ्या ध्यानामुळेंच ध्यान करणारा प्राणी गुरु होतो, लिंगस्वरूप पावतो व जंगमही होतो गुरु लिंग जंगम तुझ्या स्वरूपांत लीन आहेत (प्रत्यक्ष तूंच गुरु लिंग जंगम आहेस,) हें मी शपथपूर्वक सांगतों. तूं प्रत्यक्ष शंकराचेंच स्वरूप आहेस. ॥ ६६ ॥ ती महादेवी अक्काही तुझें स्वतःचें मन होय. (महादेवीसारखें तुझें मन शुद्ध आहे) हा चनवीरबसव तुझी स्मरणशक्ति असून हा मणिवाल-

रांगं ॥ ६६ ॥ मूर्तिः समस्तशिवभक्तगणात्मनिष्ठा चैतन्यमेव हि भवान्बसवार्य नूनं। शक्नोति को नु भवदीयमहाप्रभावं स्तोतुं भुवीत्यभिहितो बसवोऽब्रवीत्तं ॥ ६७ ॥

**बसव उवाच**—प्रभोऽल्लम भवत्पदांबुरुहसेवनामात्रतो भवत्करुणयैव संप्रति कृतार्थतामाश्रये ॥ वृथा भवति किं भवद्वचनमागमान्ताधिकं परंतु शरणार्थ्यहं कमपि देव याचे वरं ॥ ६८ ॥ जगत्यखिलभक्तसंततिमिमां कटाक्षश्रियाऽनुगृह्य शुभदीक्षया परमशंभुजीवैक्यतः ॥ जनुर्मृतिपरंपरां परमपोह्य रक्ष प्रभो प्रसीद परमेश्वरेत्यभिहितोऽभ्यधात्तं गुरुः ॥ ६९ ॥

**प्रभुरुवाच**—बसव तथास्तु तावक महाप्रतिभाविभवैर्विहितशुभोदयाञ्छिवगणान्सुगुणानुगुणान् ॥ विमलशिवैक्यतत्वमुपदिश्य कृतार्थयतो मम हि भवेत्प्रयत्न इव हेमसुगंधिकृतः ॥ ७० ॥

---

नाथ तुझी ज्ञप्ति ( आत्मज्ञान ) आहे, हा भाचर नांवाचा प्रमथ तुझा मूर्तिमन्त विचार आहे हठपदार्पण मुनि तुझा स्वभाव आहे व हा किन्नर तुझें आंग आहे. ॥ ६७ ॥ सर्व शिवभक्तांच्या समुदायाची निष्ठा हें शरीर असून बसवेश्वरा, तूं त्या शरीरांतील आत्मा आहेस, तुझें अलौकिक सामर्थ्य पृथ्वीवर कोणाच्यानें वर्णन करवेल? असें अल्लमानें ह्मटल्यावर बसवेश्वर ह्मणाला.

॥ ६८ ॥ बसवेश्वर ह्मणतो—प्रभो अल्लमा, तुझ्या चरणकमलांच्या सेवनानेंच व तुझ्या कृपेनेंच आतां मी कृतकृत्य झालों. तुझें बोलणें खोटें कसें होईल? तें सर्व आगमापेक्षां श्रेष्ठ आहे हें खरें, परंतु ईश्वरा, मी तुला शरण आलों आहें, तुला मी कांहीं वर मागतों. ॥ ६९ ॥ जगामध्यें ह्या सर्व भक्तमंडळींस कृपाकटाक्षानें अनुग्रह करून उत्तम तऱ्हेची शिवदीक्षा द्या, आणि जीव आणि शिव ह्यांचें ऐक्य करून ह्या सर्वांचें जन्ममरण चुकवा, ह्यांचें रक्षण करा, परमेश्वरा, आह्मांवर प्रसन्न व्हा असें बसवेश्वरानें ह्मटल्यावर अल्लमप्रभु ह्मणाला.

॥ ७० ॥ अल्लमप्रभु ह्मणतो—बसवेश्वरा, तूं ह्मणतोस तें मला मान्य आहे, तुझ्या मोठ्या बुद्धिसामर्थ्यांनीं ज्यांचे शेवट चांगले झाले आहेत ( जे सन्मार्गास लागले आहेत ) अशा सद्गुणी शिवगणांस ( प्रमथगणांस ) निष्पाप अशा शिवतत्वाचा उपदेश करून मी कृतार्थ करूं लागलों तर माझा प्रयत्न उत्तम सोन्याचे उत्तम अलंकार करण्याच्या कामांत चतुरता दाखविण्यासारखे सार्थकतेसच

**स्वप्ने दुःखानुभूत्या विकलितमनसः सौख्यदायी प्रबोधो यद्वत्तद्वत्प्रपंचप्रकटितजडधीवासनासंवृतानां ॥ बोधान्निर्वाणमार्गो भवतु करुणयेत्यादिशंस्तांश्च सर्वांश्चक्रेऽन्तेवासिनः श्रीगुरुरथ बसवप्रार्थितोनुग्रहार्थं ॥ ७१ ॥ यस्य यस्य हृदये यथा यथा रोचते तदनुसारतः क्रमात् ॥ साधु तत्तदधिकारमामृशन् बोधयन्नुपदिदेश सद्गुरुः ॥ ७२ ॥ देहचित्तधनमोहसंगतिं त्याजयन्विमलभक्तिबोधयोः ॥ स्थापयन्नतनुतांगलिंगयोः सद्विवेकपरमोपदेशनं ॥ ७३ ॥ लिंगैक्यलीनहृदयान्सदयं चकार भक्तव्रजांस्त्वमहमित्यपसार्य भेदं ॥ ब्रह्माद्वयं श्रुतिशतैरनुभावयित्वा साक्षाच्चकार हृदि वेधवशात्परोक्षं ॥ ७४ ॥ ज्ञानादिरूपघटितत्रिपुटीनिरासे द्रष्टुं च वक्तुमवलोकितुमप्यशक्यं ॥ यत्पूर्णनिर्मलनिरन्तरनित्यसत्यं तद्ब्रह्मतत्वमनुभावयति स्म तांस्तान् ॥ ७५ ॥ निर्मायिके निरुपमे परमे पदेऽस्मिन्स्वामी न्यधापयदमुं बसवाधिनाथं ॥**

---

पावतील व्यर्थ जाणार नाहींत. ॥ ७१ ॥ एखाद्या मनुष्यास भयंकर स्वप्न पडून त्या दुःखानें तो व्याकुळ झाला असतां एकदम जागें झाल्याबरोबर त्याचे मनास जसें सुख होतें त्याचप्रमाणें प्रपंचांतील अनेक प्रकारच्या अज्ञानाच्या समजुतींत गुंतून गेलेल्या संसारी जीवांस शिवतत्वाचा बोध झाल्यावर मोक्षमार्ग सुखकारक वाटूं लागेल. असें प्रेमपूर्वक सांगून मग बसवेश्वरानें विनंति केलेल्या अल्लमप्रभूनें सर्व भक्तमंडळींस आपले शिष्य केले. ॥ ७२ ॥ ज्याच्या ज्याच्या मनाला जसें जसें आवडलें तसा तसा वरचेवर त्याचा अधिकार पाहून अल्लमप्रभूनें त्यांस उपदेश केला. ॥ ७३ ॥ त्या भक्तलोकांचें शरीर, मन, धन ह्यांवरील ममत्व सर्व काढून टाकिलें. आणि निष्पाप भक्तीचा बोध केला, लिंगैक्याच्या विचाराचा पूर्ण बोध करून त्यांस चांगल्या विचाराचा उपदेश केला. ॥ ७४ ॥ त्या अल्लमप्रभूनें त्या सर्व प्रमथगणांवर कृपा करून त्यांचीं मनें लिंगैक्यामध्यें तल्लीन करून सोडिलीं. त्या भक्तमंडळीच्या मनांतील मीतूंपणाचा निराळेपणा नाहींसा केला. शेंकडो श्रुतींतील आधार दाखवून अद्वयब्रह्माचा त्यांस अनुभव आणून दिला व त्यांच्या मनांत परोक्षज्ञान प्रत्यक्ष करून दाखविलें. ॥ ७५ ॥ ज्ञानादिक रूपापासून बनलेल्या त्रिपुटीचा ( ज्ञान ज्ञातृ ज्ञेय वगैरे त्रिपुटीचा ) भ्रम दूर केल्यावर पाहतां येत नाहीं व सांगतां येत नाहीं अशा रीतीचें परिपूर्ण, निर्मळ, निरंतर, नित्य, सत्य तें ब्रह्मतत्व त्या त्या भक्तमंडळीच्या प्रत्यास आणून दिलें. ॥ ७६ ॥ ज्याला ममता ( कपट ) नाहीं अशा निर्मायिक

**तस्मिन्क्षणे शिवगणाः सहजानुभूत्या लिंगैक्यसौख्यमभजन् प्रभुसत्कटाक्षात् ॥ ७६ ॥ वृक्षस्य मूलजलसेचनतो विवृद्धिं शाखाः प्रयान्ति हि यथा वसवेंद्रमूलात् ॥ तद्वद्गणाः प्रभुकृपामवलंब्य तूर्णं पूर्णं समाधिमभजन्परतत्वनिष्ठाः ॥ ७७ ॥ नानाविधा बहुलवर्णभृतोऽन्तरिक्षे नीरंध्रमेघनिवहाः पवमानवेगात् ॥ यद्वत्प्रयान्ति हृदयेषु तथैव माया देवोपदेशविभवाद्विलयं प्रयाता ॥ ७८ ॥ भंडारिवीरबसवाधिपमाचयार्यनागाम्बिकाहठपदार्पणकिन्नरार्याः ॥ छन्नादयः शिवगणास्समवाप्य जीवन्मुक्तिं प्रभोः करुणया न्यवसन्सुखेन ॥ ७९ ॥ इति सकलमुनीन्द्रा मोक्षलक्ष्मीविलासप्रकरणमुदितं वः श्रीगुरोः सच्चरित्रं॥**

---

( निष्कपट ) अतिशय उत्तम अशा त्या श्रेष्ठपदावर ( पूर्ण चिद्रूपानंदांत ) अल्लमानें बसवेश्वरास नेऊन पोंचविलें. त्यावेळीं सर्व प्रमथ गण अल्लमप्रभूच्या कृपादृष्टीमुळें सहज प्राप्त झालेल्या अनुभवामुळें लिंगैक्यसुखाचा अनुभव घेऊं लागले. ॥ ७७ ॥ जसें झाडाच्या मुळाला पाणी घातलें ह्मणजे त्याच्या फांद्या पुष्ट होत जातात त्याप्रमाणें बसवेश्वर ह्याच वृक्षमूलाला अल्लमप्रभुकृपारूपी जलाचा वर्षाव झाल्यामुळें ते सर्व प्रमथगणरूप शाखा पुष्ट होऊन अल्लमप्रभूच्या कृपेच्या आश्रयानें श्रेष्ठ तत्वावर विश्वास ठेवून पूर्ण समाधीचा ( समाधिसुखाचा ) अनुभव घेऊं लागले. ॥ ७८ ॥ जसा वारा सुटला ह्मणजे त्याच्या झपाट्यानें आकाशांत दाट जमलेले अनेक रंगांचे ढग दूर जाऊन नाहींसे होतात तसेच अल्लम देवाच्या उपदेशाच्या सामर्थ्यानें भक्त लोकांच्या मनांतील माया ( अज्ञान ) नाश पावलें; ( ते प्रमथगण ज्ञानवान् झाले. ) ॥ ७९ ॥ भांडारी ( कोशाध्यक्ष ) बसवेश्वर, माचयार्य, नागांबिका, हठपदार्पण, किन्नरार्य, चनबसवेश्वर वगैरे शिवगण जीवन्मुक्ति पाऊन अल्लमप्रभूच्या कृपेनें सुखानें राहूं लागले. ॥ ८० ॥ मुनीश्वरांनो, तुह्मां सर्वांस ह्याप्रमाणें मोक्षलक्ष्मीच्या विलासाचें प्रकरणच असें अल्लमप्रभूचें चरित्र सांगितलें, ( अल्लमाचें चरित्र ऐकिल्यानें मोक्षप्राप्ति होते ) जो निष्पाप मनाचा पुरुष हें चरित्र भक्ति-

पठति परमभक्त्या शुद्धचित्तः पुमान्यः प्रभुरधिकममुष्मै वांछिता-
र्थान् ददाति ॥ ८०

इत्यार्षश्रीभविष्यत्पुराणकथाविशालायां प्रमथगणवचनानुकूलायां कलिकल्मषनिमग्नजनसमुद्धरणशीलायां प्रभुलिंगलीलायां मनोलयोपदेशगतिर्नाम चतुर्विंशोऽध्यायः ॥

---

पूर्वक पठन करील (वाचील) त्याच्या इच्छेपेक्षां ज्यास्त सुख अल्लम प्रभु त्याला देईल.

ह्याप्रमाणें ऋषीश्वरांनीं भविष्यत्पुराणांत कथेच्या रूपानें सविस्तर रीतीनें सांगितलेल्या, प्रमथगणांचे वचनांस अनुकूल असणाऱ्या प्रभुलिंगलीलेंतील मनाचा समाधींत लय होणें नांवाचें वर्णन असलेला हा चोविसावा अध्याय संपला.



# अथ पंचविंशोऽध्यायः ॥

श्रीनंदिकेश्वराय नमः ॥

**सूत उवाच** ॥ श्रीसिद्धवीरेश्वरपादसेवानिष्ठाः शिवज्ञानरता मुनीन्द्राः ॥ अज्ञानदूरा हरभक्तिसान्द्राः शृण्वन्तु लीलां प्रभुलिंगमूर्तेः ॥ १ ॥ इत्थं भक्तगणान्सर्वान्प्रभुर्लिंगैक्यनिष्ठया ॥ कृतार्थीकृत्य तैस्साकं कंचित्कालं निनाय सः ॥ २ ॥ ततः कल्याणनगराद्विनिष्क्रम्य महागुरुः ॥ भक्तानुग्रहणार्थाय चचार पृथिवीमिमां ॥ ३ ॥ सर्वेभ्यो भक्तसंघेभ्यो लिंगैक्यानुग्रहात्प्रभुः ॥ निवर्त्य मायां दुर्ज्ञेयां ददौ मोक्षं कटाक्षतः ॥ ४ ॥ सद्भक्तमानसोदंचत्कमलाकरसंततौ ॥ हंसो बभूव भगवानल्लमप्रभुवल्लभः ॥ ५ ॥ तत्र कैलासशैलेंद्रे श्रीमानिंदुकलाधरः ॥ वृत्तान्तमखिलं तस्यै महादेव्यै न्यवेदयत् ॥ ६ ॥ श्रुत्वा प्रभुकथावृत्तमशेषं शेषभूषणात् ॥ देवी प्रमुदितस्वान्ता तमेनं

---

सूत ह्मणतात—॥ १ ॥ मुनीश्वरांनो, तुह्मां सर्वजणांस श्रीसिद्ध वीरगुरूच्या चरणसेवेची आवड आहे, तुह्मी शिवज्ञानांत प्रवीण आहां, तुह्मी ज्ञानी आहां, शिवभक्तींत निमग्न आहां, तुह्मांस मी प्रभुलिंगमूर्तीची लीला सांगतों, सावधपणानें ऐका. ॥ २ ॥ मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें अल्लमप्रभु सर्व भक्तमंडळींस लिंगैक्याच्या श्रद्धेनें कृतार्थ करून त्यांच्या सहवासांतच कितीएक दिवसपर्यंत तेथें राहिला. ॥ ३ ॥ नंतर तो गुरुश्रेष्ठ कल्याणनगरांतून निघून भक्तलोकांवर कृपा करण्यासाठीं ह्या पृथ्वीवर हिंडूं लागला. ॥ ४ ॥ अल्लमानें सर्व भक्तलोकांच्या समुदायावर लिंगैक्याची कृपा करून, कळण्यास कठीण अशी त्यांची माया ( अज्ञान ) दूर करून व त्यांवर कृपादृष्टी करून त्यांस मोक्षप्राप्ति करून दिली. ॥ ५ ॥ मानससरोवरांतील कमलांच्या समुदायांवर जसे हंस पक्षी बसतात त्याचप्रमाणें उत्तम उत्तम भक्तांचीं मानसें ( मनें ) हींच. आत्मज्ञानामुळें आनंदित झालेलीं कमलांची पंक्ति त्या पंक्तीवर अल्लप्रभु श्रेष्ठ हंस झाला; ( हंसासारखा शोभूं लागला. ) ( भक्त लोक नेहमीं अल्लमाचें ध्यान करूं लागले ) ॥ ६ ॥ असो, इकडे कैलासपर्वतावर तो श्रीमान् चंद्रशेखर ( शंकर ) अंतर्ज्ञानानें पृथ्वीवरील अल्लमप्रभूचें सर्व चरित्र जाणून महादेवीला ( पार्वतीला ) सांगूं लागला. ॥ ७ ॥ अल्लमप्रभूचें पृथ्वीवर घडलेलें सर्व चरित्र शेषाचें ( नागाचें ) भूषण असणाऱ्या शंकरापासून समजतांच पार्वतीच्या मनास मोठा

**पर्यपृच्छत ॥ ७ ॥ प्राणनाथ तवादेशात्सा कला सात्विकी मम ॥ तावकं शुद्धचैतन्यमनुसंप्रेषिता मया ॥ ८ ॥ तद्वृत्तं मम न ज्ञातं सम्यगाज्ञापय प्रभो ॥ इति संप्रार्थितस्तस्यै कथयामास शंकरः ॥ ९ ॥ आकर्णय सरोजाक्षि तावकी सात्विकी कला ॥ अक्का महादेव्यभवत्प्रभावार्पितमानसा ॥ १० ॥ प्रभुस्तु शुद्धचैतन्यं ममात्मा मूलकारणं ॥ समभूल्लोकरक्षार्थमल्लमो नाम योगिराट् ॥ ११ ॥ तदनुग्रहसंप्राप्तलिंगैक्यज्ञाननिर्वृता ॥ अक्का महादेव्यगमच्छ्रीगिरिं योगिसंश्रितं ॥ १२ ॥ येंऽशाः प्रमथनाथानां ते च्छन्नबसवादयः ॥ अवतीर्णाः प्रभौ दत्तचित्तास्ते पृथिवीतले ॥ १३ ॥ तत्तद्वंशेषु संभूतास्ते ते प्रमथनायकाः ॥ प्रभूपदिष्टलिंगैक्या बभूवुर्मोक्षकांक्षिणः ॥ १४ ॥ तत्तत्कायिकसंप्राप्तधनैर्गुरुचरेश्वरान् ॥ समर्चयन्तः सततं जीवन्मुक्तिमवाप्नुवन् ॥ १५ ॥ द्वितीयशंभुः सर्वज्ञः श्रीनंदीशोऽसदाज्ञया ॥ महां**

---

संतोष होऊन ती शंकरास विचारूं लागली. ॥ ८ ॥ प्राणनाथ, तुमच्या आज्ञेप्रमाणें मीं आपली सात्विककला तुझ्या शुद्ध चैतन्यरूप अल्लमप्रभूकडे पृथ्वीवर पाठविली आहे. ॥ ९ ॥ तिची अलीकडे मला कांहींच हकीकत समजली नाहीं, परमेश्वरा, तूं मला चांगल्या रीतीनें समजावून सांग. अशी तिची विनंति ऐकून शंकर तिला सांगूं लागले. ॥ १० ॥ कमलनेत्रे ( पार्वति ), मी तुला तिची हकीकत सांगतों. ऐक. तुझी ती सात्विकीकला महादेवी अक्का नांवानें पृथ्वीवर जन्मली व तिनें आपलें मन अल्लमप्रभूस अर्पण केलें. ॥ ११ ॥ तो अल्लमप्रभु शुद्ध चैतन्यस्वरूप आहे, माझा आत्मा आहे व सर्व चराचर जगाचा मूल कारण आहे, लोकांचें रक्षण करण्यासाठीं तो योगीश्वर पृथ्वीवर अवतरला आहे. ॥ १२ ॥ त्या अल्लमाच्या कृपेनें तिला लिंगैक्याचें यथार्थ ज्ञान झालें, व त्यामुळें तिला अतिशय सुख होऊन ती महादेवी अक्का ज्यावर अनेक योगीश्वर लोक योगसाधन करितात त्या श्रीगिरिपर्वतावर गेली. ॥ १३ ॥ प्रमथ नावांचे जे जे अंश मनुष्यरूपानें पृथ्वीवर जन्मले ते चनबसवेश्वर वगैरे नांवानें प्रसिद्ध आहेत. त्या सर्वांचें मन अल्लमप्रभूच्या भक्तीकडे आहे. ॥ १४ ॥ त्यांच्या त्यांच्या कुलांत ते ते प्रमथगण जन्मले आहेत, अल्लमप्रभूनें त्यांस लिंगैक्याचा उपदेश केला आहे व ते सर्वजण मोक्षप्राप्तीची इच्छा करीत आहेत. ॥ १५ ॥ ते लोक आपलें शरीर झिजवून स्वकष्टानें व खरेपणानें मिळालेल्या पैशांनीं गुरूंची जंगमांची लिंगाची पूजा नेहमीं करितात, व जीवन्मुक्ति स्थितीला ते पावले आहेत.

**मद्भक्तिमुद्धर्तुं मादाम्बानंदनोऽभवत् ॥ १६ ॥ मादनाराध्यपुत्रोऽसौ बसवाख्यो महामतिः ॥ कल्याणनगराधीशमंत्रिसाम्राज्यमाप्तवान् ॥ १७ ॥ स्पर्शवेधिकरस्सोऽयं परवादिमतापहः ॥ वीरशैवान्वयोद्धर्ता बभूव परमास्तिकः ॥ १८ ॥ मद्भक्तनायकमणिस्सोऽर्थ्यभीष्टार्थदायकः ॥ भक्ताधीनानि कृतवान्मनस्तनुधनान्यलं ॥ १९ ॥ असंख्यातैश्शिवगणैस्सुखगोष्ठीप्रसंगतः ॥ कालं नयन्नयं धीरस्तस्थौ कल्याणपट्ट(त्त)ने ॥ २० ॥ आगंतुकैर्यतिवरैः प्रभोर्माहात्म्यमद्भुतं ॥ श्रुत्वा तद्दत्तहृदयो बभूव बसवाधिपः ॥ २१ ॥ कदा यास्यति मद्गेहमल्लमप्रभुवल्लभः ॥ कदा हृत्संशयाः सर्वे च्छेत्स्यन्ते तत्प्रसादतः ॥ २२ ॥ कदा गुरुचरेशार्चारहस्यक्रममुत्तमं ॥ प्राणलिंगांगसंबंधं चोपदेक्ष्यति सद्गुरुः ॥ २३ ॥ इति भक्तगणैस्साकं बसवेशो विधूदयं ॥ चकोर इव**

---

॥ १६ ॥ दुसरा शंभुच असा हा सर्वज्ञ नंदिकेश्वर आमच्या आज्ञेप्रमाणें पृथ्वीवर माझ्या भक्तीचा प्रसार करण्यासाठीं मादांबेचा मुलगा झाला आहे. ॥ १७ ॥ त्याचे बापाचें नांव मादनाराध्य असून त्या नंदिकेश्वराचें नांव बसवेश्वर आहे तो मोठा बुद्धिमान् असून कल्याण नगरीच्या राजाचा तो मुख्य प्रधान आहे. ॥ १८ ॥ परिस मण्यासारखे त्याचे हात ( तो ज्या वस्तूस हात लावील त्या वस्तूचें सोनें होतें इतका अलौकिक सामर्थ्यवान् ) असून तो परवादि ( अन्यधर्मी ) लोकांच्या मताचा पुरा मोड करून पराभव करणारा आहे. वीरशैवांच्या कुलांचा तो उद्धार करणारा असून तो मोठा श्रद्धावान् ( भक्तिमान् ) आहे. ॥ १९ ॥ तो माझ्या सर्व भक्तमंडळींत श्रेष्ठ आहे, तो याचक लोकांचे मनोरथ परिपूर्ण करणारा आहे, त्यानें आपलें तनु मन आणि धन शिवभक्त लोकांच्या पूर्णपणानें स्वाधीन केलें आहे. ॥ २० ॥ अनेक शिवभक्त लोकांच्या मंडळीबरोबर सुखासमाधानाच्या गोष्टी ( विचार ) करून कालक्षेप करीत तो धैर्यवान् बसवेश्वर कल्याण नगरांत राहिला आहे. ॥ २१ ॥ तो बसवेश्वर त्याचे घरीं जे जे संन्याशी ( निराभार ) लोक पाहुणे येतात त्यांच्या मुखानें अल्लमप्रभूचें विचित्र प्रकारचें चरित्र ऐकतो व त्यामुळें अगदीं तल्लीन मन होऊन जातो. ॥ २२ ॥ माझा आवडता अल्लमप्रभु माझ्या घरीं केव्हां येईल? त्याचे कृपेनें माझ्या मनांतील सर्व संशय कधीं दूर होतील? ॥ २३ ॥ मला त्याचे मुखानें गुरु, जंगम व लिंग ह्यांच्या पूजनाचा क्रम कधीं समजेल? प्राणलिंग आणि आंग ह्यांचा संबंध मला अल्लमप्रभु केव्हां समजावून सांगेल. ॥ २४ ॥ अशा रीतीनें बसवेश्वर

सोत्कण्ठं चकमे प्रभुदर्शनं ॥ २४ ॥ अथाल्लमेशो वात्सल्याद्गौर्वत्समिव तं हृदि ॥ संस्मृत्य कल्याणपुरीमाजगाम जगद्गुरुः ॥ २५ ॥ बसवप्रमुखैर्भक्तैः कृतपूजाविधिः स्वयं ॥ अनुजग्राह भगवानात्मज्ञानमचंचलं ॥ २६ ॥ अनिर्वाच्यं परं तत्वमनुभाव्य गणान्गुरुः ॥ चिल्लिंगलीनसद्भावांश्चक्रे सम्यक्प्रबोधनात् ॥ २७ ॥ वीरशैवोल्लमविभुर्लिंगे सर्वं प्रदर्शयन् ॥ सारं समनुजग्राह बसवादिगणेश्वरान् ॥ २८ ॥ इत्युक्तवति देवेशे गिरिराजन्यकन्यका ॥ पप्रच्छ जनिताशंका शंकरं लोकशंकरं ॥ २९ ॥ देवाल्लमः सर्वमयो नामरूपादिवर्जितः ॥ मतानि षट् सामान्यस्य वीरशैवे कथं रतिः ॥ ३० ॥ शिवः प्राह महादेवीं शृणु मत्प्राणवल्लभे ॥ जानीहि परमाद्वैतं वीरशैवस्य वैभवं ॥ ३१ ॥ रौद्रवैष्णवदौर्गार्कस्कांदगाणेश्वरात्मकं ॥ मतषट्कं

सर्व प्रमथगणांसहवर्तमान चकोर पक्षी जसा चंद्रोदयाची वाट पहात असतो तसाच अल्लमप्रभूच्या येण्याची मार्गप्रतीक्षा करीत राहिला. ॥ २५ ॥ मग सर्व जगाचा गुरु तो अल्लमप्रभु गाय जशी वांसराची आठवण होतांच त्याकडे धांवत येते त्याप्रमाणें बसवेश्वराचें मन ओळखून त्यावर कृपा करून त्यास कृतार्थ करण्यासाठीं कल्याणनगरास आला. ॥ २६ ॥ तेव्हां बसवेश्वर वगैरे प्रमुख प्रमुख भक्तमंडळींनीं मोठा आदरसत्कार करून त्याचें पूजन केल्यावर अल्लमप्रभूनें त्यांस निश्चळ अशा आत्मज्ञानाचा उपदेश केला. ॥ २७ ॥ अल्लमप्रभूनें वाचेनें ज्याचें वर्णन करणें अशक्य आहे अशा शिवरहस्याचा चांगल्या रीतीनें सर्व प्रमथगणांस उपदेश करून ( व त्यांस तत्वज्ञानाचा अनुभव आणून देऊन ) त्यांची चित्स्वरूप लिंगाविषयीं श्रद्धा दृढ केली. ॥ २८ ॥ त्या वीरशैवाल्लमप्रभूनें लिंगाविषयीं यथार्थ रीतीनें सर्व ज्ञान बसवेश्वरादिक सर्व प्रमथगणांस करून देऊन त्यांस कृतार्थ केलें. ॥ २९ ॥ अशा रीतीनें शंकर पार्वतीस सांगत असतां पार्वतीस कांहीं शंका येऊन ती सर्व जगाचें कल्याण करणाऱ्या शंकरास विचारूं लागली. ॥ ३० ॥ ईश्वरा, अल्लमप्रभु सर्वान्तर्यामी असून सर्वस्वरूप आहे, त्याला नाम रूप वगैरे कांहीं नाहीं; मग शिव, विष्णु, दुर्गा, सूर्य, स्कंद, गणपती ह्या देवतांच्या नांवावरून उत्पन्न झालेलीं सहा मतें असतां अल्लमप्रभूची वीरशैवमतावर इतकी आवड कां झाली? हें मला समजावून सांगा. ॥ ३१ ॥ शिव पार्वतीस ह्मणाले, माझे आवडते स्त्रिये, ऐक. वीरशैवाचें माहात्म्य श्रेष्ठ अद्वैत आहे असें समज. ॥ ३२ ॥ शैव, वैष्णव, शाक्त ( देवीचें ) सूर्य, स्कांद आणि

**पृथग्भिन्नं तांत्रिकैरुपपादितं ॥ ३२ ॥ द्वैतप्रधानं वेदान्तविरुद्धमसमंजसं ॥ धर्मार्थकामफलदं तत्तल्लोकैकसाधनं ॥ ३३ ॥ पुनरावृत्तिहेतुत्वान्न मुक्तिः सा कथंचन ॥ परंतु बंधहेतुः स्यात्तत्तल्लोकगतिर्नृणां ॥ ३४ ॥ न कर्मफलमुत्सार्य निर्मलामृतसाधनं ॥ मतषट्कं भवेद्देवि भेदज्ञानप्रधानकं ॥ ३५ ॥ मीमांसकमतं यत्तु कर्मकाण्डमनिंदिते ॥ हिंसाप्रधानं तत्स्वर्गनरकादिफलप्रदं ॥ ३६ ॥ दुर्मदान्धाः प्रकुर्वन्ति हिंसां स्वर्गार्थिनो नराः ॥ न जीवहिंसकान्मूढाननुगृह्णाति शंकरः ॥ ३७ ॥ अनुग्रहं विना शंभोः कृपा न प्रसरेत्प्रिये ॥ विना शिवकृपां मुक्तिर्दूरापास्ता न संशयः ॥ ३८ ॥ अतो नैष्कर्म्यसिद्ध्यैव वीरशैवे रतिर्भवेत् ॥ वीरशैवं हि वेदान्तसिद्धं मोक्षैकसा-**

---

गाणपत्य अशीं सहा मतें हीं वेगवेगळीं आहेत असें तांत्रिकांनीं मानिलें आहे. ॥ ३३ ॥ ह्यांपैकीं कोणतेंही मत पाहिलें तरी त्यांत द्वैत मुख्य आहे, तें वेदान्तमतास अनुसरून नाहीं व मूर्खपणाचें असें आहे. त्या मतानें धर्म, अर्थ, आणि काम ह्यांची प्राप्ति होते, मोक्षाची प्राप्ति होत नाहीं, व तें मत त्या त्या लोकांची प्राप्ति करून देणारें आहे इतकेंच. ॥ ३४ ॥ त्या मताचा आश्रय केला तरी जन्ममरण चुकत नाहीं, त्यामुळें मोक्षाची प्राप्ति होण्याचें नांव देखील काढण्यास नको. परंतु त्या त्या लोकांची प्राप्ति होणें ही मनुष्याला एक प्रकारच्या बंधनाला कारण आहे. ॥ ३५ ॥ पार्वति, ह्या सहा मतांत भेदज्ञान हें मुख्य मानलें आहे. त्यामुळें कर्मापासून फलप्राप्ति होते ही समजूत सोडून दिल्याशिवाय निर्दोष रीतीची मोक्षप्राप्ति होत नाहीं. ॥ ३६ ॥ हे निर्दोष स्वभावाचे पार्वति, जें मीमांसकाचें मत मानिलें आहे तें निव्वळ कर्मकांड आहे, त्यांत हिंसा मुख्य आहे ( त्यांत हिंसा करावी लागते ) व त्याचें फळ पाहिलें तर स्वर्ग आणि नरक ह्यापेक्षां दुसरें कांहीं नाहीं. ॥ ३७ ॥ हे वाईट तऱ्हेच्या अभिमानामुळें आंधळे झालेले लोक स्वर्गप्राप्ति व्हावी ह्मणून जीवहिंसा करितात, जीवहिंसा करणाऱ्या त्या मूर्खांवर शंकर कधींही कृपा करीत नाहीं. ॥ ३८ ॥ पार्वति, शंकराची भक्ति केल्यावांचून शिवाची त्यावर कृपा होत नाहीं? शिवकृपेवांचून मोक्षप्राप्ति होणें फार दुर्लभ आहे ह्यांत शंका नाहीं. ॥ ३९ ॥ यास्तव नैष्कर्म्यसिद्धीमुळेंच ( निरिच्छपणानें शंकराची भक्ति केली तरच ) वीरशैव मतावर आवड बसते, वीरशैव मत हें सिद्धान्तशास्त्रास अनुसरून आहे व मोक्षप्राप्तीचें मुख्य

धनं ॥ ३९ ॥ यावद्भेदमतिस्तावत्संसारो नैव नश्यति ॥ भेदबाधकमद्वैतं वीरशैवाख्यमद्रिजे ॥ ४० ॥ अंगलिंगैक्यसंबंधाद्वीरशैवो भवेन्नरः ॥ जीवोऽगलिंगमीशः स्यात्तयोरैक्यं हि संगतिः ॥ ४१ ॥ शिवजीवैक्यविज्ञानमज्ञातार्थो हि लौकिकैः ॥ अज्ञातार्थे फलवति श्रुतेस्तात्पर्यमीर्यते ॥ ४२ ॥ श्रुत्येकगम्यमद्वैतं वीरशैवाख्यमंगने ॥ भेदस्त्वाबालगोपालविदितो लौकिको मतः ॥ ४३ ॥ तस्माद्वेदान्तविज्ञानसुनिश्चितधियां नृणां ॥ महात्मनां विरक्तानां वीरशैवे मतिर्भवेत् ॥ ४४ ॥ वीरशैवोदिताद्धर्माल्लिंगैक्यज्ञानमाश्रिताः ॥ मोक्षं प्रयांति परमं पुनरावृत्तिवर्जितं ॥ ४५ ॥ इत्युक्तवन्तं प्राणेशमवलोक्य गिरींद्रजा ॥ स्नेहात्कृतांजलिपुटा नमस्कृत्येदमब्रवीत् ॥ ४६ ॥ अद्वैतिनो वीरशैवास्त्वहंब्रह्मेति निश्चिताः ॥ आराधयन्ति वा ते त्वां

---

साधन आहे. ॥ ४० ॥ जोंपर्यंत भेदबुद्धि ( मीपण, तूंपण आपपरभाव ) आहे तोंपर्यंत संसार चुकत नाहीं. पार्वति, वीरशैव नांवाचें मत भेदबुद्धीचा नाश करणारें असून अद्वैत मत त्यांत मुख्य आहे अशा रीतीचें आहे. ॥ ४१ ॥ सद्गुरूच्या उपदेशानें मनुष्यास लिंगांगैक्याच्या संबंधाचें ज्ञान झालें ह्मणजे तो मनुष्य वीरशैव होतो, जीव हेच आंग असून ईश्वर हेंच लिंग आहे त्या दोघांची परस्परांशीं गांठ ( ऐक्य ) करणें त्यालाच संगति असें ह्मणावें. ॥ ४२ ॥ शिव आणि जीव ह्यांचें ऐक्य झालें ह्मणजे त्यापासून उत्पन्न होणाऱ्या विज्ञानाचा अज्ञान लोकांस बोध होत नाहीं तो अज्ञातार्थ ( गुप्त शिवतत्व ) फलद्रूप ( कळलें ) झाला ह्मणजे वेदाचें तात्पर्य कळून येतें. ॥ ४३ ॥ स्त्रिये, वीरशैव नांवाचें मत वेदानें समजण्यासारखें असून तें अद्वैतप्रधान आहे त्यांत भेदबुद्धि नाहीं. भेद ( निराळेपणा ) हा लहान मुलांपासून ह्यातान्या मनुष्यांपर्यंत व गुराख्यांस देखील सर्वांस माहीत आहे. त्याला लौकिक ( सर्व लोकांस कळणारा ) असें ह्मटलें आहे. ॥ ४४ ॥ ह्यासाठीं वेदान्ताच्या विज्ञानामुळें निश्चल बुद्धि झालेल्या मोठमोठ्या व वैराग्य आंगीं असलेल्या मनुष्यांस वीरशैवमताची आवड असते. ॥ ४५ ॥ वीरशैव मतांत सांगितलेल्या धर्माप्रमाणें लिंगैक्याचें ज्ञान झालेले लोक मोक्षपदास जातात त्यांस पुन्हा जन्ममरणाचें कारण राहत नाहीं. ॥ ४६ ॥ असें बोलणाऱ्या आपल्या पतीला ( शंकराकडे ) पाहून पार्वती पतीवरील प्रेमामुळें दोन्ही हात जोडून नमस्कार करून ह्मणाली. ॥ ४७ ॥ अद्वैत ( निराळेपणा आपल्यामध्यें आणि ईश्वरामध्यें नाहीं असें मानणारे ) वीरशैव लोक मीच ब्रह्मस्वरूप आहें असें समजून मग

**तूष्णीं तिष्ठन्ति वा विभो ॥ ४७ ॥ यथा निःसंशयं चेतस्तथा कुरु ममेश्वर ॥ इति पृष्टो महादेवो जगाद वरवर्णिनीं ॥ ४८ ॥ वीरशैवक्रमं धर्म्यं शृणु कल्याणि सांप्रतं ॥ येन विज्ञातमात्रेण शिवजीवैक्यमाप्नुयात् ॥ ४९ ॥ भावाद्वैतं क्रियाद्वैतं वीरशैवे प्रशस्यते ॥ अद्वैतं भावयेच्चित्ते क्रियायां द्वैतमाश्रयेत् ॥ ५० ॥ बाह्यकर्माणि संत्यज्य ममार्चनविधीरिताः ॥ सत्क्रियास्सकला नित्यं वीरशैवः करोत्यलं ॥ ५१ ॥ मय्येव सकलं कर्म समर्प्य दृढभावनः ॥ नाकांक्षति फलं किंचिद्वीरशैवो विरागवान् ॥ ५२ ॥ मनस्तनुधनाकांक्षां त्यजन्नात्मसतीसुतान् ॥ समर्पयति यो मह्यं वीरशैवस्स उच्यते ॥ ५३ ॥ यस्तु पंचेंद्रियभ्रान्तिं त्यक्त्वान्तकमलक्षयन् ॥ न शिवान्यदिति ज्ञानी स वीरः शैव उच्यते ॥ ५४ ॥ एकमेव परं ब्रह्मेत्यन्यदेवाननर्चयन् ॥**

---

तुला ( शंकराला ) भजतात किंवा तसेच स्वस्थ राहतात तें परमेश्वरा, तूं मला सांग. ॥ ४८ ॥ ज्या तऱ्हेनें माझ्या मनांत संशय घेण्यास जागा राहणार नाहीं असें स्पष्ट रीतीनें मला सर्व सांगून माझ्या मनाचा संशय काढून टाक, असें पार्वतीनें विचारल्यानंतर महादेव तिला ह्मणाले. ॥ ४९ ॥ हे कल्याणकारके स्त्रिये, धर्मास अनुसरून असणारा वीरशैव लोकांचा वर्तनक्रम मी तुला आतां सांगतों, तो समजला असतां मनुष्य, शिव आणि जीव ह्यांचें ऐक्य होणें ह्या स्थितीला जाऊन पोंचतो. ॥ ५० ॥ वीरशैव मतांत भावाद्वैत ( निश्चल शिवभक्ति ) आणि क्रियाद्वैत ( एक क्रिया केल्यानेंच परमार्थप्राप्ति होते अशी समजूत ) असे दोन प्रकार मानले आहेत त्यांपैकीं भावाद्वैताचा स्वीकार करावा, व क्रियाद्वैताचा त्याग करावा. ( मनामध्यें अद्वैत मानून क्रिया करण्याच्या वेळीं द्वैताची कल्पना करावी. ) ॥ ५१ ॥ वीरशैव मनुष्य बाह्य कर्मैं सर्व सोडून देऊन माझ्या पूजनप्रकारांत सांगितलेल्या सर्व क्रिया दररोज करितो. ॥ ५२ ॥ तो दृढनिश्चयी वीरशैव सर्व प्रकारचें कर्म मजमध्यें अर्पण करितो व त्याचें फळ मला अमुक प्रकारानें मिळावें अशी कधींही इच्छा करीत नाहीं. ॥ ५३ ॥ जो मन, शरीर आणि धन ह्यांची आशा सोडून देऊन आपला आत्मा, आपली स्त्री आणि आपलीं मुलें हें सर्व मलाच अर्पण करितो त्याला वीरशैव ह्मणावें. ॥ ५४ ॥ जो पंचेंद्रियांपासून होणारा सर्व भ्रम सोडून देऊन प्रत्यक्ष यमास देखील भीत नाहीं ( मरणास जुमानीत नाहीं ), शिवावांचून दुसरा देव नाहीं असें मानतो तो ज्ञानी ( समंजस ) असा वीरशैव समजावा. ॥ ५५ ॥ एक शंकरच परब्रह्म आहे, त्याखेरीज दुसरा श्रेष्ठ देव कोणीच नाहीं असें ह्मणून दुसऱ्या देवतांची

लिंगैक्यमेव यः पश्येद्वीरमाहेश्वरः स वै ॥ ५५ ॥ मतोद्धरणवेलायां दृष्टप्रत्ययपूर्वकं ॥ यः सिद्धान्तयते तत्वं स वीरः शांभवः स्मृतः ॥ ५६ ॥ भक्त्या मां पूजयत्येव न वांच्छति फलं क्वचित् ॥ मद्दत्तमपि नादत्ते वीरशैवः स योगिराट् ॥ ५७ ॥ गृहीतं न त्यजत्यार्ये व्रतं प्राणात्ययेऽपि च ॥ लिंगैक्यज्ञानसंपन्नः स भवेद्वीरशाम्भवः ॥ ५८ ॥ सदांगे कीलयेल्लिंगं संगदोषविवर्जितः ॥ इष्टप्राणैक्यभावेनस योगी वीरशैवराट् ॥ ५९ ॥ जातकं मृतकं वापि सूतकं यस्य नोभेवत् ॥ सदाशिवसमावेशात्स योगी वीरशाम्भवः ॥ ६० ॥ शिवोद्देशकृतं पाकं भविनां नैव दर्शयेत् ॥ बहिर्जनेभ्यो नो दद्याद्वीरशैवो महेश्वरि ॥ ६१ ॥ आचारो वीरशैवस्य वर्णितुं केन शक्यते ॥ गिरा गीष्पतिना

---

कधींही पूजा करीत नाहीं, लिंगैक्य होणें हेंच आपलें मुख्य कर्तव्य समजतो त्यास वीरमाहेश्वर ह्मणावें. ॥ ५६ ॥ आपल्या मतास ग्लानि आली असतां त्यास ऊर्जित स्थिति येऊन त्याचा सर्वत्र प्रसार करण्याच्या वेळीं अनेक तऱ्हेचे दृष्टांत व अनुभव दाखवून आपलें मत खरें आहे असें खात्रीनें सिद्ध करून दाखवून सर्वांस निरुत्तर करितो त्यास वीरशैव ह्मणावें. ॥ ५७ ॥ पार्वती, जो मनुष्य माझी भक्तिपूर्वक पूजा करितो परंतु त्यापासून अमुक फळ मिळावें असें मुळींच इच्छित नाहीं. मीं दिलें तरी घेत नाहीं त्यास वीरशैव ह्मणावें. तो योगीश्वर समजावा. ॥ ५८ ॥ एक वेळ जें व्रत घेतलें तें व्रत प्राण गेला तरी सोडीत नाहीं, पार्वति, इतका ज्याचा दृढ निश्चय असतो व ज्याला लिंगैक्याचें यथार्थ रीतीनें ज्ञान झालेलें असतें तो वीरशैव समजावा. ॥ ५९ ॥ नेहमीं ज्याच्या आंगावर लिंग धारण केलेलें असतें व इष्टलिंग आणि प्राणलिंग ह्यांशीं त्याचें ऐक्य झाल्यामुळें व भावलिंगाचे ऐक्यामुळें ज्याचे सर्व दोष आणि संग नाहींसे झाले आहेत त्यास योगी ह्मणावें, व तो सर्व वीरशैवांमध्यें राजा ( श्रेष्ठ ) होय असें समजावें. ॥ ६० ॥ जो मनुष्य आपल्या आंगांशीं लिंगाचा संबंध झाल्यामुळें आपणास प्रत्यक्ष शंकरच समजतो त्याला जन्माचें सोयर आणि मरणाचें सूतक मुळींच नाहीं. तो योगी वीरशैव होय असें समजावें. ॥ ६१ ॥ पार्वति, वीरशैव मनुष्य मला ( शंकराला ) नैवेद्याकरितां ह्मणून जो स्वयंपाक करितो तो इतर लोकांच्या मुळींच दृष्टि पडूं देत नाहीं व तें अन्न इतर नीच जातीच्या लोकांस कधीं देत नाहीं. ॥ ६२ ॥ वीरशैवाचा आचार वर्णन करण्याची कोणाची शक्ति आहे ? तो प्रत्यक्ष बृहस्पतीला अथवा ब्रह्मदेवाला अथवा विष्णूला देखील

**वापि ब्रह्मणा विष्णुनाऽथवा ॥ ६२॥इत्युक्त्वोपरते कान्ते शांकरी विस्मयान्विता ॥ पुलकांकितगात्री तं पुनः प्रोवाच शंकरं ॥६३॥ मन्नाथ वीरशैवास्ते सततं लिंगधारिणः ॥ सालम्बा इव भासन्ते निरालम्बाः कथं वद ॥ ६४ ॥ कथं तनुमनोर्थेषु ममता नास्ति तादृशां ॥ आज्ञापयेत्यभिहितो गिरिजां गिरिशोऽब्रवीत् ॥ ६५ ॥ माहात्म्यं वीरशैवस्य शृणुष्वावहिता सती ॥ तनुत्रितयसंसक्तां मनोवृत्तिपरंपरां ॥ ६६ ॥ दीक्षात्रयेण संत्यज्य त्रिलिंगानां त्रिभिः क्रमात् ॥ अंगैरैक्यं पुनश्चैक्यं तेषां संभाव्य धीरधीः ॥ ६७ ॥ भक्तमाहेश्वरादीनां सोपानानां परंपरां ॥ समारुह्यांगलिंगास्यहस्तज्ञानपुरस्सरं ॥ ६८ ॥ सर्वाश्शक्तीः समीकृत्य लिंगैक्यसरणीं भजन् ॥ अब्धौ पतत्करकवद्व्योमव्याप्तसमीरवत् ॥ ६९ ॥ वन्हौ मिलच्चंद्रकवत्स्वात्मलीनतनुत्रयः॥**

---

आपल्या तोंडानें सांगण्याची शक्ति नाहीं मग इतरांची काय कथा! ॥ ६३ ॥ शंकर इतकें बोलून मुकाट्यानें राहिल्यावर पार्वतीस मोठें आश्चर्य वाटून तिच्या आंगावर शहारे आले व ती पुन्हा शंकरास ह्मणाली. ॥ ६४ ॥ हे माझे प्रियकरा शंकरा, ते नेहमीं लिंगधारण करणारे वीरशैव आशाबद्ध असल्यासारखे तर दिसतात. ते विरक्त ह्मणून आपण ह्मणतां तें कसें? मला सांग. ॥ ६५ ॥ त्यांच्या सारख्यांची शरीर, मन आणि धन ह्यांवर ममता कशी नसते हें मला समजावून सांग; असें पार्वतीनें विचारल्यावर शंकर सांगूं लागले. ॥ ६६ ॥ पार्वति, वीरशैवाचें माहात्म्य मी तुला सांगतों, नीट लक्ष्य देऊन ऐक. स्थूल, सूक्ष्म आणि कारण ह्या तीन्ही शरीरावर असणाऱ्या मनोवृत्तींच्या समुदायास (अनेक प्रकारच्या कल्पनांस) ॥ ६७ ॥ वेधा, क्रिया, मंत्र ह्या तीन प्रकारच्या दीक्षांमुळें टाकून देऊन इष्टलिंग, प्राणलिंग, भावलिंग ह्या तिहींचे क्रमाक्रमानें स्थूल, सूक्ष्म, कारण ह्या आंगांसीं ऐक्य झाल्यामुळें त्यांचें तें ऐक्य दृढ होऊन त्याची बुद्धि निश्चल होते. ॥ ६८ ॥ लिंगांगाचें मुख, हस्त वगैरे ज्ञान करून घेऊन नंतर भक्त माहेश्वर वगैरे षट् स्थलांच्या अधिकारास (पायरीवर) क्रमाक्रमानें चढावें. ॥ ६९ ॥ नंतर ज्ञानाच्या सर्व कला त्यास प्राप्त होऊन तो लिंगैक्याच्या मार्गास जाऊन पोंचतो. नंतर मग समुद्रांत पडलेल्या गारेसारखी किंवा आकाशांत वाहणाऱ्या वाऱ्यासारखी त्याची स्थिति होते (तो शिवमय होऊन जातो). ॥ ७० ॥ अग्नींत जाऊन मिळणाऱ्या तेजाप्रमाणें त्याच्या आत्मज्ञानामध्यें स्थूल, सूक्ष्म

तादात्म्यसिद्धिं लभते गुरोः करुणया बुधः ॥ ७० ॥ वस्तुज्ञानात्तस्य नास्ति संगो देहेंद्रियादिभिः ॥ पार्श्वस्थैर्दृश्यमानोऽपि जीवन्मुक्तस्य योगिनः ॥ ७१ ॥ इति शम्भोर्वचः श्रुत्वा नत्वा गिरिवरात्मजा ॥ ज्ञात्वा भावरहस्यं तत्कृतार्थाऽस्मीत्यमन्यत ॥ ७२ ॥ दण्डवत्प्रणमन्तीं तां खण्डेंदुधर ईश्वरः ॥ बाहुभ्यां सम्परिष्वज्य प्रीणयामास भामिनीं ॥ ७३ ॥ मायाजयकृतामीर्ष्यां परित्यज्याल्लमप्रभौ ॥ जगद्गुरुरयं साक्षादित्यमन्यत पार्वती ॥ ७४ ॥ अस्मद्भक्तगणान्सर्वानरक्षीदल्लमप्रभुः ॥ मोक्षं दत्वेत्युमाशंभू हृदये मुदमापतुः ॥ ७५ ॥ गौरीमहेश्वरौ रम्ये कैलासशिखरीश्वरे ॥ अल्लमानन्दभरितौ सुखगोष्ठ्या स्थितौ द्विजाः ॥ ७६ ॥ अत्राल्लमस्तरुणवृद्धजनान्नृपालान्बालान्दरिद्रनिवहान्धनिकान्सुशीलान् ॥ गोब्राह्मणानखिलजंतुगणानशेषश्रेणीरनुग्रहवशात्सततं

---

आणि कारण हे तिन्ही देह मिळून जातात. व तो ज्ञाता सद्गुरूच्या कृपेनें शिवस्वरूपाची सिद्धि पावतो. ॥ ७१ ॥ त्यास वस्तुस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें असल्यामुळें इतर आजूबाजूस राहणाऱ्या लोकांस तो दिसत असला तरी तो योगी जीवन्मुक्त झाला असल्यामुळें त्यास शरीर आणि इंद्रियें ह्यांचा कांहीं एक संबंध ( ममता ) राहत नाहीं. ॥ ७२ ॥ असें शिवाचें बोलणें ऐकून पार्वतीनें नमस्कार केला व मला वीरशैवाचें यथार्थ ज्ञान झालें ह्मणून ती आपणास धन्य मानूं लागली. ॥ ७३ ॥ व तिनें शिवापुढें दण्डासारखा नमस्कार घातला तेव्हां शिवांनीं तिला दोहों हातांनीं वर उचलून आलिंगन दिलें व तिचें समाधान केलें. ॥ ७४ ॥ आपल्या शांबरी मायेचा अल्लमानें पराजय केला ह्मणून पार्वती अल्लमप्रभूबरोबर स्पर्धा करीत होती ती सर्व तिनें सोडून दिली व हा अल्लमप्रभु प्रत्यक्ष सर्व जगाचा ईश्वर आहे असें मानूं लागली. ॥ ७५ ॥ हा अल्लमप्रभु आमच्या सर्व भक्तसमुदायांस मोक्षप्राप्ति होण्यासारखा उपदेश करून त्यांचें रक्षण करितो असें शंकरपार्वतीस पूर्णपणें समजून आल्यावर ते दोघेही संतोष पावले. ॥ ७६ ॥ ब्राह्मण हो, अशा तऱ्हेनें कैलासपर्वताच्या रमणीय शिखरावर ते दोघे शंकर पार्वती अल्लमप्रभूच्या चरित्रामुळें संतुष्ट होऊन सुखानें कालक्रमणा करूं लागले. ॥ ७७ ॥ असो, इकडे हा अल्लमप्रभु बसवेश्वराच्या कल्याणनगरांतून निघाल्यानंतर वाटेनें कोणी तरुण लोक असोत, ह्मातारे असोत, राजे असोत, अल्पवयी मुलें असोत, दरिद्री लोकांचा समुदाय असो, सधन लोकांचा समुदाय असो, सदाचारी असोत, गाई असोत, ब्राह्मण असोत

**पुपोष ॥ ७७ ॥ जगदखिलमधीशः शांभवानंदपूर्णं सकलफलसमृद्ध्या सौख्यसंपत्समेतं ॥ सकरुणमनुगृह्य श्रीगुरुः स्वेच्छयैव प्रकटितगुणमूर्तिः पावयामास भूमिं ॥ ७८ ॥ इयमखिलमुनीन्द्राः श्रीगुरोर्दिव्यलीला गणचरितविशाला व्यासमौनिप्रसादात् ॥ हृदयकमलवासिश्रीमहेशाज्ञयोक्ता प्रभवतु पठितॄणां भोगमोक्षानुकूला ॥ ७९ ॥ सूतोक्तं प्रभुलिंगमूर्तिचरितं श्रुत्वा मुनीन्द्राः परं ब्रह्मानंदसुधांबुधौ चिरतरं संपाद्य डोलायिताः ॥ सानंदैकरसास्तमेनमभितः स्तुत्वा प्रणम्यादरात् जीवन्मुक्तिमवाप्नुवन् परशिवे सर्वं समर्प्यांजसा ॥८०॥ श्रुत्वा चित्रं चरित्रं पुनरपि मुनयः सूतपुत्रं विलोक्य स्वामिन् विस्पष्टमस्मन्मतिखचितमिदं प्रष्टुकामा रहस्यं ॥ वक्तव्यं तत्त्वयाऽपि प्रकटितकृपया लोकसंरक्षणार्थं शास्त्रार्थं स्वात्मनीनं सकलमपि मन-**

---

कोणीही असला तरी त्यावर अनुग्रह करून त्यास संतुष्ट करूं लागला. ॥ ७८ ॥ अल्लमप्रभु प्रत्यक्ष देहधारी होऊन पृथ्वीवर फिरूं लागल्यामुळें सर्व पृथ्वी पवित्र झाली, अल्लमाचे पवित्र उपदेशामुळें सर्व ठिकाणीं शैवमताचा प्रसार झाला. व अल्लमप्रभूचे अलौकिक सामर्थ्यामुळें तो स्वच्छंदपणानें जिकडे जिकडे जाऊं लागला तिकडे तिकडे झाडें प्रफुल्लित होऊन त्यांस फुलेंफळें आलीं व सर्व लोक सुखी आणि धनवान् असे झाले. ॥ ७९ ॥ शौनकादिक सर्व ऋषीश्वरांनो, हें अल्लमप्रभूचें दिव्य चरित्र व्यासमुनींच्या कृपेनें व माझ्या मनांत जी शंकराची आज्ञा आहे त्या आज्ञेप्रमाणें मीं तुह्मांस सांगितलें आहे, ह्या चरित्रांत प्रमथगणांच्या बऱ्याच गोष्टी असल्यामुळें हें चरित्र मोठें झालें आहे. हें चरित्र जो कोणी वाचील त्यास ह्या लोकीं ऐश्वर्याचा लाभ होऊन मरणानंतर मोक्षसुख मिळेल. ॥ ८० ॥ अशा रीतीनें सूतानें सांगितलेलें प्रभुलिंगमूर्तीचें चरित्र ऐकून शौनकादिक सर्व मुनीश्वर ब्रह्मानंदसुखरूपी समुद्रांत बुडून जाऊन डोलूं लागले, जिकडे तिकडे आनंदीआनंद होऊन गेला, व सर्वजण चोहोंकडून सूताची प्रशंसा करूं लागले. व तें सर्व पुण्य त्यांनीं श्रेष्ठ शिवामध्यें अर्पण केल्यामुळें जीवन्मुक्ति सुखाचा उपभोग घेऊं लागले. ॥ ८१ ॥ शौनकादिक सर्व मुनीश्वर असें विचित्र रीतीचें अल्लमप्रभूचें चरित्र ऐकून सूताकडे पाहून ह्मणूं लागले, महाराज, आपण जें सांगितलें तें आमच्या मनांत पुरतेपणीं ठसलें; तरी आणखी कांहीं गुप्त तत्व तुह्मांला विचारावेंसें वाटतें, तूं आमच्यावर कृपा करून तें आह्मांस सांग. त्यापासून लोकांचा मोठा उपयोग होईल तर आपणास माहीत असलेला

**स्याकलय्येत्यपृच्छन् ॥ ८१ ॥ चतुर्मुखः सर्वमिमं प्रपंचं ससर्ज सर्वेशितुराज्ञयेति ॥ त्वयोक्तमादौ श्रुतिभिश्च सूक्तं पुरेव धातासृजतात्मनेति ॥ ८२ ॥ तदीयसृष्ट्यां सुरमानुषाद्याः समस्तजीवास्सुखमोक्षकामाः ॥ श्रयन्ति सर्वेश्वरमेव सर्वे किमर्थमन्येऽधिपतिं महात्मन् ॥ ८३ ॥ पुराणभागेषु भवन्मुखेन श्रुतेषु सर्वेषु च तत्र तत्र ॥ विधींद्रविष्णवादिसुराश्रितानां पृथङ्नयानां कथिताः कथास्ताः ॥ ८४ ॥ तथा द्विजक्षत्रियवैश्यशूद्राः सलोमजाताः प्रतिलोमजाश्च ॥ श्रुतास्तथैवाश्रमिणश्च तेषां विभिन्नधर्माः पृथगर्थभाजः ॥ ८५ ॥ शिवैकतानाः शरणाः प्रसिद्धाः श्रुतास्तथा तेषु महानुभावाः ॥ गृहीतवर्णाश्रमधर्मनिष्ठास्तथा निराभारपदाभिषिक्ताः ॥ ८६ ॥ प्रभुस्तु सर्वं जगदेतदीशश्चकार साक्षादिह वीरशैवं ॥ श्रुतिर्हि सर्वत्र गतौ प्रमाणं तदेकरूप्यं कथमीश भाव्यं ॥ ८७ ॥ इदं हि सर्वं परिमृश्य**

---

तो सर्व शास्त्रार्थ आह्मां सर्व ऋषींवर कृपा करून आपण सांगा. ॥ ८२ ॥ तुह्मी प्रथम आह्मांस असें सांगितलें कीं, ब्रह्मदेवानें ईश्वराच्या आज्ञेनें हें सर्व जग उत्पन्न केलें व वेदांत देखील असेंच ह्मटलें आहे कीं, पूर्वीं ब्रह्मदेवानें आपल्याआपणच सर्व जग उत्पन्न केलें. ॥ ८३ ॥ ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या सृष्टींत देव, मनुष्य वगैरे सर्व प्राणिमात्र सुखाची व मोक्षाची इच्छा करितात व त्या ब्रह्मदेवाला सोडून इतर निरनिराळ्या देवाला काय ह्मणून भजतात? सर्वांनीं मिळून त्या ब्रह्मदेवालाच अगर ब्रह्मदेवास आज्ञा करणारा जो कोणी एक ईश्वर असेल त्यालाच भजावयास पाहिजे होतें. ॥ ८४ ॥ तुझ्या तोंडून आह्मीं अनेक पुराणांचे भाग ऐकिले आहेत परंतु तेथें तेथें ब्रह्मदेव, इंद्र, विष्णु ह्यांच्या संबंधाच्या निरनिराळ्या गोष्टी सांगितलेल्या आढळतात. ॥ ८५ ॥ तसेंच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, सलोम व प्रतिलोम ह्या जाती आह्मीं ऐकिल्या आहेत, तसेच वेगवेगळ्या जातींतील ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास हे आश्रमधर्म आह्मीं ऐकिले आहेत. ॥ ८६ ॥ शिवाला एकनिष्ठपणानें भजणारे शरण ( स्वधर्मसंपन्न ) प्रसिद्ध आहेत तें ऐकिलें: त्यांत महासमर्थ व वर्णाश्रम धर्माप्रमाणें श्रद्धापूर्वक आचरण ठेवणारे निराभार पदास पावलेले श्रेष्ठ जंगम आहेत ह्मणून ऐकिलें. ॥ ८७ ॥ एका ईश्वरानें हें सर्व जग निर्माण केलें व वीरशैवमतही त्यानेंच निर्माण केलें असें सर्व ठिकाणीं वेद सांगतो तर ह्या सर्वांचा गैरमेळ नाहींसा होऊन सर्वांचें एक मत कसें व्हावें? ॥ ८८ ॥ सूता, आपण स्वतः विद्वान् आहां, ह्यासाठीं ह्या सर्व गोष्टींचा विचार करून सर्व शास्त्रांत

**विद्वन्समस्तशास्त्रेष्वविरुद्धतत्वं ॥ त्वयोपदेश्यं करुणांबुराशे मनस्समाधातुमिहास्मदीयं ॥ ८८ ॥ मुनीनिति प्रार्थयतो विलोक्य प्रसाददृष्ट्या शिवयोगिवर्यः ॥ समस्तशास्त्रार्थरहस्यतत्वं प्रकाशयन्नाह गुरूपदिष्टं ॥ ८९ ॥ अहो मुनींद्राः परतत्वनिष्ठाः शृणुध्वमात्मन्यवधानयुक्ताः ॥ भवत्कृतं प्रश्नमिमं भवान्या समादद [1] + + + + कं ॥९०॥ कालो ह्यनादिः शिवसृष्टमेतत्प्रपंचजातं सकलं हरैव ॥ तदाज्ञयावान्तरसृष्टयस्ताः कृताः क्वचिद्विष्णुविधातृमुख्यैः ॥ ९१ ॥ अनंतवेदेष्वपि तत्र तत्र पुराणभागेषु तथागमेषु ॥ निरूप्य तत्तत्कृतसृष्टिभेदान् प्रधानतः शांभवसृष्टिरुक्ता ॥ ९२ ॥ महेश्वराज्ञामवलंब्य सर्वे सृजन्तु धात्रादय ईश्वरस्तान् ॥ शिवोऽनुगृण्हाति ततो महेशं स्वकारणं तेऽपि समाश्रयन्ते ॥ ९३ ॥ विश्वाधिको रुद्र इति श्रुतिश्च ब्रूते प्रभुं स्वात्मनि विश्वसेव्यं ॥ करोति तस्मै श्रुतिरेव साक्षात्सदा नमस्कारस-**

---

ज्याला कोठेंच बाध येणार नाहीं असें तत्व तूं आह्मांस सांगून आमच्या मनाचें समाधान कर, तूं कृपेचा समुद्र आहेस. ॥ ८९ ॥ अशा रीतीनें प्रार्थना करणाऱ्या त्या मुनीश्वराकडे प्रसन्न मुद्रेनें पाहून तो श्रेष्ठ शिवयोगी सूत गुरूनें सांगितलेलं सर्व शास्त्रांचें तात्पर्यभूत असें तत्व सांगूं लागला. ॥ ९० ॥ हे मुनीश्वरानो, तुह्मी सर्व तत्वज्ञानावर श्रद्धा ठेवणारे आहां, मी तुह्मांस सांगतों तें नीट लक्ष्य देऊन ऐका. तुह्मीं जसा मला हा प्रश्न केला तसाच प्रश्न पूर्वी पार्वतीनें महादेवास केला होता, त्यावेळीं त्यांनीं तिला जें सांगितलें तेंच मी तुह्मांस सांगतों. ॥ ९१ ॥ काल हा अनादि आहे, ही सर्व प्रपंचरचना (सृष्टि) शंकरांनीं उत्पन्न केली आहे, त्या शंकराच्या आज्ञेनेंच कांहीं दुसऱ्या अवांतर विष्णु, ब्रह्मदेव वगैरे देवांनीं उत्पन्न केल्या आहेत. ॥ ९२ ॥ अनेक वेळ वेदांत जागोजागीं, पुराणांत जागोजागीं व आगमांत जागोजागीं त्या विष्णु ब्रह्मदेव ह्यांनीं केलेल्या सृष्टींचीं वर्णनें आहेत त्यांत शंकरांनीं उत्पन्न केलेली सृष्टि मुख्य आहे असें ह्मटलें आहे. ॥ ९३ ॥ महेश्वराची आज्ञा घेऊन त्याच्या आज्ञेप्रमाणें हे सगळे ब्रह्मदेव, विष्णु वगैरे सृष्टि उत्पन्न करितात, त्यावेळीं ईश्वर शिवच त्यांवर अनुग्रह करितो व त्या शिवाच्या अनुग्रहामुळें त्यांस सृष्टि उत्पन्न करण्याचें सामर्थ्य येऊन ते सृष्टि उत्पन्न करितात. ॥ ९४ ॥ सर्व त्रैलोक्यापेक्षां रुद्र श्रेष्ठ आहे असें वेद सांगतो, व हा प्रभु सर्व जगानें सेवा करण्यास योग्य आहे असें मानतो व वेद स्वतः त्या परमेश्वराला हजार वेळ नमस्कार

---

१ टीप—ताडपत्री पुस्तकांत तीं अक्षरें फाटून गेलीं होतीं सबब न समजल्यामुळें तेथें फुल्या घातल्या आहेत.

**हृत्सजातं ॥ ९४ ॥ अतः शिवे भक्तिरचंचलैव समस्तलोकस्य विमुक्तिहेतुः ॥ मायाविमुक्तिः खलु मुक्तिरुक्ता प्रभुं विना तां विजयेत को वा ॥ ९५ ॥ उपास्य सर्वे प्रभुमेव देवाः प्रकृष्टलिंगैक्यपदं प्रपन्नाः ॥ अनुग्रहाद्विष्णुमुखाश्च देवास्समाश्रिताः कैश्चिदमुष्य शंभोः ॥ ९६ ॥ पदं प्रयच्छन्ति पदार्चकेभ्यः स्वकीयमेवाब्जभवाच्युताद्याः ॥ न तत्र लिंगैक्यसुखे ततोऽमी पुनः प्रयात्येव जनिं मृतिं च ॥ ९७ ॥ य ईश्वरांशत्वधिया श्रयन्ते स्वकर्मशक्तेरिह विष्णुमुख्यान् ॥ प्रपद्य ते तद्भवनं तदुक्तेर्महेश्वरोपास्तिरता भवन्ति ॥ ९८ ॥ सदाशिवैक्यानुभवैकगोष्ठ्या तदीश्वरेणैव समाहितास्ते ॥ प्रपद्य दीक्षां प्रलये प्रसक्ते भजन्ति तेनैव सहेश्वरत्वं ॥ ९९ ॥ ये तु स्वतंत्रानिह मुक्तिहेतूनाश्रित्य तान्विष्णुमुखान्भजन्ति ॥ गत्वापि ते तत्पदमाशु नष्टाः पुनः प्रयांत्येव भवांबुराशिम् ॥ १०० ॥ जितेंद्रियास्ते यदि सात्विकेन हृदाभजन्**

---

करितो. ॥ ९५ ॥ यास्तव शिवाविषयीं निश्चल भक्ति करणें हेंच सर्व लोकांस मोक्षाचें साधन आहे, मायेचा नाश होणें हीच मुक्ती होय. प्रभूवांचून त्या मायेला कोण जिंकणार ? माया कोणासही जिंकली जात नाहीं. ॥ ९६ ॥ सर्व देव शंकराचीच उपासना करितात व उत्तम रीतीच्या लिंगैक्याच्या स्थानाचा अनुभव घेतात. ह्या शंकराच्या कृपेनेंच विष्णु, ब्रह्मदेव वगैरे देव श्रेष्ठपणा पावले आहेत. ॥ ९७ ॥ ब्रह्मदेव, विष्णु वगैरे देव आपली सेवा करणाऱ्यांस कदाचित् फार झालें तर आपलें पद ( राज्य ) देतील परंतु त्यांस लिंगैक्याचें सुख आपल्या भक्तांस देतां येत नाहीं. त्या पदांत लिंगैक्याचें सुख नसल्यामुळें ते ब्रह्मदेवाचे व विष्णूचे भक्त लोक पुन्हा पुन्हा जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतात. ॥९८॥ जे लोक विष्णु, ब्रह्मदेव वगैरे देव तरी शंकराचेच अंश आहेत असें समजून त्यांची उपासना करितात ते लोक त्या त्या देवांच्या वैकुंठ वगैरे लोकांत जाऊन त्या देवांचे संमतीनें ते शिवाचीच आराधना करितात. ॥ ९९ ॥ सदाशिवाच्या ऐक्याच्या अनुभवाच्या गोष्टीमुळें त्या सदाशिवाच्याच रूपांत मिसळून जाणारे लोक दीक्षा घेऊन प्रळयकाळ आला तरी त्या ईश्वराबरोबरच ईश्वरपणा पावतात. ॥ १०० ॥ जे लोक येथें मोक्ष होण्यासाठीं स्वतंत्ररीतीनें विष्णु ब्रह्मदेव वगैरे देवांस भजतात ते त्यांच्या भक्तीमुळें त्यांच्या त्या वैकुंठ किंवा सत्यलोकास गेले तरी त्यांचें पुण्य संपतांच पुन्हा संसारसमुद्रांत येऊन पडतात. ॥१०१॥ जे इंद्रियनिग्रहवान् लोक सात्विकपणानें जरी विष्णु वगैरे देवांस नकळतां उपा-

**विष्णुमुखानबुद्धा॥ आवृत्य तत्तत्पदतोऽपि तेऽमी बुध्यन्ति संस्कारवशान्महेशं ॥१०१॥ ते जन्मजन्मन्यथ शैवनिष्ठाः क्रमाद्भविष्यन्ति हि वीरशैवाः ॥ पदं प्रयास्यन्ति शिवैक्यमन्ते समस्तवेदान्तनिगूढमेतत् ॥ १०२ ॥ ये निंदकाः शांभवशंभुभक्तेर्दुराग्रहाद्विष्णुमुखान्भजन्ते ॥ त्यक्ताश्च ते तैः प्रविशन्ति सत्यं तमोऽन्धमेवात्र न संशयः स्यात् ॥१०३॥ पुराणभागेषु तु विष्णुमुख्याः प्रकाशिताश्शंभुपदाब्जभक्त्या ॥ महानुभावाः खलु तेऽपि धन्याः प्रसीदतीशः खलु भक्तभक्त्या॥१०४॥ क्वचिद्यदा भागवतादिभागे न्यूनत्वमुक्तं हरिपद्मजाभ्यां ॥ रुद्रस्य तज्ज्ञेयमसंख्यरुद्रेष्वेकस्य कस्याऽपि गुरुप्रसादात् ॥ १०५ ॥ तमोगुणाधिक्यवशेन विष्णुब्रह्मादिदेवा अपि शंभुमीशं ॥ क्वचिद्विरुध्येश-**

---

सना करीत असले तरी त्यांच्या त्या स्थानापासून परत आल्यावर ते संस्कारामुळें महेश्वरास जाणतात. ॥ १०२ ॥ ते लोक जन्मोजन्मीं शिवमतावर विश्वास ठेवणारे वीरशैव होतील व शेवटीं शिवैक्य (शिवसायुज्यपदास) पावतील, असें सर्व वेदांतांचें तात्पर्य आहे. ॥ १०३ ॥ जे लोक निंदा करणारे असून शिवमत आणि शिवभक्ति ह्यांचा द्वेष करून मुद्दाम हठवादीपणानें विष्णु वगैरे देवांस भजतात ते लोक त्या विष्णु वगैरे देवांनीं हे शिवनिंदक आहेत असें समजून कृपा करण्यास योग्य नव्हेत असें ह्मटल्याबरोबर खरोखर अंधकूप नरकांत जाऊन पडतात ह्यांत कांहीं संशय नाहीं. ॥ १०४ ॥ पुराणांत कितीएक जागीं विष्णु वगैरे देव प्रसिद्ध आहेत ह्मणून वर्णन आहे परंतु तें श्रेष्ठपण त्यांस शंकराच्या चरणकमलाच्या भक्तीमुळें आलेलें आहे. विष्णु वगैरे देवही महासामर्थ्यवान् असून धन्य आहेत कांतर त्यांच्यावर शंकराची कृपा आहे. शंकर भक्तानें भक्ति केल्यावर प्रसन्न होतो हें प्रसिद्ध आहे. ॥ १०५ ॥ कोठें कोठें एखादेवेळीं भागवत वगैरे ग्रंथांत विष्णूपेक्षां आणि ब्रह्मदेवापेक्षां रुद्राचा कमीपणा वर्णन केलेला आढळतो तो कमीपणा महादेवाचा नव्हे, असंख्य रुद्र आहेत त्यांपैकीं ज्यावर गुरूची पूर्ण कृपा नाहीं असा एखादा रुद्र कोणी असेल त्याला ती गोष्ट लागू आहे. ॥ १०६ ॥ तमोगुणाचा जोर ज्यास्त असल्यामुळें विष्णु ब्रह्मदेव वगैरे देव अभिमानास पडून शंकराशीं द्वेष करूं लागले व त्याचा परिणाम असा झाला कीं, शिवाचे हातून ते मरण पावले. तो

**हतास्तदेषां न दूषणं यद्गुणमाश्रयन्ति ॥ १०६ ॥ प्रभोस्तु तस्याखिलकारणस्य प्रमत्ततत्तन्निजभृत्यसंघान् ॥ विशिष्य संशिक्ष्य विवेकदानं कर्तव्यमेवार्तिहरस्य तेषां ॥ १०७ ॥ अतो महान्तो बहुजन्मपुण्यप्रभावलब्धाधिकभाग्ययोग्याः ॥ महेश्वरं कारणकारणं तं समाश्रयन्त्येव सदाशिवाख्यं ॥ १०८ ॥ तदीयभक्तत्वधिया हरींद्रविधातृमुख्यानपि भावयन्ति ॥ महेश्वरे सर्वमखण्डदृष्ट्या लीनं प्रकुर्वन्ति समाधिनिष्ठाः ॥ १०९ ॥ महात्मनां शंकरभक्तिनिष्ठा तदंशसाम्याद्भुवि मध्यमानाम् ॥ अथाधमानामितरत्र भक्तिर्भवेन्नृणां कर्मवशान्मुनीन्द्राः ॥ ११० ॥ वर्णाश्रमाश्चापि शिवाज्ञयैव श्रुत्योदितास्सर्वजगत्प्रसिद्धाः । देहस्य धर्माः खलु सर्व एते न ह्यात्मनः सर्वगताद्वयस्य ॥ १११ ॥ आज्ञा श्रु-**

---

त्या देवांचा दोष नव्हे तो तमोगुणाचा दोष आहे. त्यांनीं द्वेष केला नसता तर ते मेले नसते त्यांत शंकराचा काय दोष ? ॥ १०७ ॥ शंकर हा सर्वांचा ईश्वर असून सर्व जगास मूलकारण आहे, सर्वांची पीडा दूर करणारा आहे. उन्मत्त झालेले कोणी भक्त असतील त्यांस योग्य शिक्षा करून त्यांस ताळ्यावर आणून त्यांस सदुपदेश करावा हें तर शंकराचें मुख्य कर्तव्य आहे. ॥ १०८ ॥ यासाठींच अनेक जन्मांत केलेल्या पुण्याच्या सामर्थ्यानें भाग्योदय झालेले मोठमोठे साधुलोक सदाशिव नांवाच्या सर्व कारणालाही कारण असणाऱ्या त्या महेश्वराला भजतात. ॥ १०९ ॥ त्या महेश्वराचेच हे सर्वजण भक्त आहेत अशा समजुतीनें विष्णु, इंद्र, ब्रह्मदेव वगैरे देवांस देखील भजतात व समाधियोगानें महेश्वर हा सर्वत्र परिपूर्णपणानें भरला आहे अशा समजुतीनें ते विष्णु वगैरे देवांचें पूजन शिवास अर्पण करितात. ॥ ११० ॥ उत्तम स्वभावाच्या मनुष्यांचा शिवाच्या भक्तीवर विश्वास बसतो, मध्यम स्वभावाच्या मनुष्यांचा शिवाच्या अंशानें उत्पन्न झालेल्या विष्णु ब्रह्मदेव वगैरेंच्या भक्तीवर विश्वास बसतो. मुनीश्वरांनो, अधम ( नीच स्वभावाच्या ) मनुष्यांचा कर्माच्या संबंधानें इतर क्षुल्लक देवांवर विश्वास बसतो. ॥ १११ ॥ ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य, शूद्र हे चार वर्ण, ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, आणि संन्यास हे चार आश्रम शिवाच्या आज्ञेप्रमाणेंच वेदानें वर्णन केले आहेत ही गोष्ट सर्व जगांत प्रसिद्ध आहे. हे सर्व शरीराचे धर्म आहेत, आत्म्याचे धर्म नव्हत. आत्मा सर्वान्तर्यामी असून त्यास निराळेपणा मुळींच नाहीं. ॥ ११२ ॥ महे-

**तिस्तस्य महेश्वरस्य स्वयं विधत्तेऽखिलकर्मजालं । जनानविद्यादिमतोऽधिकृत्य शुक्लं निषेधत्यपि कृष्णकर्म ॥ ११२ ॥ भक्तिं विरक्तिं तदशुक्लकृष्णं दीक्षां विधत्ते च मुमुक्षुसंघान् । विरक्तिदार्ढ्ये सकलं विहाय शिवैक्यनिष्ठां परमां विधत्ते ॥ ११३ ॥ यथाधिकारं प्रसमीक्ष्य विद्वान् गुरूपदिष्टः श्रुतिसिद्धमर्थं । समाश्रयेत्सत्क्रियया विशुद्धौ चित्तस्य विज्ञानपथं प्रयायात् ॥ ११४ ॥ आज्ञापि नोल्लंघयितुं हि शक्या कर्मत्यजेदित्यपि सैव सिद्धा । अतो विरक्तः शिवदीक्षितोऽसौ प्रसाध्य भक्तिं विसृजेत कर्म ॥ ११५ ॥ यद्ब्राह्मणो मुख्यतया प्रसिद्धः सर्वेषु वर्णेषु शिवस्तथैव । सर्वोत्तमो ब्राह्मण इत्युपास्यस्तद्ब्राह्मणैर्ब्राह्मण एव सोऽयं ॥ ११६ ॥ जात्या प्रकृत्या द्विविधः स वेद्यो यो ब्राह्मणो ब्राह्मणभक्तियुक्तः । तद्भक्तिशून्यो न हि जातिमात्रात्स ब्राह्मणो ब्राह्मणमत्र मानं ॥ ११७ ॥ यो ब्राह्मणः स्याद्वि-**

---

श्वराची आज्ञा हाच वेद आहे, तो शुक्लकर्माचा अंगिकार करून अज्ञान लोकांचा निषेध करितो तसाच कृष्णकर्माचाही निषेध करितो. ॥ ११३ ॥ भक्ति वैराग्य आणि तसेंच अशुक्ल कृष्णकर्म अंगिकार करून मुमुक्षु लोकांच्या समुदायास तो शिवदीक्षा देतो, वैराग्य दृढ झालें असतां सर्व कर्म सोडून उत्तम प्रकारची शिवैकनिष्ठा पावतो. ॥ ११४ ॥ गुरूनें उपदेश दिलेला विद्वान् मनुष्य आपली योग्यता पाहून ( आपल्या योग्यतेप्रमाणें ) सत्कर्माच्या साहायानें वेदावरून सिद्ध होणाऱ्या अर्थाचा आश्रय करितो. व मन शुद्ध झाल्यावर विज्ञानाच्या मार्गास जातो. ( त्यास विज्ञान होतें ) ॥ ११५ ॥ शिवाची आज्ञा मोडतां कामा नये ती कधींही मोडणें शक्य नाहीं, "कर्म करणें सोडून दे अशी शिवाची स्पष्ट आज्ञा आहे, ह्यास्तव वैराग्यवान् शिवदीक्षा झालेला मनुष्य कर्म करणें सोडून देऊन भक्ति करीत असतो. ॥ ११६ ॥ जसा ब्राह्मण सर्व जातींमध्यें श्रेष्ठ मानलेला आहे तसाच शंकरही सर्व देवांत ब्राह्मण श्रेष्ठ आहे ह्मणून त्या ब्राह्मणांनीं शिवाची उपासना करावी, कां तर तो शिवच ब्राह्मण आहे. ॥ ११७ ॥ ब्राह्मण, जातीवरून आणि स्वभावावरून अशा दोन रीतींनीं ओळखावा, जो ब्राह्मणाची मनापासून भक्ति करितो ( शिवभक्ति करितो ) तोच ब्राह्मण होय. त्या शिवाची भक्ति करणारा नसला तर ब्राह्मण जातींत जन्मला एवढ्यावरून त्यास ब्राह्मण ह्मणूं नये. ब्राह्मण ही त्याची योग्यता आहे, जाति नव्हे. ॥ ११८ ॥ जो

**मलः प्रकृत्या स एव शास्त्रेष्विह जंगमः स्यात् । द्विजस्तु जात्या शिवतत्वहीनो न संमतो ब्राह्मण इत्ययं नः ॥ ११८ ॥ यथोक्तकर्माचरणैकमात्राद्विजः स पित्रादिगतिं प्रयाति । अकर्मशैवोऽन्यसुरेषु भक्तस्तल्लोकगामी पुनरेति मृत्युं ॥ ११९ ॥ यो ब्रह्मवेत्ता शिवमार्गनिष्ठस्स ब्राह्मणो मुक्तिमुपैति धन्यः । अन्योऽपि जात्या शिवभक्तिपूर्णः स ब्राह्मणत्वं प्रतिपद्य मुक्तः ॥ १२० ॥ न शूद्रता स्याद्भगवत्यधीशे भक्तस्य दीक्षाविधिमाश्रितस्य । अदीक्षितः शांभवभक्तिमार्गे शिवापराधाच्छ्वपचत्वमेति ॥ १२१ ॥ शिवः स्वयं ब्राह्मणदैवतं स्याज्जनार्दनः क्षत्रियवंश्यसेव्यः । चतुर्मुखो वैश्यकुलैरुपास्यो गणेश्वरोपास्तिपरो हि शूद्रः ॥ १२२ ॥ इति स्मृतिः प्राह मनोस्तदस्य वाक्यस्य तात्पर्यमिदं हि बोध्यं । भजेत यो योऽधिपमेव यं यं स एव तत्तत्प्रकृतिः किलेति ॥ १२३ ॥ अतः शिवं पुण्यवशादुपास्ते समस्तजातीयनरो**

---

ब्राह्मण स्वभावानें निष्कपटी असेल ( निष्पाप असेल ) त्यालाच शास्त्रांत जंगम ह्मणून ह्मटलें आहे. जातीनें ब्राह्मण आहे खरा परंतु तो जर शिवोपासना करणारा नसेल तर तो आह्मांस मुळींच मान्य नाहीं. ॥ ११९ ॥ यथाविधि कर्म करणारा ब्राह्मण पितृलोकास जातो, कर्म न करणारा ( शिवभक्ति न करणारा ) शिवभक्त दुसऱ्या देवतांस भजून त्यांचे लोकांस जातो ? आणि त्या लोकास गेला तरी पुन्हा मरण पावतो. ॥ १२० ॥ जो ब्राह्मण ब्रह्मवेत्ता असून शिवभक्तीवर विश्वास ठेवणारा आहे तो श्रेष्ठ ब्राह्मण मोक्षास जातो. ब्राह्मणाहून इतर जातीचा मनुष्य असून तो शिवभक्तीमध्यें प्रवीण असेल तर तो देखील ब्राह्मणपणास पाऊन मुक्त होतो. ॥ १२१ ॥ दैवत शिव भगवान् परमेश्वर असतां शिवदीक्षा घेणाऱ्या मनुष्याला शूद्रपणा मुळींच नाहीं. शिवभक्तिमार्गांत असें सांगितलें आहे कीं, जर कोणी मनुष्य शिवदीक्षा घेतल्यावांचून राहील तर शिवाचा अपराध केल्यामुळें चांडाळयोनींत जाऊन जन्मेल. ॥ १२२ ॥ शिव हा प्रत्यक्ष ब्राह्मणांचें दैवत आहे, विष्णु हा क्षत्रियांचें दैवत आहे, वैश्यजातीचे लोकांनीं ( जैन कोमटी वगैरे लोकांनीं ) ब्रह्मदेवाची उपासना करावी व शूद्रजाति ही गणपतीची उपासना करणारी आहे. ॥ १२३ ॥ अशी मनूची स्मृति सांगते त्या वाक्याचा हाच सारांश समजावा कीं, जो जो मनुष्य ज्या ज्या मुख्य ईश्वरास भजत असेल तो तो खरोखर तशा तशा स्वभावाचा होतो. ॥ १२४ ॥ ह्यासाठीं कोणत्याही

**विशेषात् । स इष्यते ब्राह्मणवद्गुणाढ्यो विशेषदीक्षावशतश्चरोऽसौ ॥ १२४ ॥ शिवैकतानाः खलु सर्व एते भवन्ति सामान्यवशेन शैवाः ॥ विशेषदीक्षावशतस्त एते भवन्ति वर्णा भुवि वीरशैवाः ॥ १२५ ॥ ततो निराभारपदैकदीक्षाश्चराग्रगण्यास्तु शिवावधूताः । विरागपूर्णा यतयो मुनींद्रास्समस्तलोकं ननु पावयन्ति ॥ १२६ ॥ कुलाकुलत्वेन हि वीरशैवं द्विधा विभिन्नं कुलमार्गनिष्ठैः । यदेव लिंगांगिभिराश्रितं स्याच्छिवोक्तरीत्या कुलवीरशैवं ॥ १२७ ॥ तथाऽकुलं नाम कुलं विखण्ड्य प्रसादसंकेतरहस्यनिष्ठैः । तदेकदीक्षैश्च गृहीतदारैश्शिवार्चकैश्शीलयुतैरुपास्यं ॥ १२८ ॥ अनादिसिद्धं ननु वीरशैवं शिवोपदिष्टं प्रमथान्वयेऽस्मिन् । प्रसिद्धिमेति द्विविधं च लोके विमुक्तिहेतु-**

---

जातींत जन्मलेला मनुष्य असला तरी तो बहुतकरून पुण्ययोगानें ( सत्कर्माचें फळ भोगण्याची संधि आल्यावर ) शिवाचीच उपासना करितो, हा मनुष्य विशेष रीतीची शिवदीक्षा झाल्यामुळें ब्राह्मणासारखाच गुणवान् मानला जातो. ॥ १२५ ॥ बहुतकरून हे सर्व शैवमती लोक एक निष्ठपणानें शिवाचीच उपासना करितात. त्यांना विशेष प्रकारच्या दीक्षेचा संस्कार झाला ह्मणजे तेच वीरशैव होतात. ॥ १२६ ॥ त्या वीरशैवांपेक्षां देखील निराभारपणाची दीक्षा झालेले जंगम लोक श्रेष्ठ आहेत, ते मूर्तिमन्त अवधूत होत. ते फार वैराग्यवान् असतात त्यांनीं सन्यास घेतलेला असतो; मुनीश्वरांनो, फार काय सांगावें ? ते निराभार लोक खरोखर सर्व जगास पवित्र करितात. ॥ १२७ ॥ वंशाचे मार्ग घालून देणाऱ्यांनीं वीरशैवाचे कुलवान् वीरशैव आणि अकुलीन वीरशैव असे दोन भेद मानले आहेत, जे वीरशैव शिवांनीं सांगितलेल्या रीतीप्रमाणें शरीराला इष्टलिंगाचा संबंध करितात ( गळ्यांत किंवा शरीराच्या कोणत्याही भागावर इष्टलिंग धारण करितात ) ते कुलीन वीरशैव होत. ॥ १२८ ॥ कुल सोडून अन्य जातींतील वीरशैवांत येऊन मिळतात आणि प्रसादस्थलाच्या गुप्त तत्वावर विश्वास असणाऱ्यांकडून एकवेळ शिवदीक्षा घेतात व लग्नें करून त्या शैवलोकांबरोबरच सदाचारानें वागून शिवपूजन करितात ते लोक अकुलीन वीरशैव होत ॥ १२९ ॥ ह्या प्रमथांच्या वंशांत शिवांनीं उत्पन्न केलेला वीरशैव अनादि संसिद्धच आहे अर्वाचीन नव्हे. लोकांत कुलवीरशैव आणि अकुलवीरशैव असे दोन भेद प्रसिद्ध आहेत

गुणतारतम्यात् ॥ १२९ ॥ श्रुतिश्चयो वक्ति शिवेति नाम स्फुटं सदीक्षः श्वपचोऽपि सोऽयं । गुणाधिकस्तेन सहैव भुंज्याद्वदेच्चरेत्सन्निवसेत्तथेति ॥ १३० ॥ अतः कुलत्यागवशान्न दोषः शिवात्मनां शीलवतां नराणां । तदीयरक्षार्थमिमं ससर्ज स्वयं शिवो जंगमलिंगवंशं ॥ १३१ ॥ अनादिसिद्धस्तु चरान्वयोऽयं शिवेन मूर्ध्नो स्वयमेव सृष्टः । अतः प्रभुर्जंगमलिंगलीलामवाप्य भक्तानवनावरक्षत् ॥ १३२ ॥ पुनः कलौ दुष्कुलबौद्धसंघैर्विनष्टशैवोद्धरणाय देवः ॥ प्रभुः स एवावतरिष्यतीमे वृषेश्वराद्याश्च यथा पुरैव ॥ १३३ ॥ तथैव सा चित्कलिकावतीर्य प्रभौ समायास्यति सामरस्यं । स षण्मुखश्छन्नघनो भविष्यत्ययं च वीरो मणिवालनाथः ॥ १३४ ॥ तथा पुरावृत्तमिदं च तिष्ये भविष्यतीहैव भविष्यतीत्थं । श्रुतं प्रभोस्सच्चरितं मुनींद्रास्सदानुभाव्यं

---

त्यांच्या गुणांप्रमाणें त्यांस मोक्षप्राप्ति होते. ॥ १३० ॥ वेद तर असें सांगतो कीं जो मनुष्य नेहमीं "शिव शिव" अशा पवित्र नाममंत्राचा उच्चार करितो तो जातीचा चांडाळ असला तरी शिवदीक्षा घेतलेला महान् भक्त समजावा; त्याबरोबर जेवावें, बोलावें त्याजवळ राहावें त्यास कांहींएक हरकत नाहीं. ॥ १३१ ॥ ह्यास्तव सदाचारी शिवयोगीमनुष्यांस कुलत्याग केल्याबद्दल कोणताही दोष नाहीं. त्या शैवलोकांचें सर्व प्रकारानें रक्षण करण्यासाठीं शंकरांनीं मुद्दाम हा जंगमलिंगाचा वंश उत्पन्न केला आहे. ॥ १३२ ॥ हा जंगमाचा वंश फार प्राचीनकाळापासून आहे तो वंश स्वतः शंकरांनीं आपल्या मस्तकापासून उत्पन्न केला. ह्यास्तव अल्लमप्रभु जंगमलिंगाचा अवतार घेऊन पृथ्वीवरील भक्तांचें रक्षण करण्यासाठीं पृथ्वीवर आला व त्यानें भक्तांचें रक्षण केलें. ॥ १३३ ॥ पुन्हा कलियुगांत नीच कुलांत जन्मलेल्या बौद्धांच्या समुदायांनीं शैवमताचा विध्वंस केल्यावर त्या शैवमताचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं अल्लमप्रभु पुन्हा अवतार घेईल, व पूर्वीं बसवेश्वर वगैरे प्रमथगण जसे जन्मले होते तसेच जन्मतील. ॥ १३४ ॥ तशीच ती पार्वतीची सात्विक कला पुन्हा जन्मास येईल आणि अल्लमप्रभूमध्यें सामरस्य पावेल. हा कार्तिकस्वामी छन्नबसवेश्वराचे रूपानें पुन्हां जन्मेल व तसाच पराक्रमी मणिवालनाथही जन्म घेईल. ॥ १३५ ॥ ही अशी गोष्ट पूर्वीं झालेली आहे, आतां होत आहे व पुढें कलियुगांतही होईल. मुनीश्वरांनो, तुह्मीं हें अल्लमप्रभूचें चरित्र ऐकिलें आहे हें तुह्मी

हृदये भवद्भिः ॥ १३५ ॥ सर्वोत्तमा वैदिकमार्गनिष्ठाः श्रेष्ठास्तु तेभ्यो ननु योगनिष्ठाः । तेभ्योऽधिकाः शैवरता महान्तः श्रीवीरशैवास्तु ततोऽधिकास्ते ॥ १३६ ॥ दीक्षैकनिष्ठास्त्वकुला महान्तः श्रीवीरशैवेऽपि ततोऽधिकास्ते । श्रीमन्निराभारविरागनिष्ठाः श्रुत्यातिवर्णाश्रमिणः प्रसिद्धाः ॥ १३७ ॥ ततो महान्तः कुलवीरशैवं क्षितौ प्रतिष्ठापयितुं गणास्ते । तदीयवंशेष्ववतीर्य तत्वं प्रकाशयंति प्रतिभाविशेषात् ॥ १३८ ॥ कलौ भविष्यन्ति महानुभावाश्शैवान्वये तत्र च वीरशैवे। संरक्षितुं शांभवमद्वितीयं दधीचिशप्तान्वयसंभवेभ्यः ॥१३९॥ सूतोक्तमल्लमगुरोश्चरितं निशम्य ते शांभवाः प्रमुदिताः परमानुभावाः । रुद्राक्षभस्मफलवल्कलवीटिकाद्यैर्हृद्यैरुपायनशतैः प्रणतिं प्रचक्रुः ॥ १४० ॥ सकृदपि गुरुलीलां धारयन्तः श्रुतान्ता भवजलनि-

---

नीट लक्ष्यांत धरा. ॥ १३६ ॥ वैदिकमार्गावर विश्वास ठेवणारे लोक सर्वांत श्रेष्ठ आहेत. खरोखर त्यांपेक्षां योगसाधन करणारे लोक श्रेष्ठ होत, त्यांपेक्षां शैवमतावर विश्वास ठेवणारे लोक श्रेष्ठ होत, आणि त्यांपेक्षां मोठमोठे वीरशैव लोक श्रेष्ठ होत. ॥ १३७ ॥ दीक्षा घेण्याची मनापासून इच्छा असणारे मोठमोठे अकुलीन लोक ? त्या वीरशैवलोकांहूनही श्रेष्ठ होत, त्यांच्यापेक्षां निराभार ( वैराग्य झालेले ) लोक श्रेष्ठ होत व त्यांच्यापेक्षां अतिवर्णाश्रमी लोक श्रेष्ठ होत हें प्रसिद्ध आहे. ॥ १३८ ॥ त्यांच्यापेक्षां देखील कुलवीरशैवांचा पृथ्वीवर प्रसार करण्यासाठीं पृथ्वीवर कुलीन वीरशैवांच्या वंशांत जन्मलेले प्रमथगण श्रेष्ठ होत, हे गण प्रमथांच्या कुलांत जन्मास येऊन आपल्या बुद्धिसामर्थ्यानें रहस्य सर्व लोकांस कळवितात. ॥ १३९ ॥ दधीचिऋषीनें ज्यांच्या वंशास शाप दिला आहे अशा ब्राह्मणलोकांपासून उत्तम प्रकारच्या ( अलौकिक ) अशा शैवमताचें रक्षण करण्यासाठीं हे महासामर्थ्यवान् लोक कलियुगांत शैवांच्या व वीरशैवांच्या वंशांत जन्मतील. ॥ १४० ॥ असें सूतानें सांगितलेलें अल्लमप्रभूचें चरित्र ऐकून ते महासामर्थ्यवान् शिवभक्त शौनकादिक ऋषीश्वर संतुष्ट झाले, व त्यांनीं रुद्राक्ष, भस्म, फल, वल्कल, विडा वगैरे आवडीचे पदार्थ आणून त्यांनीं सूतास नजराणा देऊन सर्वांनीं सूतास नमस्कार केला. ॥ १४१ ॥ सर्व शास्त्रांत पारंगत असणारे ते शौनकादिक ऋषि फक्त एकवेळ अल्लमप्रभूचें चरित्र ऐकिल्यामुळें संसारसमुद्रांतून

धितीर्णाः पूर्णकामा बभूवुः । भृगुतनयमुखास्ते वीरशैवं स्तुवन्तस्स-
ततमचलितेष्टप्राणभावैक्यभावाः ॥ १४१ ॥

इत्यार्षश्रीभविष्यत्पुराणकथाविशालायां श्रीवीरमाहेश्वरामृतानंदसू-
क्तिसूत्रग्रथितपंचविंशतितत्वमौक्तिकमहनीयमालायां प्रमथगणवचनप-
रंपरानुकूलायां कलिकल्मषनिमग्नजनसमुद्धरणशीलायां प्रभुलिंगली-
लायां परमेश्वरप्रसादसंप्राप्तमहेश्वरीमनःसमाधानवीरशैवमहिमानुसं-
धानप्रस्तुतकथोपसंहृतिकथनगतिर्नाम पंचविंशोऽध्यायः । श्रीपरमे-
श्वरार्पणमस्तु । श्रीनंदिकेश्वराय नमः ॥ ॥ श्रीः ॥ श्रीः ॥

तरून गेले व त्यांचे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले; त्यांनीं वीरशैवमताची वारंवार प्रशंसा केली, व ते सर्व ऋषीश्वर त्यानंतर इष्टलिंग, प्राणलिंग, आणि भावलिंग ह्यांच्याशीं निश्चलपणानें ऐक्य पावले.

ह्याप्रमाणें ऋषीश्वरांनीं भविष्यत्पुराणांतील कथांत सविस्तर रीतीनें सांगितलेल्या, श्रीवीरमाहेश्वरांच्या अमृतासारख्या गोड लागण्यामुळें आनंद देणाऱ्या, उत्तम भाषारूप दोऱ्यांत ओंवलेल्या, पंचवीस तत्वरूप मोत्यांची मौल्यवान मालाच अशा, प्रमथगणांच्या वचनास अनुसरून असणाऱ्या, कलियुगांतील पातकांत बुडणाऱ्या मनुष्यांचा उद्धार करण्यास उपयोगीं पडणाऱ्या, प्रभुलिंगलीलेंतील परमेश्वराचे (शिवाचे) कृपेमुळें झालेलें पार्वतीच्या मनाचें समाधान, वीरशैवांच्या मोठेपणाचें वर्णन, चालू असलेल्या कथेचा उपसंहार वगैरे वर्णन असलेला हा पंचविसावा अध्याय संपला.

